# १

रामायणकालीं जनतेच्या शिक्षणाची सोय ऋषींनीं चालविलेल्या गुरुकुलांत होत असे. अशा अनेक गुरुकुलांपैकीं निसर्गशोभा, शिक्षणाची भारदस्त व्यवस्था आणि विद्यार्थ्यांच्या राहाणीवर प्रेमळ पण कडक अशी शिस्त या दृष्टीनें विश्वामित्राचा सिद्धाश्रम वरिष्ठ दर्जाचा मानला जाई. गंगा नदीच्या दक्षिणेकडे एक विस्तीर्ण उंचवटा साधून सिद्धाश्रम वसले होते. आसमंतांत सिद्धाश्रमाची अफाट शेती पसरलेली होती. वृक्षराजींनीं सिद्धाश्रम इतका भरगच्च भरला होता कीं, दुरून पाहाणारास तो एक विस्तीर्ण बगीचा आहे, असेंच भासे. परंतु समीप गेल्यावर त्या नितांतरमणीय प्रदेशांत व्यवस्थित अशीं तीन हजार विद्यार्थ्यांचीं आश्रमस्थानें, त्यांना पुरेशा शिक्षकांचीं निवासगृहें, व्यायामशाळा, भोजनशाळा, आरोग्यमंदिरें, अध्यापनासाठीं उभारलेलीं भिन्नभिन्न मंदिरें, हीं सर्व पाहिलीं म्हणजे हें एक लहानसें नगरच वृक्षराजींत दडलेलें आहे असें वाटे व मन आश्चर्यचकित होई. असि, मसि व कृषि यांचें तेथें अध्यापन चाले. परंतु तत्कालीन परिस्थितींत जरूर अशा युद्धकलेकडे विशेष लक्ष पुरविलें जाई. विश्वामित्रासारखा अधिष्ठाता अग्रभागीं तळपत असल्यामुळें प्रत्येक विद्यार्थी शरसंधानांत निपुण, युद्धकलेंत वाकबगार, तेजस्वी व बलिष्ठ असा दिसे. सिद्धाश्रमांत राजपुत्र, सरदारपुत्र होते व गरिबांचींहि मुलें होतीं. परंतु कठोर शिस्तीच्या विश्वामित्रास तीं समान दर्जाचींच वाटत. अयोध्या, कोसलप्रदेश, काशी, हिमाचल प्रदेश, अंग, वंग इत्यादि देश, मगधासारखा सुसंपन्न देश वगैरे अनेक देशांतील विद्यार्थी तेथें जमत व विद्यालयाचा फायदा घेऊन शिक्षणक्रम पुरा करीत. आसपासच्या अनेक राज्यांतील खजिन्याचा ओघ या शिक्षणकार्याकडे वहात होता आणि सालिना हजारों विद्यार्थी उच्च नागरिकांची जबाबदारी पार पाडण्याकरितां या गुरुकुलांतून बाहेर पडत. श्रीरामचंद्र युद्धकलेंत

नपुण झाले, अचूक शरसंधानामुळें ते एकबाणी बनले, तें याच सिद्धाश्रमांत येऊन. काहीं काळ रामचंद्राचा मुक्काम सिद्धाश्रमांत होता आणि शस्त्रास्त्रकलेंत त्यांनीं प्राविण्य मिळविलें तें आचार्य विश्वामित्राच्या शिक्षणामुळेंच. एकंदरींत विश्वामित्राचा सिद्धाश्रम राजा आणि प्रजा यांच्या अत्यंत प्रेमाचें स्थान बनलें होतें.

मध्यरात्र उलटून गेली होती. गंगा नदीवरून वाहणारा शीतल वायु चोहोंकडे सुगंध पसरवीत होता. तो नितांत, शांत प्रसंग पहाण्याचें भाग्य फार थोडयांच्या नशिबीं असतें. आकाशस्थ चंद्रमा संपूर्ण तेजानें अमृतवर्षाव करीत आहे, सर्वत्र शांतता पसरली आहे आणि गंगामाता त्यास सुंदर साथ देत आहे, अशी नितांत, शांत मध्यरात्र एकटा संयमीच पाहूं शकतो. आपल्या निवासस्थाना-समोरील विस्तीर्ण आम्रवृक्षाजवळच्या व्याघ्रचर्मावर अजूनही विश्वामित्र मुनि विचारमग्न अवस्थेंत बसले होते. ती त्यांची बसण्याची ठेवण ऐन तारुण्याची दर्शक होती. ते मनानें तरुण होते, विचारानें तरुण होते आणि ज्ञानानेंही तरुण होते. त्यामुळें वार्धक्याची झांक त्यांच्या चेहऱ्यावर किंचितहि दृग्गोचर झाली नव्हती. मध्यरात्र उलटून गेली आहे, असें नगारखान्यांतील सुरेल सनईचा ध्वनी दर्शवित होता. गंगा नदीच्या जलसंचयाच्या लाटा त्या शांत काळीं कानांवर पडत होत्या. इतक्यांत विश्वामित्रांनीं आपले विशाल डोळे उघडले आणि "कोण प्रसेनकुमार ? जागे आहात काय?" अशी पृच्छा केली. त्यासरशीं एक वीस वर्षांचा कुमार विश्वामित्रापुढें उभा राहिला. रेखीव अगापिंडाचा तो गौरवर्णीय कुमार हात जोडून म्हणाला, " आचार्य, काय आज्ञा आहे ? "

" काय कुमार, तू अद्याप जागा आहेस ? "

"आचार्य, आपण अद्याप विश्रान्ति घेत नाहीं! आपणांस कांहीं गरज लागेल म्हणून मी मुद्दाम जागा राहिलों आहें."

"[illegible]सेन, तूं राजपुत्र ! तू विलासांत आणि सुखोपभोगांत आ[illegible] [illegible] घालवायचा, दासदासींकडून आपली सेवा करवून घ्यावया[illegible] [illegible] असूस हें कष्टप्रद जीवन कां कंठत आहेस ? "

"[illegible]र्य, माझ्या जीवनाचें कसें मातेरें झालें, तो दुःखद वृत्त

गझुंझार सेनानायकाचा प्रचंड दरारा येथील आद्य रहिवाश्यांच्या
ोंत उत्पन्न झाला आणि आतां आर्यांचें राज्य चिरकालीन होईल'
ाी खात्री वाटू लागली. परंतु हें गोड मनोराज्य फार काळ टिकलें
हीं. लंकाधिपती रावण याची प्रचंड सत्ता आर्यावर्तास गिळून
कील, अशी साधार भीति वाटू लागली आहे. नुसत्या संपत्तीवर
हान मोठे दरोडे घालून लंकेचे राक्षस थांबत नाहींत, तर आम्हां
षींच्या धर्माचरणांत अनेक विघ्नें ते निर्माण करितात आणि
वींत लाजिरवाणी गोष्ट ही कीं, आर्यावर्तांतील सौंदर्याच्या
रणांत ते मन मानेल तसा धिंगाणा घालतात. आर्यावर्तांतील
रुण आणि रूपवती स्त्रिया हा आपला सत्तेचा विषय
ाहे " असें मानण्यापर्यंत त्यांचा अधमपणा गेला आहे. या
ंकेच्या राक्षसांच्या पाशवी सामर्थ्याची अखेर मर्यादा कोठ-
र्यंत जाईल, याची कल्पना हल्लींच्या राजांना होत नाहीं. परंतु
म्ही जागृतसमयीं सर्व परिस्थितीचें आकलन करूनही स्वस्थ कसे
सूं? ' विश्वामित्रांनीं गतेतिहासाचें मनन चालू परिस्थितीपर्यंत
णलें आणि भावी संकटांतून पार पडण्याकरितां आपण उपाययोज-
च्या कसे तयारींत आहोंत हें आठवून विश्वामित्रास किंचित् समा-
ान वाटलें. आणखी आठ दिवसांत सर्व ऋषि, मुनि व तपस्वी यांचें
मिलन भरवून लंकेच्या भावी आक्रमणापासून आर्यावर्ताचें संरक्षण
कसें करतां येईल याची उपाययोजना मुक्रर होणार आहे,
ा विचारानें विश्वामित्राच्या प्रसन्नतेंत अधिकच भर घातली. त्यानें
ोळे उघडले. आतां फक्त प्रहररात्र उरली आहे, असें सुचविणारा
ारखाना सुरू झाला तोंच आपणांकडे कोणी स्त्री गजगतीनें येत
हे असें त्यानें पाहिलें. तो आश्चर्यमूढ अवस्थेंत त्या स्त्रीकडे पाहूं
लागला.

" मेनके " त्या स्त्रीस उद्देशून विश्वामित्र म्हणाला, " तूं देवां-
गना आहेस. तुला वार्धक्य नाहीं. अखंड तारुण्य हा तुमचा जन्मसिद्ध
हक्क आहे; परंतु देवांगने, आम्हां मानवास जन्मजरामरण या उपाधि
त्यामुळें मी वयातीत झालों आहें. पूर्वीचें तारुण्य माझ्या ठिकाणीं
उरलें नाहीं. कामक्रोधादि षड्विकार माझ्या ब्रह्मतेजानें जळून खाक
े आहेत. तूं आतां माझ्याकडे कां आलीस ? '

इतकें बोलून त्या समीप आलेल्या स्त्रीकडे चौकस दृष्टीनें पाहात तो पुन्हा म्हणाला,

" अपरिचित तरुण कन्यके ! तूं मेनका खास नव्हेस. तूं कोणीही ऐस. विश्वामित्राच्या आश्रमांत तुझें स्वागत असो! "

" आचार्य ! " लवून नमस्कार केल्यानंतर ती बाला म्हणाली, " आपलें अभय मागण्यास मी येथें आलें आहें. मी विपत्तींत सांपडलेली राजकन्या आहें. येथील नियम उल्लंघून केवळ आपलें अभय मागावें या हेतूनें मी आपली एकांतांत भेट घेतली आहे. मला माफ करा. "

" तुला येथें कोणी आणून सोडलें ? "

" या आपल्या दयाळू रखवालदारानें ! तो प्रथम मला आपणापर्यंत घेऊन येण्यास नाकबूल होता. परंतु मीं जेव्हां त्यांस माझ्या आपत्तीचें कारण सांगून विनविलें आणि या आपत्तीतून पार पडण्याकरितां मला तुमची एकांतांत गांठ घेणें जरूर आहे हें कळविलें, तेव्हां त्याचें दयाळू मन द्रवलें आणि तो मला आपणांकडे घेऊन येण्यास कबूल झाला. "

" रखवालदार ! " समोर हात जोडून उभ्या असलेल्या व्यक्तीकडे स्नेहपूर्ण दृष्टीने पहात विश्वामित्र म्हणाले,

" तुमचा शिस्तभंगाचा अपराध माफ केलेला आहे. उद्यां सूर्योदयानंतर चार घटकांनीं मला भेटा. तुमच्या सत्कृत्याबद्दल तुम्हांस बक्षीस मिळेल.

" सुकुमार बाले, तूं कोण ? कोणत्या देशची राजकन्या ? कसल्या आपत्तींत सांपडलेली आहेस तूं ? आणि तुला माझ्यापासून कोणतें अभय पाहिजे आहे तें मला कळीव. पलीकडील त्या व्याघ्रचर्मावर बैस. अशी किती वेळ तू उभी राहशील ? रखवालदार, तू त्या पलीकडच्या आम्रवृक्षाखाली थांब. "

असें बोलून ती अनपेक्षित तरुणी काय बोलते तें ऐकण्यास ते तयार झाले. ती तरुणी मधुर आवाजानें बोलूं लागली—

" उत्तर कुरु प्रांताचे राजे शत्रुंजय यांची मी कन्या. माझें स्वयंवर झालें आणि मीं काशीचे राजे अरिदमन यांचा युवराज प्रसेनजित

यांना स्वयंवरांत माळ घातली. आमचा लग्नविधी काशी येथें अत्यंत थाटाचा झाला. आमचा लग्नविधी पार पडल्यानंतर पहिल्याच रात्रीं अभिसारिकेच्या वेषांत पतिदेवाच्या आगमनाची मी गच्चीवर वाट पहात उभी होतें. पण तोंच एक आकाशस्थ यान त्या ठिकाणीं येऊन थांबलें. दोघा धटिंगणांनीं मला उचलून त्या यानांत कोंबलें आणि मला घेऊन तें यान आकाशांतून संचार करूं लागलें. असें यान मीं पूर्वीं कधीं पाहिलें नव्हतें. अशा यानास विमान म्हणतात हें मला मागाहून समजलें. हा आमचा विमानांतील प्रवास रात्रभर चालला. सूर्योदयास मीं पाहिलें तेव्हां आपण एका समुद्राचें उल्लंघन करीत आहोंत असें मला समजलें. भीतीनें आणि चिंतेनें माझ्या मनाचा थरकाप उडाला. मी रडलें, ओरडलें; पण तिकडे लक्ष कोण देतो? विमान आपलें चालूंच होतें. सूर्योदयानंतर दोन धटकांनीं एक सुवर्णमय नगर आम्हांस लागलें. तेथील एका भव्य इमारतीवर आमचें यान येऊन थांबलें आणि आम्ही एका सुंदर सुवर्णगृहांत प्रविष्ट झालों. राक्षसांचा राजा रावण याच्या नगरांत आम्ही आलों होतों. सोन्याची लंका म्हणतात ती हीच. रावणाचा प्रमुख मंत्री अग्निरथ याचा तो प्रासाद. अग्निरथाचा पुत्र चित्ररथ यानें माझ्या सौन्दर्यावर मोहित होऊन माझा अपहार करून मला येथें आणलें आहे. चित्ररथाची पत्नी सुलभादेवी फारच विचारवंत व दयाळू होती. तिनें माझी प्रथम काळजी घेतली. एका दुभाष्याच्या मदतीनें आम्ही दोघीजणी बोलूं शकलों. मजसारख्या सुंदर मुली आर्यावर्तांतून पळवून आणावयाच्या आणि त्यांना आपल्या नाटकशाळा अथवा विवाहित पत्नी करावयाच्या; ही प्रथा लंकेंत—राजधानींतच—नव्हे, तर लंकेच्या उभ्या राज्यांत तरुण पुरुषांत सर्रास चालू होती. मंत्री अग्निरथ 'ही प्रथा योग्य नाहीं, अंतीं नाशास कारण होईल' असें म्हणत; पण राजाचीच या गोष्टीस पूर्ण संमति असल्यामुळें अग्निरथाच्या म्हणण्याकडे कोण लक्ष देणार? इतकी हकीकत कळवून, सुलभादेवीनें मला प्रेमानें पोटाशीं धरून आश्वासन दिलें कीं, 'मी आणि मामंजी तुमच्यावर कोणतीही जुलूम जबरदस्ती होऊं देणार नाहीं.' मला येथें कां आणलें? माझें कोणत्या बुद्धीनें अपहरण केलें, याचा आतां कोठें माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. चित्ररथानें त्यानंतर माझी भेट घेतली. त्यानें

मला अनेक प्रलोभनें दाखविलीं. लंकेच्या अफाट ऐश्वर्याची प्रशंसा केली. आपला लंकेच्या दरबारीं केवढा मान आहे आणि आपण कसे ऐश्वर्यशाली आहोंत, याचें चित्र माझ्यापुढें उभें केलें. हेतु हा होता कीं, त्याची पत्नी होण्यास मीं मान्यता द्यावी. मी एकदां दुसऱ्याची पत्नी झालेली आहें असें सांगून स्पष्ट शब्दानें त्यास नकार दिला, तरी तो संतापला नाहीं किंवा हतबल झाला नाहीं. तो दररोज माझ्या मंदिरांत येई आणि माझी मनधरणी करी; परंतु माझा पहिला नकार कायम राहिला. या गोष्टीस सहा महिने लोटले. मी दारुण चिंतेनें कृश होत चाललें आहें हें ऐकून वृद्ध मंत्री अग्निरथ माझ्याकडे आला आणि म्हणाला, ' मुली, माझ्या घरीं आनंदानें रहा. तूं कशाची काळजी करतेस ?' तेव्हां माझ्या चिंतेचें कारण मीं कळविलें आणि मी स्वदेशीं गेलें तर जगेन, नाहींतर मरेन, असें मीं त्यास सांगितलें, तेव्हां अग्निरथ अत्यंत विचारमग्न अवस्थेंत निघून गेला. चित्ररथ कोठें दोन महिन्यांच्या प्रवासावर निघून गेला. त्यानंतर दोन महिन्यांनीं एके दिवशीं प्रातःकालीं मंत्री अग्निरथांनीं माझी सुटका झाली अशी आनंदाची बातमी मला सांगितली. मी विमानांतून समुद्रापार व्हावें आणि नंतर अश्वारूढ होऊन देशीं जावें असा अग्निरथाचा हुकूम होता. मीं पित्याच्या प्रेमानें त्यास अभिवादन केलें आणि विमानांत बसून समुद्रपार झालें. तेथें सुंदर घोडा घेऊन मला एक नोकर भेटला. मीं एकंदर आठ महिन्यांचा काळ लंकेंत घालविला. प्रत्यहीं अमुक देशची राजकन्या पळवून आणली, अमुक प्रधानाच्या मुलीचें अपहरण केलें, अमुक देशांतील सावकाराची कन्यका जबरदस्तीनें पळवून आणली, अशा अनेक बातम्या कानांवर येत व त्यांच्यावर जुलूमजबरदस्ती होत असल्याचा हृदयस्पर्शी वृत्तांत ऐकावयास मिळे. मी स्वदेशीं आलें आणि बचावलें. परंतु लोकापवादाची भीति मला वाटत आहे. माझ्या पितृगृहीं मला लोकापवादामुळें प्रवेश मिळणार नाहीं व श्वशुरगृहीं तर नाहींच नाहीं. परगृहीं राहिलेली अर्थात पतित झालेली असें मानून माझे पतिदेवही माझा धिक्कार करतील या घोर आपत्तींत मी सांपडलें आहें. आचार्य, आपलें अभय मिळालें तर मी जगेन. मी शुद्ध आहें. मी मनानेंही पातकास शिवलें नाहीं. याचें अग्निदिव्य करण्यास मी तयार आहें.

आपण मला अभय दिलें नाहीं तर गंगामाईचे थोर उदरांत अभय-स्थान मिळविणें मला भाग पडेल! "

इतकें बोलून ती थांबली. उच्च आर्य स्त्रियांचा कसा अपहार आणि छळ लंकेच्या राक्षसांनीं प्रारंभला आहे याचें शब्दचित्र विश्वामित्राच्या मनावर उत्तम रीतीनें रेखलें गेलें. शत्रुंजय राजाच्या कन्येचा हा करुण वृत्तांत ऐकून त्याचें मन द्रवलें. त्याच्या डोळ्यांत अश्रुबिंदु उभे राहिले. परंतु करारी आणि निश्चयी विश्वामित्रानें त्यांना आवरून धरलें व क्षणमात्र विचार करून तो म्हणाला,

" माझ्या आश्रयास आलेल्या मूक जनावरासही मी अभय देतों. तुला संपूर्ण अभय असो. तुझा पति प्रसेनजित सध्यां येथेंच आहे. तो अत्यंत निराशामय अवस्थेंत आहे. तो तुझ्या विरहानेंच दुःखित झाला असावा. तुझा पिता शत्रुंजय माझा परमप्रिय शिष्य आहे आणि काशीचें तुझें स्वशुरगृहही माझ्या पूर्ण आज्ञेंत आहे. यामुळें सर्व गोष्टी आनंदपर्यवसायी होतील अशी मला खात्री आहे. मुली, तूं निश्चित हो ! "

विश्वामित्राचें भाषण चाललें असतां ती बालिका अश्रु गाळीत होती. परंतु अश्रु ढाळीत असतांना तिला मुळींच दुःख होत नव्हतें. तिच्या चर्येवर आनंदाची छटा दृग्गोचर होत होती. कांहीं काळ गेल्यावर ती बालिका म्हणाली,

" आचार्यांचे मजवर फार उपकार आहेत. "

आचार्य म्हणाले,

" मुली ! या गोष्टीकरितां तुला आठ पंधरा दिवस थांबावें लागेल. आणखी आठ दिवसांनीं ऋषिमंडळाचें संमेलन आहे. लंकेचे राक्षस आर्य स्त्रियांकरितां कसे बेहोश आहेत ही त्यांच्या पापाचरणाची कहाणी तूं त्या संमेलनांत सांगावीस आणि आर्यांच्या हलाखीचें शब्द-चित्र तुझ्या हातून रेखाटावें अशी माझी इच्छा आहे. तोंपर्यंत तूं अज्ञातवासांत रहा. "

असें सांगून विश्वामित्रानें रखवालदाराच्या कानांत कांहीं सांगितलें. आतां ती बाला रखवालदाराबरोबर जाण्यास तयार झाली व तिनें आचार्यास नमन केलें. ती जाणार इतक्यांत आचार्य म्हणाले,

"बाले, तूं तुझा एवढा वृत्तांत आम्हास सांगितलास; परंतु तुझें नांव कळविलें नाहींस ?"

बालेनें स्मित केलें तेव्हां तिच्या विलग झालेल्या ओष्ठांतून दंतपंक्तीचीं धवल किरणें चंद्राच्या किरणाशीं स्पर्धा करूं लागलीं.

ती म्हणाली,

"माझें नांव उत्तरा !"

●

## २

ती वनविहाराची छावणी नव्हती. राजधानीतील अनेक कारागिरांनीं केवळ चार दिवसांच्या अवधींत बनविलेलें तें छोटेसें नगरच होतें. तें कापडी नगर सर्व सुखसोईनीं भरलेलें होतें. राजा दशरथ याच्या इतमामास शोभेशी, ऐश्वर्यास न्यूनता न आणणारी आणि त्याच्या वैभवास शोभून दिसणारी अशी ती मनोज्ञ छावणी होती. राजघराण्यांतील निरनिराळे पुरुष आणि स्त्रिया यांच्याकरितां स्वतंत्र महाल, राजा दशरथ याचा विस्तीर्ण दिवाणखाना, भोजनगृहें, स्नानगृहें, विलासमंदिरें आणि इतर राजपुरुषांच्या स्वतंत्र सोईचीं ठिकाणें. अशा प्रकारची त्या प्रफुल्लनगराची विविध रचना होती. राजा दशरथानें वनविहार करण्याचें मुक्रर केलें,त्या दिवशीं त्या वनास 'प्रफुल्लवन' म्हणावें असें जाहीर झालें होतें. 'अनुचित' या नावानें त्या वनास कोणीही संबोधूं नये, असा हुकूम सुटला होता. तथापि त्याच्या मनावर झालेला चोवीस वर्षांवरचा प्रहार नामशेष झाला नव्हता. 'अनुचित' हें नांव बदललें; परंतु आपल्या हातून अनुचित कृत्य झालें याची रुखरुख आणि तळमळ त्याच्या मनांतून नष्ट झाली नव्हती.

'तुम्हीं जाणूनबुजून कोणाचीही हत्या केली नाहीं. पशु या समजुतीनें तुम्हीं शरसंधान केलें आणि दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, अनपेक्षित रीतीनें शरसंधानास एक ब्राह्मणकुमार बळी पडला म्हणजे ही जाणूनबुजून केलेली ब्रह्महत्या नव्हे ..'

अशा मधुर शब्दांनीं कैकयीनें राजा दशरथाच्या मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला आणि ' शोकदग्ध मातापितरांनीं शोकभरांत जे शब्द उच्चारले त्याला शापाचें प्रभावी स्वरूप येणार नाहीं. गेल्या चोवीस वर्षांत जो शाप सुप्तावस्थेंत पडून राहिला, तो पुन्हः प्रभावी बनेल हें म्हणणें चूक आहे. ' इत्यादि विविध प्रकारें कैकयीनें आर्जव करून राजाचें मन वनविहाराकरितां तयार केलें. परंतु राजाच्या मनाची तळमळ आणि रुखरुख नाहींशी झाली नव्हती. तो वरपांगीं सुखी असल्याचें भासवी. करमणुकीच्या प्रत्येक प्रकारांत तो भाग घेई. आहारविहारांत तो सर्व लोकांत संमिश्रित होई. परंतु त्याचा आनंद पूर्ण कोटीस कधींही गेला नाहीं. उदास मनानें, परंतु हसऱ्या मुद्रेनें तो बोले, चाले, व कार्यक्रमांत भाग घेई. त्याच्या मनांत खोल दडलेली तळमळ कोणाच्याही दृष्टीपथांत आली नाहीं.

आपल्या तंबूबाहेरील एका पलंगावर रात्रीचें शीतल चांदणें अनुभवीत राजा दशरथ पडला होता. मंत्री आणि राजपुरुष मुजरे करून निघून गेले होते. शेवटीं रामचंद्र आला. सुहास्यवदन रामचंद्रानें आपल्या पित्याच्या चरणीं मस्तक ठेवलें आणि माता कैकयी हिलाहि अभिवादन केलें.

" पूज्य पिताजी आणि प्रिय मातोश्री, तुम्हा उभयतांचें कुशल असो ! बाबा, या वनास तुम्हीं ' प्रफुल्लवन ' हें नांव दिलें, हें योग्य केलें. येथील प्रफुल्ल तरुराजी, प्रफुल्ल वनश्री आणि प्रफुल्ल हवामान यामुळें या वनास हें नांव सार्थ वाटतें. येथील शिकारीही प्रफुल्ल आहेत. "

"रामचंद्रा!" दशरथ म्हणाला, "ये, बैस. तुझ्या वाडवडिलांपासून या वनाला ' प्रफुल्लवन ' हें नांव चालत आलें आहे. राजकारणानें शिणलेलें मन रिझवण्याकरितां आणि शिकारीनें प्रफुल्ल करण्याकरितां तुझे आजेपणजे येथें येऊन विहार करीत, तेव्हां त्या जुन्या काळापासून या वनास ' प्रफुल्लवन ' असें नांव आहे. तुझ्या जन्मापूर्वी अनेकदां आम्हीं या वनांत विहार केला. परंतु एकदां शिकार करीत असतांना माझ्या हातून चुकून ब्राह्मणपुत्राची हत्या झाली. तेव्हांपासून या वनास ' अनुचित वन ' असें नांव पडलें आणि मींहि आजपर्यंत या वनांत पाऊल ठेवलें नाहीं. "

ही दुःखद आठवण नाहींशी व्हावी म्हणून रामचंद्रानें विषय बदलला.

" बाबा, उद्यां भोजनोत्तर नौकाविहाराचा कार्यक्रम आहे. अयोध्येहून नौका येथें आणविल्या आहेत. "

" रामचंद्रा, मी नौकाविहाराकरितां आलों नाहीं, तर नाहीं का चालणार ? तुम्ही सर्वजण आणि ही तुमची आई सुखानें जा. मी येथें स्वस्थ पडून राहीन. "

" बाबा, तुमच्याशिवाय आम्हांस नौकाविहाराचें सुख पूर्णपणें मिळणार नाहीं. "

" रामचंद्रा, त्या शरयू नदीच्या नजीकच एका ब्राह्मणकुमाराची हत्या माझ्या हातून घडली आणि मी येथें शापिला गेलों. चोवीस वर्षांचा दीर्घकाल लोटला तरी त्या शोकदग्ध मातापितरांची वाणी अद्याप माझ्या मनांत भीति उत्पन्न करते. "

असें म्हणून दशरथ राजानें दचकून भयभीत मुद्रेनें पाहिलें. कांहीं वेळानें तो पुन्हा म्हणाला,

" रामचंद्रा, तूं मला सोडून जाणार नाहींस ना ? तुझा विरह मला घडणार नाहीं ना ? मला कधींही सोडून जाणार नाहीं, असें वचन दे पाहूं. "

रामचंद्र सद्गदित होऊन पित्याजवळ गेला आणि म्हणाला,

"बाबा, भिऊं नका. तुमच्या पायाची सेवा हें माझें परमोच्च भाग्य आहे. हे पाय सोडून मी कोठेंही जाणार नाहीं. तुमच्या अनुज्ञेशिवाय मी कधींही अयोध्या सोडणार नाहीं. बाबा, शांत व्हा. "

त्यानंतर पितापुत्राचें फारसें भाषण झालें नाहीं. थोड्या वेळानें रामचंद्र मातापित्यास वंदन करून स्वतःच्या महालाकडे निघून गेला. आतां दशरथास बराच धीर आला होता. कैकई त्याचें मन रिझविण्याकरितां सुरेल वीणानाद करूं लागली. आपलीं गायनपटु बोटें अभ्यासु मनानें तारांतून खेळवून तिनें दशरथाचें मन आकर्षित केलें.

रामचंद्रास जाऊन अर्ध घटिका लोटली असेल तोंच "वाघ आला, वाघ आला" अशा आरोळ्या झाल्या. कैकईच्या हातांतील वीणा

गळून पडली आणि दशरथही भयभीत मुद्रेनें पाहूं लागला. इतक्यांत चांदण्यांतील चकाकणारे वाघाचे डोळे त्याच्या दृष्टीस पडले. दहा-पंधरा कदमांवर वाघ येऊन ठेपला आहे असें पाहून दशरथाची भितीनें गाळण उडाली. कोठें पळून जावें तर हातापायांतील शक्ति नाहींशी झालेली. ओरडावें तर तोंडांतून शब्द बाहेर पडेना! एका झांपेसरशीं आपणांस वाघ छिन्नविछिन्न करून टाकणार असें पाहून राजा दशरथानें डोळे झाकले. ककयी तर मूर्च्छितच झाली. वाघ दशरथ ही आपली शिकार हेरून, एक पाऊल मागें घेऊन दशरथावर उडी मारणार तोंच एका तरुणानें मध्यें येऊन ती उडी आपल्या छातीवर घेतली आणि वाघावर आपल्या तलवारीचा वार केला.वाघ जिकतो का तरुण जिकतो या विचारास लेशमात्र विलंब लागला नाहीं. एक बाण सूं सूं करीत वाघाच्या मर्मस्थानीं लागला.

"शाबास तरुणा!" रामचंद्र पुढें येऊन म्हणाला, "तूं येऊन माझ्या पित्याचें रक्षण केलेंस. तुझ्या साहसाची शाबास असो! वाघ बाबांच्या छावणीकडे जात आहे, हें मीं ऐकलें. त्या क्षणीं मी आलों. पण मी येण्यापूर्वी वाघानें बाबांवर झडप घेतली. ही झडप तूं जर तुझ्या छातीवर तोलून घेतली नसतीस तर बाबांचा देह छिन्नविच्छिन्न झाला असता. अपरिचत तरुणा, तूं माझ्या बाबांस जीवदान दिलेंस."

असें म्हणून रामचंद्र पित्यास सावध करूं लागला. राजवैद्य तेथें धांवत आले. थोडासा उपचार केल्यानंतर राजा दशरथ सावध झाला आणि कैकेयीही सावध झाली.

"रामचंद्रा, तुझी पुनर्भेट होईल, असें मला वाटलें नाहीं. मी वाघाच्या हातून खास मारला जात होतों. मी कसा वांचलों? येथें तर वाघाचें प्रेत दिसत आहे! एकबाणी रामचंद्रा, तुझेंच हें कृत्य! तूंच मला वांचविलेंस. तूं शतायु हो."

रामचंद्र म्हणाला,

"बाबा, माझ्या बाणानें वाघ मारला गेला ही गोष्ट खरी. पण तुमच्या अमोल जीवनाचें संरक्षण या तरुणानें केलें."

जवळच उभ्या राहिलेल्या तरुणाकडे दृष्टिक्षेप करून दशरथ म्हणाला,

" तुम्ही कोण आणि कोठचे ? या, बसा. मी तुमचे शतशः आभार मानतों."

"महाराज," तो तरुण म्हणाला, "माझी माहिती मला देतां येत नाहीं याबद्दल क्षमा करा."

"तूं कोणीही अैस" राजा दशरथ म्हणाला, "पण तूं आज राजा दशरथाचे प्राण वाचविले आहेस. या बहुमोल कामगिरीबद्दल आम्हीं तुला काय द्यावें ? मोठें इनाम, मनमानेल तितकी संपत्ति किंबहुना राज्याचा भाग तुला देण्यास दशरथ राजा तयार आहे. बोल, तुला काय पाहिजे? "

"महाराज, मीं केलेलें साहस कोणत्याही वीरास जरूर असेंच केलें. मला आपल्या समीप लवकर येतां आलें आणि वाघाच्या झापेस झुंज देऊन मला तुम्हांस वांचवितां आलें. अयोध्येचा राजा माझ्यामुळें वांचला, एवढे धन्योद्गार मीं रामचंद्राच्या मुखांतून ऐकले एवढेंच बस्स आहे. मला कोणतेंही पारितोषिक नको आणि देतच आहांत तर राजा दशरथाजवळ त्याचा शरीररक्षक म्हणून राहण्याचा मान मला कांहीं काळ द्या."

"अनपेक्षित तरुणा, तुझी विचित्र मागणी पूर्णतया मंजूर आहे; तरी पण पुन्हा विचार कर आणि आज, उद्यां, परवां केव्हांही जें मागशील तें तुला मिळेल असें एकवचनी रामाचें तुला वचन आहे." राम म्हणाला.

या सुमारास दशरथाचें सर्व राजघराणें दशरथाच्या भोंवती गोळा झालें. सदयहृदयी कौसल्या दशरथाच्या उशाशीं बसून त्यास वारा घालूं लागली. साध्वी सीता कैकईजवळ बसून गोड शब्दानें तिला धीर देऊं लागली. शूर लक्ष्मण अशा जिवावरच्या प्रसंगीं आपण नव्हतों, याबद्दल खेद करून अपरिचित तरुणाच्या साहसाची प्रशंसा करूं लागला. लक्ष्मण म्हणाला,

"वीर पुरुषा, तुझें नामाभिधान काय ? आम्हीं तुला काय म्हणून संबोधावें ?"

अत्यंत विनयशील व नम्र भाषेंत तो तरुण म्हणाला,

"आज मला माझी माहिती देतां येत नाहीं. केव्हां तरी तो काळ

येईल आणि मी आपली माहिती तुम्हांस देईन. मी आपणामध्यें राहण्यास लायक आहें हें मात्र मी तुम्हास कळवितों."

"आपल्या वीरोचित कृतीनें तुम्हीं आपली लायकी पूर्ण शाबीत केली आहे." रामचंद्र मधुर भाषेंत बोलला, "ती कळविण्याचें मुळींच कारण नाहीं. लक्ष्मण, आपणांस याचें नांव कळेपर्यंत आपण यांस प्रफुल्लकुमार या नांवानें ओळखूं."

चाणाक्ष वाचकांस कळविण्याचें कारण नाहीं. प्रफुल्लकुमार हा विश्वामित्राचा प्रेरित प्रसेनजित आहे. काशीचा युवराज आणि उत्तरेचा विरही पति तो हाच.

सीतादेवी आपल्या पतिदेवाजवळ उभ्या राहिलेल्या प्रफुल्लकुमाराकडे विस्मयानें पाहूं लागली. वाघाच्या पंजानें झालेल्या त्याच्या छातीवरील जखमा तिच्या दृष्टीस पडल्या. ती गडबडीनें त्याच्या निकट गेली. आपल्या उत्तरीयाचा एक पदर तिनें फाडला आणि त्या कपड्यानें प्रफुल्लकुमाराच्या छातीवरील रक्त टिपूं लागली. ती म्हणाली,

"बन्धो, या तुम्हांस झालेल्या जखमांची स्मृतिही तुम्हांस नाहीं? वाघानें आपल्या पंजानें या जखमा केल्या असाव्यात." राजा दशरथाच्या शुश्रुषेकरितां आलेला वैद्य अद्याप परतला नव्हता. तो चट्दिशीं प्रफुल्लकुमाराजवळ आला.

"वहिनी" लक्ष्मण म्हणाला, "तुम्हीं बाबांच्या प्राणदात्याबद्दल चांगली आपुलकी दाखविली. वैद्यराज आले आहेत ते योग्य ती काळजी घेतील."

"सीतादेवी" प्रफुल्लकुमार म्हणाला, "मी तुमचा फार आभारी आहें. मला फार लागलेलें नाहीं. आपला पवित्र हात माझ्या जखमांना लागला तेव्हांच त्या बऱ्या झाल्या आहेत."

ती रात्र सीतादेवीनें कैकईजवळ आणि कौसल्येनें दशरथाजवळ बसून घालविली. रामलक्ष्मणही जवळच बसलेले होते. प्रफुल्लकुमाराचा पहारा चालू होता. मध्यरात्र झाल्याची नौबत झडली. तेव्हां दशरथानें आपणांस पूर्ण बरें वाटतें, असें सांगून सर्वांस विश्रांति

घेण्यास सांगितलें. राजाज्ञेप्रमाणें सर्व लोक निघून गेले. परंतु प्रफुल्लकुमाराचा पहारा मात्र चालूच राहिला.

या अनपेक्षित घटनेमुळें नौकाविहाराचा कार्यक्रम एक प्रहरानें पुढें ढकलला गेला. राजा दशरथाचें मन नौकाविहारास जाण्याकरितां कैकईनें मोठ्या चातुर्यानें वळविलें.

सायंकाळचा सूर्य वस्तुमात्रास सुवर्णानें मढवीत होता. शरयूचें पाणी सुवर्णमय बनलें होतें, इतकेंच नव्हे तर शरयूच्या किनाऱ्यावरील लहानमोठी तरुराजी सुवर्णमय झालेली दिसत होती. नौकाविहाराकरितां चार नौका सज्ज झाल्या होत्या. राजा दशरथानें नौकेंत पाय ठेवल्याबरोबर सर्वांनीं नौकेवर चढावें असा हुकूम झाला होता. तोंच चारणभाटांनीं ' राजा दशरथ येत आहे ' अशी माहिती आपल्या कवितांतून गाईली. चार अश्वांच्या सुवर्णरथांतून दशरथ आणि रामचद्र यांच्या स्वाऱ्या तेथें आल्या. राजा दशरथ प्रफुल्लकुमाराच्या मदतीनें खालीं उतरला. त्यास नौकेपर्यंत पन्नास कदम पायीं जावयाचें होतें. प्रफुल्लकुमार आणि दुसरे दोन संरक्षक यांच्या मदतीनें राजा दशरथ हळूहळू मार्ग क्रमू लागला. अनपेक्षित रीतीनें निम्मा अधिक मार्ग आक्रमिल्यानंतर राजा दशरथ उभा राहिला आणि त्यानें आसमंतांतील सृष्टी अवलोकन केली. त्यासरशीं चोवीस वर्षांपूर्वीचें चित्र त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. आपल्या बाणानें विव्हळ झालेला श्रवणकुमार आपणांस केविलवाण्या मुद्रेनें ' आपल्या मरणाची बातमी आपल्या अंध मातापितरास कळवा ' असें अजिजीनें विनवत आहे. हें दगडाला पाझर फोडणारें दृश्य त्याच्या नजरेसमोर मूर्तिमंत उभें राहिलें. तो नौकाविहाराचा कार्यक्रम विसरला. त्याला जुनें दृश्य दिसू लागलें. त्याच्या कानानें मातापितरांचा विलाप ऐकला. चोवीस वर्षांपूर्वीची शापोक्ति त्याला जशीच्या तशी ऐकूं आली. तो कोलमडून खालीं पडला आणि ' नाही, नाहीं; मी अपराधी नाहीं ' असे कांहीसे उद्गार काढीत बेशुद्ध झाला. नौकाविहाराचा विचार आपोआपच रद्द झाला. बेशुद्धावस्थेंतच पुन्हा दशरथास उचलून रथांत घातलें आणि त्याला छावणींत परत आणलें. त्याला शुद्धीवर आणण्याकरिता राजवैद्यांनीं बराच वेळ प्रयत्न केले.

परंतु तो शुद्धीवर आला नाहीं. कैकईनें नौकाविहारास पतीचें मन वळविलें, याबद्दल अत्यंत पश्चात्ताप व्यक्त केला.

कित्येक घटका उलटल्या. राजा दशरथ शुद्धीवर येत नाहीं हें पाहून रामचंद्रास दारुण चिंता उत्पन्न झाली. राजस्त्रिया तर अश्रु-विमोचन करूं लागल्या. अखेर मध्यरात्रीच्या सुमारास दशरथानें डोळे उघडले; परतु तो इतक्या चमत्कारिक दृष्टीनें आसपास पहात होता कीं, 'त्याची बेशुद्ध अवस्थाच कायम आहे' असें राजवैद्यांचें म्हणणें होतें.

"रामचंद्रा, तूं मला अखेर सोडून गेलास ना ? अखेर शापाची वाणी खरी ठरली ना ?" असें दशरथ बेहोषपणें बरळूं लागला.

तेव्हां रामचंद्र पुढें आला व म्हणाला,

"हा मी तुमचा राम. बाबा, मी तुमच्यापासून दूर गेलों नाहीं."

पण रामचंद्राचें भाषण ऐकण्याच्या अवस्थेंत राजा दशरथ नव्हता. तो वारंवार डोळे उघडून विलक्षण दृष्टीनें पाही आणि तेच ते उद्गार काढी. राजवैद्यांनीं कंटाळून अखेर त्यास निद्रेचें औषध दिलें. राजा दशरथ पांच घटिकांपर्यंत निद्रेच्या स्वाधीन होता. त्यानें डोळे उघडले नाहींत किंवा तो कांहीं बरळलाहि नाहीं. राजवैद्य त्याची नाडी वरचेवर तपासून पहात होते. अखेर पहांटेच्या वेळीं राजाची नाडी सुधारत चालली आहे असें त्यांनीं सांगितलें आणि आपलें समाधान व्यक्त केलें. रामचंद्र, लक्ष्मण, कौसल्या, कैकई, सुमित्रा, सीता आणि प्रधानजी इत्यादि सर्व लोकांचे डोळे निद्रिस्त राजा दशरथा-कडे लागले होते.

उषःकालच्या सुमारास राजा दशरथ शुद्धीवर आल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. कांहीं वेळानें त्यानें आपले डोळे उघडले. रामचंद्राकडे आणि जमलेल्या सर्व व्यक्तींकडे त्यानें सहेतुक दृष्टीनें पाहिलें.

"रामचंद्रा, तूं मला सोडून गेला नाहींस ना ? मी एक शोकपूर्ण स्वप्न पहात होतों. रामचंद्रा, तूं मला सोडून गेलास हा फक्त माझ्या मनाचा भ्रमच ना ?"

रामचंद्राच्या डोळयांत अश्रू उत्पन्न झाले. त्यानें आपल्या पित्याचा

हात आपल्या हातांत घेतला आणि दुसरा हात त्याच्या डोक्यावरून फिरवित गद्गदित वाणीनें तो म्हणाला,

" मी रात्रभर तुमच्या पायाजवळ उभा आहें. बाबा, तुमच्या घोर स्वप्नांतून तुम्ही जागे झालांत ना? तुमच्या अनुज्ञेशिवाय मी अयोध्या सोडणार नाहीं, हें माझें वचन तुम्हीं कालच घेतलें ना? बाबा, आतां तुम्हांस कसें वाटतें ? "

" एका दुष्ट स्वप्नाच्या तावडींत मी सांपडलों होतों; परंतु तुम्हीं येथें मला अधिक काळ ठेवलें तर पुन्हा मी त्या स्वप्नाच्या तावडींत सांपडेन. जलदी करा आणि मला अयोध्येस घेऊन चला."

त्यानंतर राजा दशरथ अधिकाधिक सावध होत गेला. पूर्ण शुद्धीवर आल्यानंतर त्यानें सुमंत प्रधानास बोलाविलें आणि त्यांनीं प्रातःकालीं अयोध्येकडे परत कूच करण्याचा विचार मुक्रर केला.

दुसरे दिवशीं सूर्योदयास तेथें एकहि मनुष्यप्राणी उरला नाहीं. अनुचित वनांतील वनविहाराचा शेवट असा अनपेक्षितपणें अनुचित झाला.

# ३

आर्यांचा भारत-विजयाचा इतिहास जितका चित्ताकर्षक आहे, तितकाच तो रोमांचकारीहि आहे. अनेक युद्धें लढावीं लागलीं, अनेक कारस्थानें करावीं लागलीं, सामदामादि सर्व मार्ग आलटूनपालटून योजावे लागले. त्यांच्या निरर्गल बुद्धिमत्तेस विलक्षण ताण पडेल अशा युक्त्या योजाव्या लागल्या. तेव्हां आर्यांचा यशोमंदिरांत प्रवेश झाला. भरतखंडांतील आदिवासी लोक संस्कृतिहीन नव्हते आणि रानटी तर नव्हतेच नव्हते. दस्युंचीं प्रबळ राज्यें भरतखंडाच्या उत्तर भागांत भरभराटीस आलेलीं होतीं. नाग लोकांची संस्कृति आर्य लोकांच्या संस्कृतीच्या तोलाची होती. भरखंडासारखा सर्व सुख-

सोयींनीं युक्त असा देश कोणीहि आदिवासी सोडण्यास तयार नव्हता. नाग लोकांना आपल्यांत संमिश्रित करून घेऊन दस्युंशीं रक्तपाताचीं युद्धें करून आणि आदिवासीयांशीं अनेक युक्त्या प्रयुक्त्या योजून आर्यांनीं आर्यावर्तभर मोठ्या चातुर्यानें आर्यांचीं राज्यें निर्माण केलीं. हा राजकारणांतील चातुर्याचा खेळ कोणा एखाद्या व्यक्तीकडून खेळला गेला काय? का एकादी संघटित शक्ति त्याच्या बुडाशीं होती? इतिहासाचें संशोधन केलें तर कोणीहि एखादी व्यक्ति अगर घराणें भारतीय यशास कारणीभूत झालें असें म्हणतां येत नाहीं. दस्युंशीं प्रबळ युद्धें करणारे अनेक राजे महशूर होते. एखाद्या विरोधी दस्यु राजास एखाद्या विजयी आर्य राजानें पादाक्रांत केलें असेल. परंतु आर्य राज लोकांनीं दस्युंच्या नाशाकरितां सुसंघटित शक्ति कधींहि निर्माण केली नाहीं.मध्येंच एकादा दस्यु राजा वर डोकें काढी आणि त्याचें निर्मूलन एखादा आर्य राजा मोठ्या चातुर्यानें करी. दस्युंचें समूळ निर्मूलन करावें, आदिवासीयांस देशोधडीस लावावें, नाग लोकांस सामानें आपल्यांत संमिश्रित करून घ्यावें, ही घटना संघटित शक्तीच्या अभावीं फोल ठरली असती. तत्कालीन राजे आपलीं वैयक्तिक राज्यें संभाळीत. याकरितां ते परस्परांत युद्धें करीत. एवंच सुसंघटित संघशक्तीचा पूर्ण अभाव राजे लोकांत होता. परंतु ज्ञानवृद्ध तपोनिधी यांना आर्यांचें साम्राज्य भरतखंडभर बनवावयाचें होतें. ते ज्ञानानें सर्वश्रेष्ठ असून वैयक्तिक तपासाधनापेक्षां हें संघटित राजकारण चालवीत असत. राजा दशरथाच्या दरबारीं वसिष्ठ वामदेव होते. ते केवळ धर्मशास्त्राचा अर्थ करण्याकरितां म्हणून नव्हते. नारदाचा संचार सर्व आर्य राज्यांतून होता. तो का केवळ कलह लावण्याकरितां होता? शस्त्रास्त्रकलेंत विश्वामित्रांनीं श्रीरामचंद्रास निपुण केलें तें काय केवळ कलेचेंच ज्ञान द्यावें म्हणून? आर्यावर्तांतील प्रत्येक आर्य राज्यांत एखाददुसरा तरी तपस्वी मंत्री म्हणून राजकारणास मदत करी. यावरून एकच अनुमान निघतें कीं, तत्कालीन ऋषी आणि मुनि आपलें तपश्चरण करीत आणि गुरुकुलें चालवून जनतेच्या शिक्षणाचें कार्य करून त्यांना प्रचलित राजकारणाशीं अभिमुख बनवीत असत. राजांच्या दरबारीं राहून आपलें नियोजित संघटनेचें कार्य करण्यास राजे लोकांस ते सुसज्ज ठेवीत. या ज्ञानवृद्ध

लोकांनीं अनेक संमेलनें संघशक्ति वाढविण्याकरितां गिरिकंदरांतून भरविलीं असतील. त्याचा उल्लेख इतिहासाच्या अभावीं आपणांस कोठें सांपडणार ?

रामायणकालीं सिद्धाश्रमांत असें एक मोठें संमेलन विश्वामित्रांनीं बोलाविलें होतें. आर्यावर्तातली सारी विद्वत्ता सिद्धाश्रमांत एकत्रित झाली होती. हिमाचलाच्या शिखरापासून विंध्याद्रीच्या पायथ्यापर्यंत सर्व विद्वान तपस्वी, मुनी आणि गुरुकुलें चालविणारे मोठमोठे पंडित यांचा जमाव सिद्धाश्रमांत जमला होता. जमलेल्या मंडळींत अयोध्येचे वशिष्ठ-वामदेवहि चमकून दिसत होते. काशीचे तपोनिधी भारद्वाजमुनी, तक्षशीला विद्यापीठ चालविणारे विद्वान पंडित गोविंदवल्लभ आणि आर्यावर्तांतील सर्व तपोनिधि ब्राह्मण सिद्धाश्रमांत एकत्रित झाले होते त्यांची तपसंपन्न मुखचर्या त्यांच्या विद्वत्तेची साक्ष पटवीत होती. परमपवित्र नारदमुनीहि सम्मेलनाच्या दिवशीं उपस्थित झाले. त्यांना राहण्याकरतां सिद्धाश्रमांतील जागा मोकळ्या केल्या होत्या.स्नानसंध्येकरितां निकटवर्ती गंगानदी, आहार-विहाराकरितां विश्वामित्रांचा समृद्ध सिद्धाश्रम आणि आर्यांचा उत्कर्ष हें मनोवांछित कार्य, यामुळें सर्व पाहुणेमंडळी अत्यंत उल्ह-सित दिसत होती. त्यांची स्वाभाविक तपसंपन्न मुखचर्या आज अधिक तेजस्वी दिसत होती.

गंगानदीच्या दक्षिण तीरावर सिद्धाश्रमापासून कांहीं अंतरावर एक विस्तीर्ण मंडप उभारला होता. वस्तुत: सिद्धाश्रमांत सभेला उपयुक्त अशा अनेक विस्तीर्ण जागा होत्या. परंतु छात्रवर्गापासून अगदीं अलिप्त असें सभागृह असावें, सभेंत काय चाललें आहे याची गंधवार्ताहि इतरेजनास होऊं नये असा विश्वामित्राचा कडक निर्बंध होता. सभेचें काम अत्यंत गुप्त रीतीनें चालावें अशी विश्वामित्राची ताकीद होती. सभामंडप ध्वजापताकांनीं सुंदर बनविला होता. व्यास-पीठावर दहाबारा व्यक्तींना बसण्यास जागा राखून ठेविली होती. नियोजित सभापतीचें स्थान व्यासपीठावर मध्यभागीं केलें होतें. व्याघ्रचर्माचें आसन सभापतीकरितां असून बाकी व्यासपीठावरील आसनें हरिणचर्माचीं होतीं. बाकी सर्व सभागृहांत उंची गालि-चांची बैठक होती. नियोजित वेळेपूर्वी एक घटिका विश्वामित्राची

स्वारी सभागृहाच्या द्वाराशीं येऊन उभी राहिली. हळुंहळुं सभागृह निमंत्रित पाहुण्यांनीं भरूं लागलें. पाव घटिका अगोदर सभेची वेळ सुचविणारा भेरीनाद झाला आणि वशिष्ठ-वामदेव, गोविंदवल्लभ, भारद्वाजमुनी, हरिद्वारचे विद्वान पंडितांसमवेत नारदमुनींची स्वारी तेथें आली. त्या सर्वांचें स्वागत विश्वामित्रांनीं हास्यमुद्रेनें हात जोडून केलें. सर्व मंडळी आपापल्या स्थानावर विराजमान झाल्यावर नारद-मुनींचा सर्व जमलेल्या लोकांनीं जयजयकार केला. त्या जयजय-कारांत नारदमुनी सभापतीच्या स्थानावर विराजमान झाले. व्यास-पीठावर सभापतीजवळच वशिष्ठ-वामदेव, विश्वामित्र आदिकरून ऋषींचीं आसनें होतीं.

विश्वामित्रांनीं जमलेल्या सर्व विद्वान मंडळीचें स्वागतपर भाषण केलें. ते म्हणाले,

"अखिल विद्यासंपन्न आणि समग्र ज्ञानविभूषित परमपवित्र नारदमुनि! तुमचें आणि जमलेल्या श्रेष्ठ श्रेष्ठ तपोनिधीचें मी हार्दिक स्वागत करतों. अनियमित सूर्यप्रकाश आणि अनियमित ऋतु यांना कटाळून आपल्या थोर पूर्वजांनीं आपलें मूळचें वसतिस्थान सोडलें आणि चांगलें जग शोधण्याकरितां वर्षानुवर्षें प्रयत्न केला. तेव्हां कोठें भरतखंडासारखा सुसंपन्न देश आपणांस सुदैवानें लाभला. अन्नपाण्यानें समृद्ध, खनिज पदार्थांनीं समृद्ध, ऋतुमानानें अत्यत सुख-कारक आणि सृष्टिदेवतेचें जणुं माहेरघर असा हा देश आहे. हिमा-लय-विंध्याद्रिसारखे पर्वत उशापायथ्याशीं रखवाली करीत आहेत. गंगासिंधूसारख्या पवित्र नद्या धनधान्याची समृद्धि करण्याकरितां देशभर संचार करित आहेत. सुंदर बागा आणि उपवनें नयनास आल्हाद देऊन गोडगोडशीं फळें आपणांस अर्पण करीत आहेत. भर-गच्च धान्यांनीं भरलेलीं शेतें आणि विपुल खनिज पदार्थांनीं भर-लेली पृथ्वी यामुळें येथील जीवन सुखावह झालें आहे. अत्यंत रुचकर आणि पुष्टिकारक दुग्ध येथील गाई आपणांस विपुलतेनें देत आहेत. एवंच देवांनीं स्वतःस राहण्याकरितां म्हणून अत्यंत सुंदर, अत्यंत उपयुक्त, अत्यंत समृद्ध असा बनविलेला हा देश आपलें भाग्य म्हणून आपणांस मिळाला. आपल्या पूर्वजांनीं येथेंच राहून आपलें साम्राज्य

बनवावें असा हेतू मनांत धारण केला आणि ती थोर महत्त्वाकांक्षा आज फलप्रद झालेली दिसत आहे.

"आपल्या सर्वांच्या दीर्घ प्रयत्नानें आपलें मनोवांछित कार्य आतां पूर्णपणें शेवटास गेलें आहे अशी खात्री मनास पटूं लागली आहे. शत्रूचे उरलेसुरले अंकुर राजा दशरथानें खणून काढले आहेत आणि आतां विरोधी शक्ति कोठेंहि डोकें वर काढीत नाहीं.

"विद्वत जनहो ! एवढा मोठा विजय संपादन केला, याला कारण सर्वस्वीं आपण झालेले आहांत. आतां देशांत आपणांस शत्रू राहिला नाहीं. आपल्या संस्कृतीचा विकास करून ऐश्वर्याचें उच्चतम शिखर गाठावयाचें एवढेंच बाकी राहिलें आहे. तें कालेकरून हळुंहळुं तडीस जाईल. आमचीं गुरुकुलें आणि शिक्षणकेंद्रें आपली संस्कृति उज्ज्वल करण्याचा प्रयत्न करीत आहेत. राजदरबारांतून आपले कवि आणि वाङ्मयप्रणेते यांना भरपूर आश्रय मिळूं लागला आहे आणि सर्वांचें लक्ष संस्कृति उच्चतम करण्याकडे वेधलें आहे. इतकें मोठें कार्य गिरिकंदरांत राहणाऱ्या आम्हीं ऋषिमुनींनीं तडीस नेलें, याबद्दल आपण धन्यतेस पात्र आहोंत. तथापि कार्य तडीस गेलें; आतां आपल्या संघटनेची काय जरूर, असें मात्र तुम्ही म्हणूं नका.

"साम्राज्य मिळविलें; हें मिळवितांना संघटनेची जितकी जरूर होती, तितकीच किंबहुना त्यापेक्षा अधिक साम्राज्य रक्षण करण्याकरितां संघटनेची जरूरी आहे. फळाच्या ठिकाणीं मधुरपणा उत्पन्न झाला असतांना जितकी कीटकजंतूपासून त्यांस भीति असते त्याच्यापेक्षां कमी भीति फळ पक्व झालेलें नसतें तेव्हां असतें. फळाची माधुरी आणि गोडी पाहून आणि पक्व फळाचा सुंदर वर्ण अवलोकन करून खादाड गिधाडांच्या त्यावर उड्या पडतात. हृदयंगम आणि सुपीक देश, रूपवान, ऐश्वर्यशाली आणि मनोज्ञ अशीं तेथील माणसें, स्वच्छ आणि नयनमनोहर अशी त्यांची राहणी हें पाहिलें म्हणजे आसपासचा स्वार्थी देश त्यास गट्ट करण्यास टपून बसणार अशी भीति मित्रहो ! आतां उत्पन्न झालेली आहे. घरातले शत्रू संपले. हे उंबरठ्याशीं असणारे नवे शत्रू आपणावर झडप घालण्याकरितां टपले आहेत. हें भावी संकट आमच्या राजे लोकांच्या लक्षांत येत नाहीं. आपण अत्यंत सुविचारी, चाणाक्ष आणि राष्ट्राची काळजी

बाळणारे थोर पुरुष आहात. आकाशगामी विद्या ज्यांच्यापुढें हात जोडून उभी आहे असे आमचे नारदमुनी विश्वभर संचार करून सर्व परिस्थितीचें अवलोकन करून आलेले आहेत. मी कोणाबद्दल बोलतों हें तुमच्या लक्षांत आलें असेल. आपल्या शत्रुस्थानीं कोण आहे याचा कयास आपण काढला असेल! तुमचें उद्दिष्ट धर्मकार्य एकहि तडीस जाऊं द्यावयाचें नाहीं. तुमच्यावर अचानक हल्ले करून अथवा योग्य असा भ्रष्टाकार करून तुमच्या धर्मकार्यांत ज्यांनीं विघ्नें उत्पन्न केलीं आहेत तें दक्षिणेचें रावणी राज्य आपल्या शत्रुस्थानीं आहे. केवळ धर्मकार्यांतच ते विघ्नें आणतात असें नाहीं, तर नागरिकांच्या वित्ताचें अपहरण करण्याचा सपाटा त्यांनीं जोरानें चालूं केला आहे आणि याच्याहि पलीकडे जाऊन प्रत्येक आर्यास शरम वाटावी अशा गोष्टी घडूं लागल्या आहेत. आर्यावर्तांतील अप्रतीम सौंदर्यावर यांचा डोळा आहे. सुंदर स्त्रियांच्या चोऱ्या हा तर आतां नेहमींचा विषय बनला आहे. या सर्व गोष्टीचें पर्यवसान, विचारी विद्वज्जनहो! कोणत्या थरापर्यंत जाईल याचा विचार करा. आपल्या वतीनें आपले सभापति नारदमुनी लंकाधीशाकडे शिष्टाई करण्यास गेले होते. त्यांचा वृत्तांत आपण ऐकूं. एका रूपवती राजकन्येस लंकेस जबरदस्तीनें पळवून नेलें. तिची कर्मकहाणी आणि अनेक भारतीय कन्यका कशा विपत्तींत आणि अपमानांत दिवस काढत आहेत याचा वृत्तांत आपण ऐकूं आणि नंतर शत्रु उपेक्षणीय नाहीं असें ठरल्यास त्याचें निर्मूलन कसें करावें, कोणत्या मार्गांनीं या रावणी राज्यापासून आपणास उपद्रव पोंचणार नाहीं, आपलें स्वातंत्र्य नष्ट होणार नाहीं याचा आपण विचार करूं. माझ्या मतें हें भावी संकट फार मोठें आणि भयानक आहे आणि वेळेवर जागे होऊन उपाययोजना केली नाहीं तर आपल्या हालास सीमा राहणार नाहीं. मी आतां नारदमुनींना विनंति करितों कीं, त्यांनीं आपल्या शिष्टाईचा वृत्तांत कळवावा.”

इतकें बोलून विश्वामित्र खालीं बसले.

गोड, गंभीर आणि सुरेल अशा भाषेंत नारदमुनी बोलूं लागले. त्यांचें भाषण चाललें तेव्हां गायनाचा सुरेलपणा श्रोत्यांच्या प्रत्ययास येई.

ते म्हणाले,

" तुम्हीं सर्वांनीं आपल्या उद्दिष्ट कार्यांत जी थोर मदत केली, त्याबद्दल भावी पिढींतील आर्य तुमची मुक्त कंठानें प्रशंसा करतील. तुमची कामगिरी घेऊन शिष्टाईकरितां मी सोन्याच्या लंकेस गेलों, दोन मासपर्यंत तेथें निवास केला, सर्व परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन केलें, लंकेच्या रावणाची संस्कृति किती उच्चतम आहे, त्याचें वैभव, ऐश्वर्य आणि संपत्ति कशी मनमुराद आहे, त्याचें सेनाबल किती प्रचंड आहे, त्याचे मंत्री किती बुद्धिमान आणि समर्थ आहेत, त्यांच्यांतील एकी कशी अभेद्य आहे, या गोष्टी मीं प्रत्यक्ष पाहिल्या. दशमुखी रावणाची मीं मुलाखत घेतली. या मुलाखतींत काय काय घडून आलें याचा उल्लेख मी करणार आहें. आपली संस्कृति उत्तम असा अभिमान आपण बाळगतों. पण लंकेच्या रावणाची संस्कृति कांहीं हलक्या दर्जाची नाहीं. रावण स्वत: मिजासखोर आणि ऐषआरामी असला तरी त्याची कर्तव्यदक्षता अवर्णनीय आहे. आसपासचे देश लुबाडून त्यानें जगांतील संपत्ति लंकेस एकत्रित केली आहे आणि त्यामुळें सोन्याची लंका असें नांव त्याच्या राजधानीस मिळालें आहे. मी तेथें जाऊन रावणाचा मुख्य मंत्री अग्निरथ याच्याकडे उतरलों. त्याच्या मदतीनें एक महिना प्रयत्न केल्यानंतर रावणानें मला मुलाखत दिली. दशमुखी रावण ही संज्ञा ऐकल्यानंतर रावणास दहा मुखें आहेत काय असा प्रश्न सहज निघतो. परंतु राजाधिराज रावण हा तुमच्या आमच्याप्रमाणेंच दोन हातापायाचा व एक तोंडाचा बलिष्ठ मनुष्य आहे. तो दरबारांत आला म्हणजे त्याचे नऊ मंत्री त्यास राज्यकारभाराचे कामीं मदत करीत असतात. रावणाच्या मंत्र्यांत कधींहि बेबनाव होत नाहीं. ते नेहमीं रावणाशीं सहमत असण्याचा प्रयत्न करतात. म्हणून रावण बोलेल त्याचेंच प्रतिबिंब प्रत्येक मंत्र्याच्या भाषेंत उत्पन्न होतें आणि हे नऊ मंत्री व दहावा रावण हे सहमताचे असल्यामुळें दशमुखी रावण असें नांव पडलें आहे.

" सूर्योदयानंतर दोन घटिकांनीं दरबार भरतो. दरबारचें काम दहा घटिकांपर्यंत दररोज चालतें. त्या वेळीं रावण इतका राजकारणांत व्यग्र असतो कीं, त्याच्या मिजासखोरीस अथवा ऐषआरामास लेषमात्रहि वाव मिळत नाहीं. मंत्री अग्निरथ हा अत्यंत विचारी आणि शीलवान आहे. रावणाचे बरेच थेर त्यास पटत नाहींत. दर-

बारची मिजास आणि ऐषआराम त्यास आवडत नाहीं आणि ' अति तेथें माति ' या न्यायानें ती सत्ता केव्हांतरी उलथून पडेल असें त्याचें प्रामाणिक मत आहे. परंतु त्यालाहि रावणाशींच सहमत व्हावें लागतें.

"भारतीय आर्यांस रावणी राज्य कमकुवत व हीनबल असें मानतें. जगांतील सर्व संपत्ति आणि सुंदर वस्तु याजवर न्यायानें आपला हक्क चालतो असा रावणी राज्याचा दावा आहे. जगांत जगण्याजोगे जर कोणी असेल तर ते केवळ आपण, असा रावणी राज्याचा अहंकार आहे. जगांतील इतर मनुष्यप्राण्यास ते कीटक किंवा जंतू समजतात. जगांतील सर्व सौंदर्य हें आपल्या उपभोगाकरितां आहे असा त्यांचा दृढविश्वास असल्यामुळें ती सुंदर वस्तु कोणत्याहि मार्गांनीं व कितीहि जबरदस्ती करून ते हस्तगत करतात. जगभर चाललेली देवतांची पूजा-अर्चा त्यांना असह्य होते. आपणास परमेश्वर मानून इतरेजनांनीं आपली सेवाचाकरी करावी अशी त्यांची घमेंड आहे. त्यामुळें आपल्या धर्मकार्यात विघ्नें करणें त्यांच्या दृष्टीनें न्यायाचें ठरलें आहे.

"मुलाखतीचे वेळीं आमच्या धर्मकार्यांत तुम्हीं विघ्नें आणू नयेत अशी एक माझी मागणी होती. तेव्हां रावण विकट हास्य करून म्हणाला,

" 'हें धर्माचें तुमचें थोतांड अत्यंत हास्यास्पद आहे. त्याच्यामध्यें देवता मानून दगडधोंड्यांची पूजा करणें किंवा कांहीं आकृति काढून त्याची पूजा करणें आणि त्यास धर्मकार्य म्हणणें हा सगळा मूर्खांचा बाजार! तुम्हांस देवता म्हणून पूजा करणें असेल तर तुम्ही आमची पूजा करा. त्यांत तुम्हांस व्यत्यय येणार नाहीं. ' असें रोखठोक उत्तर रावणानें दिलें आणि त्याच्या नऊ मंत्र्यांनीं त्याच्या या म्हणण्यास मान डोलविली.

" दुसऱ्या मुलाखतीचे वेळीं आमची चीजवस्तु तुमचे लोक चोरून जबरदस्तीनें नेतात, त्यास आळा घालावा ही माझी दुसरी मागणी त्याच्यासमोर ठेविली, तेव्हां राजा रावण यानें भलताच सिद्धांत मजपुढें मांडला. त्याच्या मतें जगांतील सर्व सुंदर वस्तु ज्या आमच्या जरूरीच्या आहेत त्याच्यावर हक्क प्रस्थापित करून त्या आपल्या ताब्यांत

घेणें हें आपलें काम. असें करण्यास आमच्या नागरिकांस आम्हीं पूर्ण मुभा दिली आहे. विरोध होईल तेव्हां आमच्या सैन्याच्या मदतीनें त्यास हव्या असतील त्या सुंदर वस्तु त्यांना प्राप्त होतात. आम्ही मागणी करूं तोंपर्यंत त्या सुंदर वस्तु संरक्षण करण्याचा हक्क तुमचा. यापलीकडे जाऊन आमच्या मूलभूत तत्त्वास विरोधी अशी तुमची तक्रार मुळींच चालणार नाहीं. सुंदर स्त्रियांना त्यांच्या इच्छेविरुद्ध पळवून नेण्यांत येतें; त्यांच्यावर जुलुम जबरदस्ती करण्यांत येते; त्यांना अन्यायानें येथें आणून त्यांचा छळ करून स्वतःच्या नाटकशाळा बनविण्यांत येतात. अशीं उदाहरणें अनीतिमूलक म्हणून एकदम बंद करण्यांत यावींत ह्या माझ्या तिसऱ्या मागणीस रावणानें जोराचा विरोध केला.

"तो म्हणाला, ' जो सिद्धांत भोग्य अशा निर्जीव वस्तूंच्या बाबतींत लागतो तोच सिद्धांत तुमच्या सुंदर स्त्रियांच्या बाबतीत लागू पडतो. आर्यावर्तात सुंदर स्त्रियांसारख्या उपभोग्य वस्तु आहेत; अशा सुंदर स्त्रिया तुम्ही निर्माण करितां म्हणून तर तुम्हा कीटकांना आम्हीं जगूं दिलें आणि जगूं देऊं. माझ्या तरुण मर्दांच्या इच्छा पुऱ्या करणाऱ्या सुंदर स्त्रिया मुबलकपणें आर्यावर्तात मिळत आहेत आणि त्यांस कसलाहि विरोध केला जात नाहीं तोंपर्यंत आर्यावर्तातील आर्य जिवंत राहातील. याच्या विरोधी वर्तन आम्हांस परवडणार नाहीं. तुमच्या स्त्रिया इकडे येतात; त्यांना बहुमोल अलंकार आणि मोठें ऐश्वर्य उपभोगण्यास मिळतें. कांहीं नाटकशाळा असल्या तरी कांहीं पत्नीपदावरहि आरूढ झाल्या आहेत आणि ज्या स्त्रिया ' नाटकशाळा ' असतील त्यांच्या सुखाची मोजदाद नारदासारख्या विरक्त ब्राह्मणास कशी होणार? केवळ भाग्यवंत स्त्रिया असतील त्याच या सोन्याच्या लंकेंत ऐषआरामांत लोळतील. इतका त्यांचा दर्जा सर्व दृष्टींनीं वाढविला असून तुम्ही असली फोल तक्रार कां मांडता? ... '

"हें उत्तर ऐकून, विद्वत्जनहो! मी शरमिंघा झालों. एक क्षणभरहि या पातकी लंकेंत राहूं नयें असें मीं ठरविलें आणि अशा नरपशूंचें निर्मूलन कसें होईल असा विचार मनांत करीत मी गेलों तसा परत आलों.

" लंकेचें रावणी राज्य अशा प्रकारचा अनन्वित जुलूम आपणावर करीत असतांना प्रत्यक्ष आपल्या स्वातंत्र्यास हात घालीपर्यंत आपण वाट पहात बसणें अत्यंत मूर्खपणाचें होईल. मी मुनी विश्वामित्राशीं सहमत आहें, आणि या संकटांतून आपल्या नुकत्याच जन्मलेल्या साम्राज्याची सुटका करण्याच्या मार्गास त्वरित लागलें पाहिजे अशी माझी सर्वांस विनंती आहे. "

त्यानंतर काशीच्या अरिदमन राजाची स्नुषा उत्तरा सभास्थानीं प्रविष्ट झाली. तिनें व्यासपीठाजवळ उभें राहून निर्भयपणें आपला वृत्तांत कळविला. लग्नानंतर पहिल्याच दिवशीं आपण अभिसारिकेच्या वेषांत असतांना गच्चीवर आपणावर अनपेक्षित हल्ला कसा झाला, आपणास विमानमार्गें लंकेंत कसें आणिलें, आपण मंत्री अग्निरथ याच्या घरीं कशा बंदिवासांत होतों, तेथें अग्निरथाचा मुलगा चित्ररथ अव्याहत सहा महिने आपली कशी मनधरणी करीत होता, परंतु मंत्री अग्निरथ याच्या दराऱ्यामुळें आपलें शील कायम कसें राहिलें आणि अखेर अग्निरथानें आपली सुटका कशी केली, वगैरे वृत्तांत तिनें सांगितला आणि म्हणाली,

" केवळ अग्निरथाच्या थोरपणामुळें मी शीलभ्रष्ट झालें नाहीं किंवा मला कोणत्याहि प्रकारें त्रास झाला नाहीं. परंतु आसपास अनेक आर्यकन्यका जुलुम-जबरदस्तीचा त्रास सोसत होत्या. केवळ निरुपाय झाल्यानें कांहीं स्त्रिया शीलभ्रष्ट झाल्या असतील. लंकेचे नरपशू स्वार्थी चैनीकरितां आर्य स्त्रियांवर अमानुष जुलुम जबरदस्ती करतात. आईबाप नाहींत; त्यामुळें परमुलखीं पडलेल्या अनाथ आर्य स्त्रियांना रडण्यापलीकडे दुसरा मार्ग मुळींच उरलेला नाहीं. अशा प्रकारें चाललेल्या जुलुमजबरदस्तीस राज्याचें पूर्ण प्रोत्साहन असतें. जुलुमजबरदस्ती करणाऱ्या गुंडांना कोणाचें आणि कसलेंहि भय वाटत नाहीं. कृमीकीटकांप्रमाणें शेंकडों आर्य स्त्रिया त्या सोन्याच्या लंकेंत नरकाचीं दुःखें भोगत आहेत. हीं आर्य स्त्रियांवरील संकटें जेव्हां नष्ट होतील तेव्हांच आर्यावर्तांत आर्यांचें साम्राज्य निर्माण झालें असें मी म्हणेन. ज्यांना आपल्या मुलीबाळींचें संरक्षण गुंडांच्या तावडींतून करतां येत नाहीं त्या कमकुवत आईबापास धिःकार असो! ही घरची अब्रू संरक्षण करण्याचें कार्य आर्यांनीं प्रथम हातांत घेतलें

पाहिजे. मग त्याकरितां युद्धें होवोत, रक्तपात होवो किंवा वाटेल ती आपत्ति येवो. परमपूज्य महामुनि नारद! आणि थोर विचारवंत ऋषिजनहो!! आर्य स्त्रियांची करुण कहाणी तुम्हीं ऐकली आहे. गुप्त हल्ले आर्य स्त्रियांवर न होतील आणि ही शीलसंरक्षणाकरितां अहर्निश पडलेली चिंतेची छाया माझ्या भगिनींच्या मनांतून नाहींशी होईल असा सुदिन तुम्ही निर्माण करा."

उत्तरेचें भाषण अत्यंत परिणामकारक झालें. नारदाच्या शिष्टाईला रावणानें दिलेलें आचरट व उद्दामपणाचें उत्तर ऐकून क्रोधावश झालेले ऋषी आतां रागानें बेफाम झाले. तोंच विश्वामित्र उठून उभे राहिले आणि हात जोडून म्हणाले,

"आपण क्रोधवश झालों तर आपल्यांतील विचारशक्ति नाहींशी होईल. विचार करण्यास पूर्ण अवकाश मिळावा म्हणून थोर मुनीलोकहो, राग आवरा! आपली आतां भोजनाची तयारी झाली आहे. भोजनोत्तर चार घटिकांनीं आपण पुन्हा एकत्र जमूं." .

सभा विसर्जन झाल्याबद्दल भेरीनाद झाला आणि सभा तात्पुरती विसर्जन झाली.

भोजनोत्तर दोन घटिकांची विश्रांति घेऊन सर्व सभासद सभेच्या नियोजित स्थानीं प्रविष्ट झाले.सभापति स्वतःच्या आसनावर विराजमान झाल्यावर सभेचें काम सुरू झालें. प्रथम महामुनी नारद म्हणाले,

"ज्ञानीजनहो! तुम्ही थोर संयमी आहांत. तुम्हीं आपला क्रोध आवरून घेतला आहे असें मी मानतों. आपणास अतिशय महत्त्वाच्या विषयाचा येथें विचार करावयाचा आहे. याकरितां मनाची स्थिरता आणि भावनांची शांतता झाली पाहिजे.त्याशिवाय बुद्धिमत्तेस चालना मिळणार नाहीं. तुम्हीं विश्वामित्र महर्षींचें प्रास्ताविक भाषण ऐकलें. माझ्या लंका–विहाराचा समग्र वृत्तांत तुम्हीं ऐकला आणि शेवटीं शत्रुंजय राजाची कन्या उत्तरा हिनें कथन केलेला स्ववृत्तांत आणि आर्य महिलांची असहाय्य परिस्थिति तुम्हीं श्रवण केलींत. राजकन्या व राजस्नुषा उत्तरा हिनें सांगितलेला प्रत्येक शब्द खरा आहे. ती थोर शीलवती स्त्री असून शीलाच्या समर्थनार्थ सहा महिनेपर्यंत तिनें मानसिक यातना भोगल्या आहेत. लंकेचे महामंत्री अग्निरथ यानें

मला उत्तरेची हकीकत सांगितली आहेच. ती शीलसंपन्न स्त्री असून सहा महिन्यांचा काळ तिनें खडतर तपश्चर्या करून आपलें शीलसंवर्धन केलें, असें खुद्द अग्निरथानें मला सांगितलें. अग्निरथ उदारमतवादी आहे. त्याच्या घरीं बंदिस्त असलेल्या उत्तरेस स्वातंत्र्य मिळालें आणि ती पुन्हा आपल्यापर्यंत येऊं शकली. तेव्हां आतां विचारपूर्वक सांगा कीं, हल्लीच्या आर्यांच्या शत्रुस्थानीं कोण आहे? "

"लंकेचें रावणी राज्य." असा चोहोंकडून एकच शब्दनिनाद झाला.

"माझा दुसरा सवाल आहे" नारदमुनी म्हणाले, "हा शत्रू उपेक्षणीय आहे काय?"

पुन: चोहोंबाजूंनीं उत्तर आलें, "नाहीं; बिलकूल उपेक्षणीय नाहीं."

"ठीक" नारदमुनी म्हणाले, "आतां एकच प्रश्न उरला. शत्रू उपेक्षणीय नाहीं तर त्यास काय उपाययोजना करावी ?"

"त्याचें संपूर्ण निर्मूलन" पुन: सभेंतून आवाज आला.

"आपण सर्व एकमत आहोंत. लंकेचें रावणी राज्य हें आमच्या शत्रुस्थानीं आहे. हा शत्रू उपेक्षणीय नाहीं आणि त्याचें पुरें निर्मूलन झालें पाहिजे. या मताशीं तुम्ही सहमत आहांत हें जाहीर करण्यास मला आनंद वाटतो. आतां फक्त शत्रूचें निर्मूलन करण्याकरितां काय उपाययोजना करावी हा प्रश्न उरला. रावणी राज्य दक्षिणेस समुद्रापलीकडे दूरांतरावर आहे. सुमारें हजार अकराशें कोसांचेंही अंतर आहे. मध्यें विंध्याद्रि, सह्याद्रि इत्यादि अलंघ्य पर्वत आहेत. मार्गांत नर्मदा, कृष्णा, गोदावरी अशा मोठमोठ्या नद्या वहात आहेत. दरम्यान दंडकारण्य मनुष्यवस्ती मुळींच नसलेलें व क्रूर श्वापदांनीं भरलेलें असें अरण्य आहे. एकट्या-दुकट्या माणसास जाणें अशक्य. दरम्यान रस्ते मुळींच नाहींत. एकंदरींत दहा हजार मैलांचा प्रदेश ओलांडून समुद्रकाठाशीं जाणें अशक्य. त्यानंतर समुद्राची मोठी अडचण इतकेंहि करून एकादा दुसरा प्रवासी फक्त लंकेस जाऊं शकेल. मी माझ्या विमानांतून गेलों तरी दरम्यानचा ओसाड प्रदेश पाहून मनास त्रास वाटला. अशा परिस्थितींत एकटा रावणच नव्हे तर रावणी-राज्य कसें निर्मूलन व्हावें ?"

" महर्षी विश्वामित्र यांनीं या विषयाचा खोल अभ्यास केला आहे. ते आपणास उपाययोजना सांगतील."

त्यावर विश्वामित्र म्हणाले, " रावणासह सर्व राक्षसी राज्य पूर्णपणें उलथून पाडावें, राक्षसी राजवटींतील प्रत्येक जिवंत व्यक्ति, मग ती लहान असो अगर मोठी असो, बालक असो, अगर मनुष्य असो, त्याचें समूल निर्मूलन व्हावें याकरितां गेलीं वीस वर्षें मी विचार करीत आहें. माझा विचार पूर्णत्वास गेला आहे. आतांच नारदमहर्षींनी सांगितलें कीं, फक्त एकटादुकटा मनुष्य दक्षिणेस समुद्रतीरापर्यंत जाऊं शकेल इतक्या बिकट मार्गातून तिकडे जावयाचें आहे. मोठें सैन्य घेऊन, लढाऊ सामुग्री घेऊन व अन्नधान्याची व्यवस्था करून जाणें सर्वस्वीं अशक्य आहे. याकरितां या राक्षसांशीं युद्ध देण्याकरितां त्या प्रांतांतीलच लढाऊ सैन्य तयार केलें पाहिजे. रावणाची लंका समुद्रापलिकडे आहे. तद्देशीय लोकांस रावणाच्या जुलुमजबरदस्तीमुळें फार त्रास पोंचला आहे. म्हणूनच समुद्राच्या अलिकडची जनता रावणी राज्यावर नाराज आहे. या नाराजीचा फायदा घेऊन लोकसंग्रह करणारा वीरपुरुष आपण शोधून काढला पाहिजे. अर्थातच तो वीरपुरुष रावणापेक्षां नीतिमत्तेने श्रेष्ठ दर्जाचा, बलवान्, रावणापेक्षां कर्तबगार, साहसी, युद्धकारणपटु आणि सर्वांचीं मनें काबीज करणारा असा असला पाहिजे.

" रावण नीतिमत्तेनें हीन आहे तर हा आमचा पुरुष अत्यंत शीलवान् असावा. रावण असत्यवचनी, दुराचारी आहे, तर हा आमचा वीरपुरुष सत्यवचनी आणि मिष्टभाषणी असावा. रावण अरेराव व गर्विष्ठ आहे, तर हा आमचा वीरपुरुष विनयशील व मितभाषी असावा. रावणापेक्षां बलिष्ठ, शक्तिमान, युक्तिवान आणि ज्याला पाहतांच कोणासहि आनंद वाटेल असा शुभदर्शनी मनुष्य असावा...... सांगा! मित्र हो! असा सत्पुरुष आपल्या पाहाण्यांत आला आहे काय ? "

" नाहीं, नाहीं. " भारद्वाजमुनी म्हणाले, " एवंगुणविशिष्ट वीरपुरुष आमच्या पाहण्यांत आला नाहीं. "

तक्षशीला विद्यापिठाचे प्रमुख गोविंदवल्लभ म्हणाले, " भगवान

विष्णुच्याच ठिकाणीं जे गुण आहेत त्या गुणांनीं युक्त असा वीरपुरु लाभणें दुरापास्त आहे. "

वसिष्ठ महर्षी सानंद उद्गारले,

" थोडक्यांत बोलावयाचें म्हटलें तर भगवान विष्णूच्या ठिकाणीं जो गुणसमुच्चय वास करीत आहे त्या गुणांनीं विभूषित असा वीर-पुरुष महर्षीं विश्वामित्रास पाहिजे. कदाचित् विष्णुंनीं दैत्यराज रावण याच्या वधाकरितां अवतार घेतला असेल तर असा पुरुष माझ्या पहाण्यात आहे; अखिल अयोध्यानिवासी लोकांच्या पाहण्यांत आहे. राजा दशरथाचा सुपुत्र श्रीरामचंद्र विश्वामित्रांना जरूर अशा सर्व गुणांनीं युक्त असा आहे. "

त्याबरोबर सर्व सभासदांनीं आनंदातिशयानें टाळ्या पिटल्या आणि महर्षी विश्वामित्र आणि महामुनी नारद यांनीं " फार उत्तम बोललांत " असें म्हटलें.

अद्याप वशिष्ठ खालीं बसले नव्हते; त्यांनीं आपलें भाषण पुढें चालू केलें.

" परंतु आपल्या या खडतर कार्याकरितां श्रीरामचंद्राचा लाभ कसा होणार? राजा दशरथास श्रीरामचंद्राच्या विरहाचा एक क्षणहि सहन होत नाहीं. तो कदापि रामचंद्रास रावणवधाकरितां जाण्यास परवानगी देणार नाहीं आणि रामचंद्र अत्यंत पितृभक्त. तो पित्याचे पाय सोडून व त्याची आज्ञा मोडून लेशमात्रही हलणार नाहीं. वीर-पुरुष मिळाला खरा. परंतु तो आपणास कसा लाभणार हाच अवघड प्रश्न आहे. "

" या महत्कार्यासाठीं " विश्वामित्र म्हणाले, " बऱ्या मार्गानें न जमल्यास कुटिल मार्गांनीं मी रामचंद्रास मिळवीन. रामचंद्र हाच वीर पुरुष आहे. त्याचेच हातून रावणवध होणार हें माझें आजकालचें अनुमान नाहीं. रामचंद्रास मीं धनुर्विद्या दिली, अस्त्रविद्येंत पारंगत केलें आणि श्रीरामचंद्र एकबाणी बनला. त्यास अत्यंत शौर्यसंपन्न बन-विलें. तेव्हां पूर्वीच हा वीरपुरुष रावणवधास सर्वस्वीं योग्य आहे असें मीं ठरविलें. माझी रामचंद्राच्या गुणांवर अढळ प्रीति असून त्याचीहि माझ्यावर तशीच भक्ति आहे. पूर्वीं एका काळीं यज्ञाच्या संरक्षणास

राम-लक्ष्मणास घेऊन मी आलों होतों हें आपणास माहित नाहीं काय? आणि आतांचें महत्कार्य आर्यांचें साम्राज्य जगविण्याकरितां प्रारंभलेलें! शक्तीचा अचाट प्रयत्न मी करीन; सर्व बुद्धिमत्ता इरेस लावीन; सर्व तपश्चर्या बळी देईन; पण हरप्रयत्नानें श्रीरामचंद्रास जगाच्या कल्याणाच्या मार्गाकरितां मी मिळवीन!''

"विश्वामित्रांस कोणतीहि गोष्ट अशक्य नाहीं.' सर्व सभेचें मत पडलें. शेवटीं नारदांनीं थोडक्यात उपसंहार करून महर्षी विश्वामित्रांची थोर शब्दांनीं प्रशसा केली आणि या कार्याकरितां विश्वामित्रास सर्वाधिकार द्यावेत असें सर्वानुमतें ठरून ती विद्वानांची सभा बरखास्त झाली. रावण-वधाकरितां विश्वामित्रास सर्वाधिकार प्राप्त झाले.



दैवी गुण आणि मानवी आसक्ती यांचें कमी अधिक प्रमाणांत संमिश्रण म्हणजे मानवप्राणी होय. ऐश्वर्याच्या ललामभूत वैभवास चढलेला सम्राट घ्या किंवा निष्कांचन अवस्थेंत चंद्रमौली झोपडींत राहणारा भणंग भिकारी घ्या, त्याच्यामध्यें कमी-अधिक प्रमाणांत दैवी गुण आणि मानवी आसक्ति यांचें मिश्रण असणार! थोर कर्तबगार पुरुषाच्या ठिकाणीं दैवी गुणांचें प्रमाण जास्त सांपडेल आणि निष्क्रिय मनुष्याचे ठिकाणीं मानवी आसक्तीचें प्रमाण जास्त सांपडेल. हें मिश्रणाचें प्रमाण न राहतां केवळ दैवी गुणांचा पुतळा—ज्याच्या ठिकाणीं मानवी आसक्ति कांहीं राहिली नाहीं— अशाला आपण परमेश्वरी अवतार म्हणतों आणि केवळ मानवी आसक्ति ज्याच्या ठिकाणीं आहे व दैवी गुणांचा लेशमात्रहि थारा नाहीं, त्याला आपण पशुकोटींत घालतों. रामचंद्राच्या ठिकाणीं मानवी आसक्तीचा लवलेशहि नव्हता; तो निर्भेळ दैवी गुणांचा पुतळा होता म्हणून त्याची योग्यता देवपणापर्यंत गेली. पण राजा दशरथ याच्या

अंगांत थोर मोठे दैवी सद्गुण होते आणि विशाल मानवी आसक्तिही होती. म्हणून त्याचा दर्जा मानवतेपेक्षां वाढला नाहीं.

राजा दशरथ अत्यंत पराक्रमी होता ; अत्यंत कर्तव्यतत्पर होता ; अत्यंत प्रजापालनदक्ष होता. परंतु त्याची विलासप्रियता मोठी ; त्याचा स्त्रीमोह अनावर; आणि त्याची ऐश्वर्यलालसा विलक्षण. यामुळें तो भौतिकतेच्या पाशांत सांपडला ; मोहांत गुरफटला आणि लालसेलाच अखेर बळी पडला.

त्याची विलासप्रियता जबरी होती. इतक्या उतार वयांतही त्याच्या महालांतील गाणें बजावणें, नाच तमाशे, मादक पेयाचें पान आणि शेवटीं तरुण, रूपवती आणि नखरेल अशा कैकयीचें साहचर्य असा थाट—उतारवयास न साजेसा थाट—त्याचा होता.

इतका विलासी राजा दररोज कोणत्या ना कोणत्या विलासाच्या कार्यक्रमात गुंतलेला; पण त्याची आज अवस्था काय झाली ? प्रफुल्ल-वनांतील वनविहार नियोजित काळाच्या आधींच एकाएकीं संपवून राजा दशरथाची स्वारी तांतडीनें अयोध्येस आपल्या महालांत दाखल होऊन आज चार दिवस लोटले होते. कोणत्याहि स्वादिष्ट खाद्यपेयांस तो या चार दिवसांत शिवला नाहीं. एकदांहि त्याच्या महालांतून गायनाची लकेर बाहेर पडली नाहीं किंवा मृदुंगाचा आवाज बाहेर आला नाहीं. स्वादिष्ट मद्यें जशींच्या तशीं स्पर्शही न करतां बाजूस पडलेलीं; पुष्पांच्या सुगंधित माळा जागच्या जागीं वाळून गेलेल्या आणि आपल्या जीव कीं प्राण असलेल्या कैकयीसही तो विसरून गेलेला, अशा विमनस्क अवस्थेंत राजा दशरथ दिसत होता. चारही दिवसात तो दरबारांत गेला नाहीं. निकडीचें काम म्हणून मंत्र्यांनीं सुनावलेली हकिकत ऐकली नाहीं ; किंवा एकदांही तोंड उघडून तो बोलला नाहीं. इतक्या जालीम विमनस्क अवस्थेंत त्यानें चार दिवसांचा काळ घालविला. राणी कौसल्येकडून दररोज सूर्योद-यास गंगेचें तीर्थ घेऊन रामपत्नी सीता तेथें येई. तें गंगोदक तो भक्ति भावानें घेई. परंतु त्यानंतर कैकयीनें आणलेला आटीव दुधाचा प्याला, तिच्या बापाच्या मुलखांतून आणविलेलीं अत्यंत मधुर द्राक्षें आणि निरनिराळ्या प्रकारचीं रुचिर फळें यांना स्पर्शहि न करतां तो तीं

परत पाठवून देई. राम-लक्ष्मणानीं यावें, अत्यंत दु:खद अंत:करणानें पित्याची ही असहाय्य अवस्था पहावी, काय होतें याची पूसतपास अत्यंत प्रेमानें करावी आणि कोणत्याहि उपायानें त्यांच्या मनावरील दडपण नाहींसें होत नाहीं हें पाहून कष्टी होऊन निघून जावें. शेवटीं चवथ्या दिवशीं मध्यान्ह रात्रीं त्यानें प्रफुल्लकुमाराला हांक मारली,

"प्रफुल्ल! किती घटिका रात्र झाली?" राजा दशरथानें प्रफुल्लकुमारास पृच्छा केली.

"महाराज!" तो म्हणाला, "चंद्र मध्यान्हीस आला आहे. पंधरा घटिका रात्र व्यतित झाली आहे. अद्याप मध्यरात्र सुचवि. णारा भेरीनाद झाला नाहीं."

"वशिष्ठ, वामदेव परगांवास गेले होते ते परत आले आहेत काय?" दशरथ म्हणाला.

"ते महाराजांच्या दर्शनास आले होते. ते आज सायंकाळींच आले." प्रफुल्लकुमार म्हणाला.

"मग तें मला कसें कळलें नाहीं?" राजा म्हणाला.

"आपण कांहीं विचारांत मग्न होता. बराच वेळ वाट पाहून आपण कांहीं बोलत नाहीं हें पाहून ते निघून गेले." तो उत्तरला.

"एकंदरींत ते अयोध्येस आले आहेत असें मीं बिनचूक मानावें काय?"

"होय महाराज!"

"आज काय तिथी आहे?"

"वर्षप्रतिपदा होऊन महाराज, तीन दिवस आज झाले."

यानंतर राजा दशरथ कांहीं वेळ विचारांत पडला. अर्धघटकेनें पुन: सावध झाल्यासारखें दाखवून तो म्हणाला,

"राणी कैकयी कोठें आहे?"

"त्या आपल्या महालांत झोपल्या आहेत."

"बरें आहे. तूं अगदीं गुप्तपणानें राजवाड्यांतून बाहेर जा. कोणासहि कांहीं कळवूं नकोस. प्रधान सुमंत यांच्या घरीं जाऊन त्यांना गुरू वशिष्ठासह इकडे येण्यास सांग. प्रधानजी आणि गुरू

वशिष्ठ यांचें येथील आगमन अत्यंत गुप्त स्वरूपाचें आहे, याची दक्षता घे. आजचा परवलीचा शब्द तुला माहीत आहे ना ?" दशरथ राजा म्हणाला,

" होय महाराज ! " प्रफुल्लकुमार म्हणाला, " ' कैकयीदेवी ' हा आजचा परवलीचा शब्द आहे. "

प्रफुल्लकुमार मुजरा करून निघून गेला. प्रफुल्लकुमार या छद्मी नांवानें प्रसेनजित राजाच्या अंतःपुरांतून अद्यापिही वावरत होता. दोन घटिकांनीं प्रधानजी आणि महामुनी वशिष्ठ यांना घेऊन प्रफुल्लकुमार राजाच्या महालांत आला. राजा उठून बसला. प्रधानजीचें अभिवादन गेल्या चार दिवसांत आजच प्रथम त्यानें स्वीकारलें.

" राजा, तूं कसा आहेस ? तुला तुझ्या आरोग्याचा पूर्ववत् लाभ होवो ! " वशिष्ठ ऋषी म्हणाले.

वशिष्ठाचें आशिर्वचन राजानें हात जोडून स्वीकारलें. तो म्हणाला, " महामुने ! माझ्या प्रकृतीस कसलाहि अपाय झाला नाहीं. परवा अनुचितवनांत वनविहारासाठीं गेलों तेव्हां चोवीस वर्षांपूर्वी झालेल्या शापाचें मला स्मरण झालें. तो मृत झालेला ब्राह्मणकुमार अत्यवस्थ असलेला पुनरपि मला दिसला आणि त्याच्या वृद्ध मातापितरांचा शाप मीं पुनः ऐकला. तो शाप खरा ठरतो काय अशी माझ्या मनानें भीति घेतली आहे. माझा राम म्हणजे माझे पंचप्राण. रामाचा विरहकाल अगदीं समीप आला आहे असें माझें मन मला सांगतें. रामाचा विरह होतांच माझे पंचप्राण निघून जातील. तेव्हां या आगामी संकटांतून मी कसा पार पडेन, काय केलें असतां मला रामाचा विरह होणार नाहीं याचा अखंड विचार माझ्या मनांत चालला होता. "

" महाराज ! " प्रधानजी अंजली जोडून म्हणाला, " रामचंद्रानें आपणांस वचन दिलें आहे ना, आपल्या सम्मतीशिवाय कधींहि अयोध्या सोडणार नाहीं म्हणून ? महाराज, हें एकवचनी रामाचें वचन आहे. तें अन्यथा होणार नाहीं. रामचंद्र एकवचनी आहे; त्याचा विरह हा आपल्या मनांतील खेळ आहे. सत्यसृष्टींत 'अतिस्नेहः पापशङ्की' असें वचन आहे. एकवचनी रामाचें वचन तुमच्या

संग्रहास असल्यानंतर तुम्हांला त्याचा विरह होईल, ही गोष्ट कदापिहि घडणार नाहीं."

"प्रधानजी!" राजा दशरथ म्हणाला, "रामचंद्र निस्सीम पितृभक्त आहे. माझ्यावरील त्याचें प्रेम निस्सीम आहे. तो एकवचनी आहे. तथापि शापोक्ति कधींहि खोटी ठरणार नाहीं. कांहींतरी कारणानें रामास अयोध्या सोडावी लागेल, असें कोणतेंहि कारण –विरह उत्पन्न करणारें कारण– समूळ नाहींसें करावें, असें मीं ठरविलें आहे."

यावर प्रधान सुमंत यांनीं कोणतेहि नवीन प्रश्न उत्पन्न केले नाहींत. राजा दशरथानें विचार करून काय निर्धार केला आहे याची फक्त त्यानें पृच्छा केली. तेव्हां बोलण्याचा आवाज शक्य तितका बारीक करून हलक्या आवाजानें राजा दशरथ बोलूं लागला. तो म्हणाला, "प्रधानजी! मी आतां म्हातारा झालों आहें. रामचंद्रास अयोध्येचा युवराज बनवून त्याच्या हातीं सर्व सत्ता द्यावी असें मीं ठरविलें आहे. असें झालें म्हणजे राजपदाचा भार आणि जबाबदारी ही रामचंद्रावर पडल्यानंतर त्याला कोणत्याहि अवस्थेंत अयोध्या सोडतां येणार नाहीं. अयोध्येचा युवराज म्हणून अयोध्येशीं त्याचा संबंध जडल्यानंतर तो राजधानीचें नगर सोडून कधींहि बाहेर जाणार नाहीं आणि माझी शापांतून मुक्तता होईल."

हें ऐकल्यानंतर वशिष्ठ महर्षींचें तोंड खर्‌कन् उतरलें. विश्वामित्राच्या मार्गांत हा एक जबरदस्त अडथळा आला असें त्यांस वाटलें; पण आपल्या मनाची चलबिचल लेशमात्रहि बाहेर दिसूं न देतां ते म्हणाले,

"शाप निर्बल करण्याकरितां किंबहुना शापाची उक्ती कधींहि सत्यसृष्टींत उतरूं नये म्हणून राजानें काढलेला उपाय फार चांगला आहे." प्रधानजीनींहि ही युक्ति पसंत असल्याबद्दल आपली संमति दिली.

तेव्हां दशरथराजा पुन्हा बोलूं लागला.

"हा रामाचा युवराजोत्सव शक्य तितक्या लौकर करावा अशी माझी सूचना आहे."

" अयोध्येच्या राजाचा युवराजसमारंभ अत्यंत दिमाखानें आणि ऐश्वर्यानें साजरा होईल. सर्व आर्यावर्तांतील राजेलोकांना निमंत्रणें पाठवावीं लागतील. इतकेंच नव्हे तर आर्यावर्ताबाहेरील राजे अश्वपाल वगैरेंनाहि आमंत्रणें पाठवावीं लागतील. समारंभांत नागरिक भाग घेणार. देशोदेशीचे नजरनजराणे येणार. त्या सर्वांचें आदरातिथ्य अयोध्येच्या दरबारास साजेसें होईल. मग महाराज, हा समारंभ तडकाफडकीं करण्यास आपण कसें सांगतां ? "

" प्रधान, तुमचा थाटमाट विसरा. " राजा म्हणाला, " डामडौल आणि वाह्यात करमणुकी यांना फाटा द्या. युवराजपदाकरितां जे धार्मिक संस्कार व्हावयाचे तेवढे सर्व होतील. धार्मिक संस्कारांच्या तजविजीसाठीं सामुग्री त्वरेनें गोळा करा. माझ्या मतें हा समारंभ अगदीं पहिल्या मुहूर्तावर करावयाचा आहे. राजेरजवाड्यांना आमंत्रणें दिलीं नाहींत तरी चालेल. आयता भरत मातुलगृहीं आहे. त्यास तिकडेच राहूं द्या. अश्वपाल राजाला निमंत्रण पाठवून कुरापतीचें मूळ उत्पन्न करूं नका. चांगल्या गोष्टींची सिद्धता होण्यास हजारों अडचणी आणि संकटें निर्माण होतात. रामचंद्र युवराज होणार या गोष्टीच्या आड कोणतेंहि संकट उत्पन्न होऊं नये, याकरितां अधिक गाजावाजा न करितां शुभकाळीं युवराजाचा समारंभ माझ्या डोळ्यास पाहूं द्या. रामचंद्र युवराज झाला म्हणजे माझी चिंता संपली; शापाची भीति उडाली; विरहाची कल्पना नष्ट झाली. "

राजा दशरथाची कारणपरंपरा प्रधानजीस पटली ; वशिष्ठास मान्य करावी लागली. त्यानंतर कोणता जवळचा मुहूर्त युवराजोत्सवाकरितां योग्य आहे अशी वशिष्ठास राजा दशरथानें पृच्छा केली.

तेव्हां वशिष्ठ कांहीं काळ विचार करून म्हणाले, " आणखी दोन महिन्यांनीं जेष्ठ मासीं पहिल्या मुहूर्तावर युवराजसमारंभ होईल. "

राजा दशरथास हा दीर्घकाल वाटला. तो म्हणाला. " इतका विलंब माझ्या मतें अयोग्य आहे. चैत्र शुद्ध नवमीस रामचंद्राचा ' जन्मदिन ' आहे. तो दिवस समारंभाकरितां नेमला तर कोणती हरकत येईल ? "

वशिष्ठांनीं कांहीं गणित केलें. गुरुबळ, चंद्रबळ यांची मोजदाद केली. कांहीं तोंडानें पुटपुटत एकदोन अशीं बोटें मोजलीं आणि शेवटीं सांगितलें.

" चैत्र शुद्ध नवमीचा दिवस शुभ दिवस आहे. परंतु इतक्या अल्पावधींत कसें जमणार ? "

" जमविलेंच पाहिजे. " राजा दशरथानें हुकूम फर्माविला. " चैत्र शु।। ९ लाच रामचंद्राला युवराजपद प्राप्त होईल. तुम्ही त्वरेनें कार्यास लागा. परंतु लक्षांत ठेवा कीं, समारंभाच्या आदल्या दिवसापर्यंत ही गोष्ट कोणासही कळवावयाची नाहीं. अत्यंत गुप्तपणें तयारी करावयाची आहे. रामचंद्राच्या माता आणि उपमाता यांना अष्टमीपर्यंत गंधवार्ता लागू देऊं नका. खुद्द राम–लक्ष्मणांनाहि ही गोष्ट कळवूं नका. अत्यंत गुप्ततेनें ही गोष्ट झाली पाहिजे. तरच मला माझ्या कामांत यश मिळेल. माझ्या घरांत ' सापत्नभाव ' आहे. रामचंद्राच्या गोड वर्तनामुळें आज तो दिसत नाहीं. तरी कोणत्या वेळीं त्याला उग्र स्वरूप प्राप्त होईल आणि कोठून तरी कांहींतरी संकट निर्माण होईल अशी मला भीति वाटते. याकरितां समारंभाचा हेतू अत्यंत गुप्त ठेवा. प्रफुल्ल ! " राजानें हांक मारली तेव्हां प्रफुल्लकुमार हात जोडून पुढें आला. " तूं आमचें भाषण ऐकलेंस ? " राजा घाबरून म्हणाला.

प्रफुल्लकुमारानें सर्व भाषण श्रवण केलें होतें; परंतु बळेंच झोपेचें सोंग घेऊन तो जांभई देत म्हणाला, " नाहीं महाराज ! चुकलों. मी प्रधानजी आणि महामुनी वशिष्ठ आंत शिरल्यापासून बाहेर झोपलों होतों. मीं कांहीं ऐकलें नाहीं. चुकीची माफी करा ! "

राजा दशरथास आतां हायसें वाटलें. आपले सर्व बेत अत्यंत गुप्ततेनें झाले आणि ते गुप्ततेनें पार पडणार अशी त्यास खात्री वाटूं लागली.

" या, प्रधानजी, उदईक सकाळीं या. " राजा म्हणाला, " महामुनि ! आपली यथावकाश गांठ पडेल. रात्र फार झाली आहे. प्रफुल्लकुमार, यांना बाहेरच्या दरवाजापर्यंत नेऊन सोड. "

चार दिवसानंतर आज राजा दशरथाचें मन किंचित् हलकें झालें. चार दिवसानंतर प्रथमच निद्रादेवीनें त्यास आज गांठलें.

प्रफुल्लकुमार परत आला तेव्हां राजा निद्रिस्त झालेला होता.

सूर्योदयीं प्रफुल्लकुमारानें अयोध्यानगरी सोडली. राजा दशरथाच्या महालांतून निघतांना त्यानें दशरथाची आगाऊ परवानगी घेतली होती. तो सिद्धाश्रमाच्या रोखानें त्वरेनें कूच करूं लागला. तेव्हां दशरथ म्हणाला, " प्रफुल्ल ! पुनः केव्हां भेटणार ? "

" अगदीं लौकरच ! " प्रफुल्लकुमार म्हणाला; पण त्यालाहि आपण असें कां म्हणालों हें समजलें नाहीं.



मानवी स्वभावाचा सखोल अभ्यास, पृथ्वीतोलाची कर्तव्यशक्ति, अलोट बुद्धिमत्ता आणि कोणाहि मनुष्यप्राण्यांत न सांपडणारा आत्मविश्वास यामुळें रावण-वधासारखें अशक्यप्राय कार्य करण्याचे सर्वाधिकार विश्वामित्र महर्षीनें स्वशिरावर घेतले; परंतु हें आपण कांहींतरी चुकून केलें असें त्यास मुळींच वाटलें नाहीं. त्याचा आत्मविश्वास इतका मोठा होता कीं, 'हें कार्य शेवटास गेलें तर तें आपणच नेऊं, इतरेजनांची कोणाचीहि प्राज्ञा नाहीं.' सर्वाधिकार त्यानें स्वयंस्फूर्तीनें घेतले आणि आपली जबाबदारी पार पाडण्यांत तो कार्यप्रवृत्तहि झाला. परिषदेचा दुसरा दिवस त्यानें विचारांत आश्रमांतच बसून काढला.

पूर्वदिक्भागीं प्रतिभाशाली सूर्याचें आगमन ध्वनित करण्याकरितां अरुण सज्ज झाला होता, तिकडे बोट दाखवून विश्वामित्र म्हणाले,

" तुम्हा चौघांस या अरुणाचें कार्य करावयाचें आहे. अंधःकाराच्या तावडींतून तुम्ही सुटणार असें वस्तुमात्रांस अरुण प्रोत्साहनपूर्वक

सांगत आहे. अरे अरुण आणि वरुण ! तुम्ही दोघे भाऊ आहांत आणि माधव आणि यादव, तुम्ही दोघे भाऊ आहांत. तुमचीं आईबापें मृत झालीं आहेत. तरी सिद्धाश्रमांत राहून बारा वर्षापर्यंत तुम्ही अभ्यास केला. तुम्हांस मीं धनुर्विद्येंत पारंगत केलें. तुमच्या शिक्षणाबद्दल माझी विशेष आस्था होती. ही आस्था हेतुपुरस्सर होती. एक दिवस येणार आणि या अरुणाचें कार्य तुम्हांस करावें लागणार, असा माझा तर्क होता. तुम्हांस शिक्षण देण्यांत माझा विशेष हेतू होता. सांगा पाहूं तुम्ही माझी आज्ञा कोठवर मानतां ? ”

ते साभिमान म्हणाले, “महाराज! हा काय प्रश्न ? तुमची आज्ञा आम्हांस शिरसावंद्य आहे; तुमची आज्ञा पार पाडण्याकरितां आम्ही वाटेल तितक्या आपत्ति सोसूं. प्रसंगीं स्वतःचे प्राण अर्पूं; परंतु आचार्यांची आज्ञा तडीस नेऊं.”

“ हें तुम्ही कराल असा मला पूर्ण विश्वास आहे. ” विश्वामित्र म्हणाले, “ तुम्हास हा प्रदेश सोडून अगदीं ओळख नसलेल्या परमुलुखांत जावयाचें आहे, आणि तेंहि दीर्घकालपर्यंत. बोला, असें करण्यास तुम्ही तयार आहांत काय ? ”

“ आम्ही आचार्यांच्या कामांत उपयोगी पडतों आणि ते आमच्यावर अत्यंत महत्त्वाचें कार्य सोपवितात हाच अभिमान आम्हांस वाटतो. बोला, आचार्य, बोला. आमच्या कार्याची दिशा आम्हांस समजूं द्या. ” ते म्हणाले, “ ऐका ! सावधानतेनें ऐका. ” विश्वामित्र म्हणाले, “ आपला हा देश फार मोठा आहे. दक्षिणेकडे बऱ्याच दूर अंतरावर समुद्र लागतो. तेथून जवळच समुद्रांत रावणाची लंका आहे. लंका हें द्वीपकल्प आहे. तेथें राक्षसांचें राज्य आहे. रावण हा तेथील राजा. तुम्ही दक्षिणेकडे गेल्यानंतर दंडकारण्य म्हणून मोठें अरण्य लागतें. मार्गांत विंध्याद्रि आडवा पर्वत आहे. मोठमोठ्या नद्या असून तो प्रांत अगदीं निर्जन आहे. त्याच्याहि पलीकडे तुम्हांस जावयाचें आहे. दक्षिणेंत बरेंच दूर गेल्यावर मनुष्यवस्ती लागते. त्या वस्तींत तुम्हांस जाऊन कार्य करावयाचें आहे. दक्षिणेकडे बरींच लहानमोठीं राज्यें एतद्देशीय लोकांचीं आहेत. परंतु रावणी राज्याचा उपसर्ग त्या लोकांना फार होतो. तीं एतद्देशीय अशीं राज्यें राव-

णाच्या अंकित आहेत. त्यांचें स्वातंत्र्य लयास गेलें आहे आणि त्यांना रावणी राज्यापासून पदोपदी अपमान आणि त्रास भोगावा लागतो. या त्रासांतून आणि अपमानांतून केव्हां मुक्त होऊं असें त्यांना झालें आहे. तुम्ही चौघेजण एकत्र राहून कार्य करूं नका. तुम्हांस मोठें कार्य करावयाचें आहे आणि तें स्वतंत्र बुद्धीनेंच तुम्हांस चालविलें पाहिजे.

" ' रामचंद्रच परमेश्वरप्रेषित वीरपुरुष आहे ; अत्यंत नीतिमान आहे ; अत्यंत परोपकारी आहे. तो तुम्हां सर्वांची सुटका करण्याकरितां येणार आहे.' असा रामाच्या प्रशंसेचा प्रसार त्या लोकांत करा आणि रावणाच्या जुलुमजबरदस्तीबद्दल त्यांची चीड पराकोटीस जाईल अशी त्याची निंदा करा. तुमच्या कार्यांत तेथील सैनिकांची, नागरिकांची सहानुभूति मिळेल ; किंबहुना राजेलोकास तुमच्या प्रचारकार्यांनें वेडे करून टाका. ते लोक मागासलेले आहेत. त्यांचें ज्ञान तुटपुंजें आहे. त्यांच्यावर तुम्ही वरचष्मा बसवा. हें काम अहर्निश मेहनतपूर्वक जागरूक राहून सावधगिरीनें केलें पाहिजे. तुम्हांस चौदा वर्षेपर्यंत मी मुदत देतों. हा मोठा दीर्घकाल तुम्हांस वाटेल. परंतु कार्याचें महत्त्व एवढें मोठें आहें कीं, हा कालहि तुम्हांस पुरणार नाहीं. अयोध्येचा राजपुत्र रामचंद्र रावणराजाशीं लढाई देण्याकरितां तेथें येईल तेव्हां तुमची सर्व तयारी पाहिजे. सैन्य आणि राजेलोक रामचंद्राच्या भजनीं लागतील अशी आगाऊ योजना तुम्ही करून ठेविली पाहिजे. बोला ! हें महत्कार्य तुम्ही कराल काय ? एवढ्या दीर्घकालपर्यंत परमुलुखीं तुम्ही राहाल काय ? "

" आचार्य ! आपल्या नियोजित कार्यासाठीं आम्ही प्राणहि अर्पिण्यास तयार आहोंत. रावणवधास आमच्या श्रमाचा हातभार लागणार याबद्दल आम्हांस स्वाभिमान वाटतो. " ते म्हणाले.

" तुम्हांस आणखी दोन घटिकांनीं येथून निघावयाचें आहे. कोठें जातां हें अगदीं गुप्त ठेवा व पुढील दीर्घकालाचें हें कार्य असेंच गुप्तपणें करा. तुम्ही त्या मुलुखांत गेल्यानंतर प्रत्येकास आपल्या कार्याची दिशा स्वबुद्धीनें ठरवावी लागेल. जा ! दोन घटिकांनीं स्नानसंध्या आटोपून प्रवासाकरितां सज्ज होऊन या. "

सूर्योदयास चार घोडे विश्वामित्राच्या आश्रमासमोर येऊन उभे राहिले. त्यांच्यावर सामान बांधण्याची विश्वामित्राची आज्ञा झाली. घोडे प्रवासास सज्ज झाले इतक्यांत चारी प्रवासी येऊन त्यांनीं विश्वामित्राच्या पायावर डोकें ठेवलें. त्यांना ' चिरायु व्हा, यशस्वी व्हा ' असे शुभ आशीर्वाद देऊन विश्वामित्र म्हणाले,

" आहार शुद्ध ठेवा. प्रसंगीं आहार देशकालानुसार बदलला तरी चालेल. परंतु मद्यास स्पर्शही करूं नका. जुगार खेळूं नका. मद्य आणि जुगार हे बुद्धिभ्रंश करतात. बुद्धिभ्रंशापासून कार्यहानी होते. ही पांचशें मोहोरांची थैली तुम्हांस दिली आहे. "

असें म्हणून विश्वामित्रांनीं प्रत्येकास एकेक थैली दिली आणि म्हटलें, " याचा विनियोग अडीअडचणीस करा. हा मार्गदर्शक तुमच्याबरोबर येईल. राजपाल, यांना विंध्याद्रि पार करव, जा. परमेश्वर तुम्हांस सुखी ठेवो ! "

ते चौघेहि प्रवासी उल्हसित मनानें आणि हंसऱ्या मुद्रेनें सिद्धाश्रम सोडून जाऊं लागले. तेव्हां विश्वामित्र उगवत्या सूर्याकडे बोट करून म्हणाले,

" राजपालानंतर तुमचा मार्गदशक हा उगवता सूर्य. प्रवासांत हा तुमच्या डाव्या हातास राहील आणि तुम्हांस इच्छित स्थळीं घेऊन जाईल. "

प्रथम आचार्यांस आणि नंतर सूर्यास अभिवादन करून ते प्रवासी निघून गेले.

कार्यास प्रारंभ तर झालाच असा आनंदाचा सुस्कारा विश्वामित्रांनीं सोडला तोंच प्रसेनजित् आपणांपुढें हात जोडून उभा आहे असें त्यास दिसलें.

" काय प्रसेनजित्! " विश्वामित्र म्हणाले, " तुला कामगिरी होऊन परत येण्यास बरेच दिवस लागले. अनुचितवनांतील विहार राजा दशरथास कितपत मानवला ? "

" आचार्य ! " प्रसेनजित म्हणाला, " त्या वनाचें नांव आतां बदललें आहे. ' अनुचित वन ' असें त्यास कोणीहि म्हणूं नये,

असे राजानें हुकूम सोडले आहेत. प्रफुल्लवन हें जुनें नांव कायम केलें आहे."

"ठीक !" आचार्य उद्गारले,

"नांव बदललें;" प्रसेनजित् पुढें म्हणाला, "पण विहाराचा कार्यक्रम सर्व अनुचित झाला. नांव बदलल्याचा उपयोग कांहींच झाला नाहीं. अनुचित वनांतील विहार अनुचितच ठरला."

त्यानंतर प्रसेनजितनें राजा दशरथावर वाघानें कशी झडप घातली, मरणाच्या तावडींतून आपण दशरथ राजास कसें वांचविलें हें सांगीतलें. तो पुढें म्हणाला,

"केवळ निमिषमात्राचेंच अंतर ! एकबाणी रामचंद्राच्या बाणानें वाघ घायाळ होऊन पडला. पण त्यापूर्वी एक निमिषमात्र मी वाघाची झडप स्वत:च्या तरवारीवर घेतली. यामुळें राजा दशरथास वाघाच्या जबड्यांतून मी वाचविण्यास कारण झालों, अशी राजाची व रामचंद्राची खात्री झाली. माझ्या कामगिरीबद्दल मला मनमानेल तें बक्षिस मागण्याची रामचंद्राची आज्ञा झाली मी कोण आहें त्यांना माहित नव्हतें. त्यामुळें मला ते बक्षिस देण्यास तयार झाले. तेव्हां मला राजाजवळ अखंड राहावयास मिळावें या हेतूनें मला त्यांचे शरीररक्षक करा ही मागणी मीं मागितली. या मागणीमुळें मला राजाजवळ अखंड राहतां आलें आणि राजाच्या बऱ्याच गोष्टी पाहतां आल्या; आणि आचार्य, राजाची गुप्त बैठक जी केवळ प्रधानजी आणि वशिष्ठ मुनींनाच फक्त माहित होती, त्या बैठकींतील अक्षरन्अक्षर मला समजलें. प्रफुल्लवनांत मी राजाचा प्रफुल्लकुमार बनलों. दुसऱ्या दिवशीं राजा दशरथ नौकाविहाराकरितां शरयु नदीवर गेला. त्याला ती जागा पाहून चोवीस वर्षांपूर्वींची गोष्ट आठवली. श्रवणकुमार नांवाच्या ब्राह्मणपुत्राचा वध चुकून राजानें केला होता. त्या वेळीं राजास शाप मिळाला होता. त्या भयानक प्रसंगाची आठवण राजास होऊन तो वृद्ध राजा एकदम बेशुद्ध होऊन पडला. नौकाविहाराचा कार्यक्रम रहित झाला. त्यानंतर राजास छावणीवर आणलें. तेथें अनेक घटिका बेशुद्धावस्थेंत गेल्यानंतर राजा शुद्धीवर आला. त्यानें वनविहाराचा पुढील सर्व कार्यक्रम रहित केला आणि राजास

आजारी अवस्थेंतच अयोध्येस आणलें. एकंदरींत आपण भाकित केल्याप्रमाणें राजा दशरथाचा वनविहार त्यास दुःखकारक झाला. अयोध्येस आल्यानंतर मी त्याच्या अंतःपुरांत अष्टौप्रहर त्याच्या समीप असें. माझा चार दिवसाचा मुक्काम राजाच्या खास महालांत होता. "

" प्रसेनजित ! " विश्वामित्र मध्येंच म्हणाले, " वनविहार संपल्यानंतर तूं तडक इकडेच कां निघून आला नाहींस ? "

" अगदीं राजाजवळ त्याचा विश्वासाचा मनुष्य म्हणून माझी नेमणूक झाली होती. " प्रसेनजित म्हणाला.

" राजाच्या शापाचें प्रकरण पुढें कोठवर जातें ही पाहाण्याची सुसंधी मला लाभली आणि पुढें काय घडतें हें पाहाण्याकरितां मी तेथेंच राहिलों ; आणि आचार्य ! आपणांस सांगण्यास आनंद वाटतो कीं, मला ज्या कामगिरीवर आपण पाठविलें ती माझ्या हातून पुरी झाली आहे. राजा आपल्या मंत्र्याबरोबर आणि वशिष्ठाबरोबर कांहीं खलबत करीत होता. तें समग्र मला ऐकण्यास मिळालें. "

" कोणतें तें गुप्त खलबत ? " विश्वामित्रानें पृच्छा केली.

त्यावर प्रसेनजित म्हणाला, " श्रीरामचंद्रास चैत्र शु।। ९ रोजीं ' यौवराज्याभिषेक ' करावा आणि असें केलें म्हणजे रामचंद्र अयोध्या सोडून जाणार नाहीं आणि आपणांस त्याचा विरह सोसण्याची पाळीहि येणार नाहीं, असें राजानें ठरविलें आणि या समारंभाचा दिवस प्रत्यक्ष उजाडेपर्यंत गुप्त ठेवावा असा राजाचा हेतू होता. "

" प्रसेनजित ! " विश्वामित्र कांहीं वेळ विचार करून शेवटीं म्हणाले, " तूं माझी मोठी कामगिरी बजावली आहेस. याबद्दल तुला मी योग्य बक्षीस देणार आहे. परंतु चैत्र शु।। नवमीचा दिवस उजाडण्यापूर्वीं आपणांस त्वरेनें अयोध्येस गेलें पाहिजे. तूं आताच प्रवासांतून आलास; थकलाभागला असशील ! परंतु अयोध्येस परत जाणें इतकें महत्त्वाचें आहे कीं, आपणांस वेळेवर जाता येईल किंवा नाहीं याची मला भीति वाटते. एक घटकेंत आपण अयोध्येस जाण्यास निघूं. मी सज्ज आहें. तुलाहि माझ्याबरोबर निघालें पाहिजे. "

"काय आचार्य !" प्रसेनजित म्हणाला, "युवराजाच्या अभिषेक प्रसंगीं आपण हजर राहणार ? आपणास या समारंभाचें आमंत्रणहि नाहीं ! आपणास आणि कित्येक लोकांस आमंत्रणें पाठवूं नयेत असें राजाचे हुकूम झाले आहेत."

"आम्ही समारंभास हजर राहिलों तर काय होईल असें राजास वाटतें ?" विश्वामित्र म्हणाले.

"कांहींतरी समारंभांत व्यत्यय येईल अशी राजास भीति वाटते." प्रसेनजित म्हणाला.

"मग प्रसेनजित !" विश्वामित्र म्हणाले, "मी अयोध्येस समारंभाप्रीत्यर्थ जात नाहीं. समारंभास व्यत्यय आणण्यासाठींच मला आयोध्येस सत्वर गेलें पाहिजे. हा अयोध्येचा युवराजउत्सव म्हणजे अखिल आर्यावर्तावरील महत् संकट ! आर्यावर्तावरील महत्संकट टाळण्याकरितां मी अयोध्येस जाईन, राजाचा हेतू हाणून पाडीन आणि रामचंद्र युवराज होऊन एकट्या अयोध्येपुरता 'मर्यादित युवराज' होणार ही घटना निर्मूल करीन ! रामचंद्र सर्व आर्यावर्ताकरितां हवा आहे."

प्रसेनजितास विश्वामित्राच्या म्हणण्याचा अर्थ समजला नाहीं. परंतु आपण आचार्याचें महत्कार्य केलें, एवढेंच नव्हे तर आचार्यांच्या अत्यंत उपयोगी पडूं असा त्याला आनंद झाला. आनंदभरांत अधिक पृच्छा न करितां एका धटकेनें तो आचार्यांबरोबर अयोध्येंस जाण्यास निघाला.

एका क्षणांत अयोध्येच्या दिशेनें दोन घोडेस्वार भरधांव घोड्यास पिटाळीत होते. त्यांत वृद्ध मनुष्याचा घोडा अग्रभागीं चालतांना दिसत होता.

# ६

'जगज्जेता' हें अत्यंत मानाचें नांव मिळविण्याकरितां राजा दशरथ यानें कधीं प्रयत्न केला असा ग्रंथांत तरी उल्लेख नाहीं. राजसूय यज्ञाचा घोडा चोहोंमुलखीं दिमाखानें मिरविला असा वाल्मिकी रामायणात दशरथासंबधीं उल्लेख नाहीं. परंतु दशरथाच्या पराक्रमी जीवनामुळें त्याला सम्राटपदाचा मान मिळत होता हें खरें. अयोध्येच्या सम्राटाच्या घरीं यौवराज्याभिषेकोत्सव होणार आणि ती गोष्ट उत्सवाच्या दिवसापर्यंत गुप्त ठेवावयाची हें कृत्य सत्यसृष्टींत कसें उतरणार ? राजवाड्यापुढें प्रचंड मंडपाचें काम आतां चालू होतें. नव्हे कारागिरांनी रात्रंदिवस जागून तें पुरें केलें होतें. मंडप व राजवाडा सुशोभित करण्याचें काम आतां चालू झालें होतें. प्रचंड अन्नसामुग्री जमविण्यांत आली होती. वाढपी, आचारी यांचे ताफे तयार झाले होते. ठिकठिकाणचे वाजंत्री बोलाविण्यांत आले होते; त्यापैकीं कांहीं आले होते व बाकीचे वाट चालत होते. विद्वान् ब्राह्मणांची राजवाड्यांत रेलचेल झाली होती. यज्ञाची सामुग्री प्रचंड रीतीनें गोळा करण्यांत आली होती. कित्येक गाड्यांतून गंगेचें पाणी आणविण्यांत आलें होतें आणि समारंभ गुप्त राहावा असा तर राजाचा हुकूम होत. राजवाड्यांत कांहीं तरी मोठा समारंभ होणार आहे असा नागरिकांनीं कयास केला; खुद्द राजवाड्यांतहि मन मानेल तसे कयास चालू होते. कोणी राजावरील संकट नुकतेंच टळलें म्हणून हा उत्सव आहे असें म्हणत होते. कोणी राजानें अनेक वर्षे राज्य केलें म्हणून आनंदाप्रीत्यर्थ हा समारंभ असावा असा कयास बांधला. कैकयीच्या एका दासीनें तर राजपुत्र रामचंद्र दुसरें लग्न करीत आहे असें बेधडकपणें सांगण्यास सुरवात केली. सती सीतादेवी मनांत घाबरली. तिनें कौसल्येस ही हकिकत सांगितली. ही रामाची बदनामी केल्याबद्दल कौसल्येनें तिला भरपूर शासन केलें, असे एक ना दोन मन मानेल तसे लोकांचे कयास चालू होते.

आतां समारंभ तीन दिवसावर आला होता. चैत्र शु॥ सप्तमीचा दिवस ! राजा दशरथ समारंभातील वेगवेगळीं केंद्रें तपासून नुकताच परत आला होता. बरोबर वशिष्ठ महर्षि आणि प्रधान सुमंत होते. इतक्यांत तेथें श्रीरामचंद्र दशरथास भेटावयास आला. दोन दिवसांपूर्वींचा विचारमग्न, विमनस्क दशरथ आज किती तडफदार आहे असें पाहून रामचंद्रास सानंद आश्चर्य वाटलें.

तो म्हणाला, " प्रधानजी ! कोणत्या समारंभास प्रारंभ करणार आहांत ? तुम्ही तोंड घट्ट दाबून धरल्यामुळें नागरिक अनन्वित असे कयास काढीत आहेत. बाबा, मला नाहीं का समजणार तुमच्या समारंभाचा हेतू ? "

त्यावर दशरथ म्हणाला, " रामचंद्रा ! तुला न कळवून कसें चालेल ? तुझा यौवराज्याभिषेकोत्सव तुझ्या वाढदिवशीं करण्याचें आम्हीं योजिलें आहे. परंतु अशा समारभांत व्यत्यय फार येतात; म्हणून आम्हीं ही गोष्ट गुप्त ठेविली होती. "

" असें असेल तर गुप्त ठेविण्यांत चूक झाली असें मी विनयानें सुचवितों. तुम्ही जनतेच्या डोईवर एक नवीन ' राजा ' बसविणार ! आणि ही गोष्ट जनतेपासून गुप्त ठेवावयाची ? जनतेची आवडनिवड तुम्हांस लक्षांत घ्यावी लागेल. या गोष्टीचा विचार करून आपलें मत बनविण्याकरितां जनतेस सवड दिली पाहिजे. ' युवराज ' हा भावी राजा असतो. त्याची राजवट स्वीकारायची किंवा नाहीं हा जनतेचा हक्क. एरव्हीं वाटेल तो राजा जनतेच्या डोकीवर बसवावयाचा हें लोकप्रिय राजवटीचें लक्षण नव्हे. तुम्हांस मला जर युवराज करावयाचें असेल तर त्यापूर्वी नागरिकांच्या बऱ्यावाईट मतांची छाननी झाली पाहिजे, आणि बाबा ! अयोध्येच्या नागरिकांपैकीं एकजण जरी मला ' नको ' म्हणत असला, तरी तुमचें आणि मंत्रिमंडळाचें आणि अगणित नागरिकांचीं मतें मी बाजूस ठेऊन युवराजपदाचा अव्हेर करीन. याकरितां आतां हा गुप्तपणा मोडावा. आज संध्याकाळीं जाहीर घोषणा करावी. तुमचा उद्देश सर्वांना कळवावा आणि उदईक सकाळीं सर्व नागरिकांची सभा बोलवावी. त्यांत जर एकमतानें ठरेल तरच मी ' युवराज ' होईन. माझ्या शब्दांनीं जर

कांहीं अविनय होत असेल तर माफ करा! पण नागरिकांचा हा मूलभूत हक्क त्यांच्याकडून काढून घेतां येणार नाहीं."

श्रीरामचंद्राच्या मतप्रणालीवर मंत्री आणि राजा यांना आक्षेप घेतां आला नाहीं. सर्वानुमतें रात्रीं जाहीर घोषणा करावी आणि दुसरे दिवशीं नागरिकांची सभा बोलवावी, असें ठरलें.

दुसरा दिवस उजाडला. गांवभर गुढ्या आणि ध्वजातोरणें उभारण्यांत आलीं होतीं. रस्ते कुंकुमाच्या सड्यांनीं आणि ध्वजापताकांनीं सुशोभित केले होते आणि हा सर्व उत्साह आदल्या दिवशीच्या घोषणेमुळें नागरिकांनीं स्वयमेव दाखविला. त्यावरून लोकमताचें अनुमान होत होतें.

अयोध्येच्या नागरिकांचा उत्साह अवर्णनीय होता. राजानें सभा बोलावून आपला मोठा सन्मान केला असें त्यांना वाटलें. नियोजित वेळीं सभास्थान नागरिकांनीं भरून गेलें. ह्या सर्वांनीं उत्सवाचे वेळचा पोशाख केला होता. राजाचे अष्टमंत्री आपापल्या स्थानीं विराजमान झाले होते. लक्ष्मण–शत्रुघ्न यांनाहि राजाजवळ जागा दिली होती. अगदीं नियोजित वेळीं.राजा दशरथ आणि श्रीरामचंद्र यांच्या स्वाऱ्या आल्या आणि आपापल्या जागीं विराजमान झाला तेव्हां, 'राजा दशरथ की जय,' 'युवराज राममंद्र की जय' असा प्रचंड जयजयकार झाला.

जयजयकाराचा ध्वनि दशदिशांत विलीन झाल्यानंतर मुख्य मंत्री सुमंत बोलावयास उभे राहिले.

ते म्हणाले, "आजच्या सभेंतील तुमचा उत्साह पाहून राजे दशरथ यांना अत्यानंद होत आहे. अयोध्येचे राजे दशरथ यांची राजवट जितकी दीर्घकालीन तितकी ती वैभवानें, ऐश्वर्यानें भरलेली आणि विशेषत: प्रजाहिताचे दृष्टीनें अत्यंत नमुनेदार अशी झाली.तुम्ही अद्याप राजा दशरथ यांच्या राजवटीच्या छायेंत सुखानें आहांत. तुमची सुखासीनता हाच राजा दशरथांच्या दीर्घकालीन राजवटीचा हेतू. कितीहि लोकप्रिय राजा झाला तरी तो मनुष्यप्राणीच आहे. जन्म, जरा, मरण या त्रिविध संकटांत तोहि सांपडलेला आहे. राजा दशरथ तरुण असतांना जितक्या उत्कटतेनें तुमच्या हिताचें संरक्षण त्यांनीं

केलें तितकेंच हल्लींही करीत आहेत. तथापि भावी काळाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. तुमचा भविष्यकाळ अत्यंत सुखानें जावा असा राजा दशरथ यांचा हेतू आहे. अयोध्येच्या बलिष्ठ साम्राज्याकरितां सूर्यवंशाची निर्मळ परंपरा ऐश्वर्यशाली ठेवण्याकरितां आणि लोकरंजनाचें कार्य गतेतिहासास शोभेल असें चालविण्याकरितां अत्यंत पराक्रमी, सद्गुणाच्या अग्रभागीं चमकणारा आणि अत्यंत कर्तव्यतत्पर असा प्रेमळ राजा भावी काळांत अयोध्येच्या प्रजाजनाकरितां नेमावा अशी आगाऊ तजवीज राजा दशरथ करूं इच्छीत आहे. रामचंद्रास अयोध्येचा युवराज केल्यानंतर तुमच्या हिताकरितां जागलों असें राजा दशरथास वाटत आहे. परवां शुभ दिन आणि मंगल वेळ साधून राजपुत्र रामचंद्र यांस युवराज्याभिषेक करावा असा राजाचा हेतू आहे. तो तुम्हांस कितपत मान्य आहे ? ही राजानें केलेली निवड तुमच्या आवडीप्रमाणें आहे किंवा नाहीं हें तुम्हांकडून मोकळ्या मनानें कळावें म्हणून आजची ही सभा बोलावली आहे. " नागरिकहो ! तुम्ही विचार केला असेल किंवा तुमचा विचार पूर्वीच ठरला असेल. हा दशरथाचा हेतू तुम्हांस मान्य आहे काय ? "

तेव्हां ' युवराज रामचंद्रकी जय ' असा पुन: जयजयकार झाला.

तेव्हां रामचंद्र उठून उभा राहिला.त्यानें पित्यास अभिवादन केलें. सर्व नागरिकांस अभिवादन करून तो मधुर आवाजानें म्हणाला,

'' नागरिकहो ! तुमचें माझ्यावरील प्रेम पदोपदीं प्रत्ययास येत आहे. प्रेम आणि भावना यांच्या कह्यांत न जातां आजचा प्रश्न तुम्ही सोडविला पाहिजे.

''राजाच्या मागें त्याचा पुत्र ' राजा ' व्हावयाचाच ही निश्चयाची परंपरा माझ्या बाबतींत तुम्ही उपयोगास आणूं नका. तुमचा राजा म्हणजे तुमच्यावर अनेक वर्षें शासन करणारा, याची निवड तुम्ही स्वतंत्र मनानेंच केली पाहिजे.केवळ राजाची इच्छा आहे म्हणून तुम्ही मला निवडून द्याल तर तो मी मोठा अन्याय समजेन. या सभेंत युवराज कोणास नेमावें या विषयाचा खल झाला पाहिजे. विचार करतांना ' युवराज ' म्हणून दुसऱ्या कोणाचेंहि नांव सुचवितां येईल. लोकमतानुवर्ति राजा हे उत्तम राजवटीचें प्रतीक आहे. तुमची

मान्यता मिळविण्याकरितां ही सभा बोलावली असा मर्यादित अर्थ तिचा नाहीं. प्रजेचे अमर्याद हक्क प्रस्थापित करण्याचा आजचा हा दिवस. नवीन युवराज जुन्या राजवटींतीलच असावा; तो जुन्या राजवटीच्या वंशांतीलच असावा किंवा तो हल्लीच्या राजाचा वडील पुत्र असावा या परंपरेस मनांत थारा देऊं नका. अंधपणानें तुम्ही परंपरेस अनुसरून मत द्याल, तर युवराजपदाचा मी धि:कार करीन. माझ्यापेक्षां किंवा आमच्या चौघांहि राजपुत्रांपेक्षां अधिक नीतिमान, अधिक पराक्रमी, अधिक जनतेची काळजी घेणारी अशी एकादी पुण्यशील व्यक्ति तुमच्या डोळ्यासमोर असेल तर त्या व्यक्तीचें नांव सुचवा. तुम्ही असें स्वतत्र मत द्याल तर मी तुमचा फार आभारी होईन. युवराज होण्यापूर्वी तुम्ही माझा युवराज म्हणून जय-जयकार करतां, हें अनुचित होय. ज्यांच्यावर राज्य करावयाचें ते स्वतंत्र विचारांचे आहेत. मूक जनावराप्रमाणें ‘ हांकूं तेथें जातील ’ अशा विचारांचे नाहींत, हें माझ्या प्रत्ययाला आलें तर मला फार आनंद होईल. प्रथम प्रजेनें केलेली निवड आणि नंतर राजवटीच्या मतांचा शिक्कामोर्तब ही नवी प्रणाली अयोध्येच्या नागरिकांनीं आचरणांत आणावी. माझेंच नांव युवराज म्हणून राजानें स्वीकारलें आणि तुमचा विचारहि न घेतां तें दोन दिवसांनीं तडीस जाणार हें ऐकून मला फार दु:ख झालें. आपल्या भावी राजाची निवड प्रजेनेंच करावी आणि अशा रीतीनें आपल्या न्याय्य हक्कांस जागरूक रहावें, असें समर्थन करणारा मी आहें. पुन: युवराज म्हणून माझी निवड होण्यापूर्वी अनुचित जयजयकार करूं नका. तुम्हांस विचार करण्यास वेळ पाहिजे असेल तर तोहि वेळ राजे दशरथ तुम्हांस देतील. ”

तेव्हां ‘ वेळ नको, विलंब नको ! आजच युवराजाची निवड होऊं द्या. ’ असा ध्वनि नागरिकांतून निघाला. रामचंद्राचें भाषण पुरें झाल्यानंतर वसिष्ठमुनी बोलावयास उठले. ते म्हणाले,

“ युवराजपदाच्या निवडणुकीबद्दल जी नूतन मतप्रणालि रामचंद्रानें नागरिकहो ! आपणापुढें ठेविली आहे ती प्रशंसनीय तर आहेच पण रामाच्या निर्लोभीपणाची ती साक्ष देत आहे. रथास जोडलेले घोडे किंचितहि हालचाल न करतां नवीन सारथ्याची हुकमत

तितक्याच आज्ञाधारकपणें पाळतात किंवा नांगरास जुंपलेले बैल कोण नांगऱ्या आहे याकडे सर्वस्वी दुर्लक्ष करतात, त्याप्रमाणें आम्ही मनुष्यप्राणी मनुष्याचे हक्क विसरून राजा नेमील त्या युवराजास कबूल करतों ही पशुवृत्ति होय, असा रामचंद्राचा आग्रह आहे. जुनी परंपरा सोडा, वंशपरंपरेचे हक्क झुगारा आणि मानव्याच्या हक्कांचा पूर्ण उपयोग करा असा रामचंद्राचा ध्वनि आहे. आपल्या मर्जी-प्रमाणें राजा निवडला म्हणजे अनुवंशिक हक्कानें येणाऱ्या राजाची राजवट बंद पडते. आणि प्रत्येक राजवट निर्दोष आणि निर्भेळ बनून प्रजेस अत्यंत सुखाची होते. एकादा राजपुत्र हीनबल असला, व्यसनी असला, स्वकर्तव्यदक्ष नसला आणि स्वेच्छाचारी असला तरी जुन्या परंपरेनें तो राजा होईल! परंतु रामचंद्रानें सांगितलें 'ही वेडगळ व जुनाट पद्धति सोडून द्या.' रामचंद्रानें तुम्हांस विनंती केली आहे कीं अत्यंत योग्य मनुष्याची युवराजपदावर निवड करा. अर्थात चांगल्या राजाच्या ठिकाणीं काय गुण असावेत याची छाननी करा आणि विचारपूर्वक कोण युवराज असावा हें ठरवा. हल्लींच्या काळीं चांगला राजा बनण्यास तो शूर आणि पराक्रमी असला पाहिजे. तो नीतिदृष्टचा शीलवान असला पाहिजे कीं ज्याचें उदाहरण प्रजेनें आपल्या पुढें ठेवावें. तो स्वार्थी, चैनींत लंपट होणारा असा स्वेच्छाचारी नसावा. अखंड कार्यतत्पर आणि दक्षताप्रिय असावा आणि अखेरची गोष्ट सांगावयाची म्हणजे तो मनानें कोवळा, वर्तनानें प्रेमळ आणि चालचालणुकीनें सोज्वळ असा असावा. या गुणसमुच्चयांचा शोध तुम्ही कराल तर तुम्हांस एकट्या रामाकडेच पहावें लागेल. रामा-व्यतिरिक्त हे सर्व गुण ज्याच्यांत एकत्रित झाले आहेत असा मनुष्य विरळा. पण हें मी तुम्हांस भलतेंच सांगितलें. खरें तें बोलून गेलों. मी सांगितलेल्या गुणांचें आधिक्य ज्या व्यक्तींत तुम्हांस सांपडेल त्यासच निवडून द्या आणि अयोध्येची प्रजा मानव्याच्या हक्कांचा उपयोग करते आणि राजे लोकमतानुवर्ती असतात असा तुमचा गौरव चोहोंमुलखीं होऊं द्या."

यानंतर एक उतावळा नागरिक म्हणाला,

"आतां भाषणें संपलीं ना? श्रीरामचंद्र आमचा परमेश्वर आहे.

तो युवराज असावा अशी आमची बहुत दिवसांची इच्छा आहे. रामचंद्राशिवाय कोणीहि अन्य पुरुष त्याच्या योग्यतेचा या सभेंत नाहीं. तेव्हां राजा दशरथांची इच्छा फलप्रद होवो. त्यास आमचा कोणताहि प्रत्यवाय नाहीं."

शेट्टी सागरदत्त म्हणाले, "आमचें महत्‌भाग्य म्हणून श्रीरामचंद्रासारखा सकलगुणसंपन्न राजा आम्हांस लाभत आहे. हिरे आणि गारगोटचा एकत्र करून तुम्ही यांतील मूल्यवान जिन्नस निवडून काढा असें श्रीरामचंद्रानें आम्हांस सांगितलें. पण तेजस्वी हिरा तो हिराच. निगर्वी राम, मितभाषिणी राम, मिष्ट भाषिणी राम, प्रसन्नवदन राम, एकवचनी राम हे आम्हांपुढें सद्वर्तनाचें प्रतीक आहे. आमच्या मुलांलेकरांपुढें नित्य हा चांगल्या वर्तणुकीचा कित्ता आहे. श्रीरामचद्रानें परशुरामाचा गर्व हरण केला. विश्वामित्राच्या आश्रमांत होणारी राक्षसांची उपाधी नाहींशी केली. तो एकबाणी रामचंद्र पराक्रमी आहे असें शत्रूही म्हणेल. श्रीविष्णूंच्या ठिकाणीं वसत असलेले सद्‌गुण श्रीरामचंद्राचे ठिकाणीं विलसत आहेत. श्रीरामचंद्र हाच आमचा युवराज आणि तोच आमचा राजा."

शेट्टी सागरदत्ताच्या भाषणानंतर वेगवेगळ्या नागरिकांस आपलें मत बोलून दाखविण्यास वाव मिळाला नाहीं. चोहोंबाजूंनीं 'रामचंद्रालाच युवराज निवडा. रामचंद्र हाच अयोध्येचा युवराज–' असा एकदम आवाज झाला आणि पुन: एकवार 'युवराज रामचंद्र की जय' असा जयजयकार झाला.

"नागरिकहो !" राजा दशरथ हर्षभरानें सद्‌गदित होऊन म्हणाला, "तुम्ही आतां श्रीरामचंद्राचा 'युवराज' म्हणून जयजयकार केला आणि रामचंद्रासच युवराज निवडा असा सभेंतून आवाज निघाला. याचा अर्थ सर्वानुमतें तुम्ही ही निवड केली असा मी घेऊं काय? कोणास विरुद्ध बोलावयाचें असेल तर त्यानें तसें बोलावें."

यानंतर राजा दशरथानें बराच वेळ वाट पाहिली. कोणींहि पुढें येत नाहीं असें पाहून, "श्रीरामचंद्राची युवराज म्हणून सर्वानुमतें निवड झाली असें मी जाहीर करतों." राजा म्हणाला.

'युवराज रामचंद्रकी जय--' असा पुनः एकवार गगनभेदी आवाज झाला.

पुनः राजा बोलूं लागला, "या गगनभेदी आवाजानें स्वर्गांतील आमचे पूर्वज माजी सूर्यवंशी राजे सर्व हर्षभरित होतील. नागरिकहो, तुम्ही माझ्या इच्छेस सहमत होऊन रामचंद्रास युवराज निवडून दिलें आणि माझा सन्मान केला याबद्दल मी तुमचा आभारी आहें. रामचंद्राच्या ठिकाणीं परमेश्वरी गुण वास करीत आहेत. त्याचें शौर्य परमेश्वरी शौर्यास साजेसें आहे. त्याची इंद्रियावरची सत्ता परमेश्वरी मनोनिग्रहास शोभेशी आहे. आणि त्याची कर्तव्यनिष्ठा दैवी तेजास साजेशी आहे. तो आमच्या सूर्यवंशांत अद्वितीय पुरुष निर्माण झाला आहे. त्याला तुम्ही युवराज म्हणून निवडून तर दिलेतच; परंतु आगामी महोत्सवांत तुम्ही आनंदानें सामील व्हा. तुमचा आनंदाचा पुढील काळ मी लेशमात्रहि घेऊं इच्छित नाहीं."

सभा बरखास्त झाली.

दशरथ वाटेनें रामचंद्रास म्हणाला, "मला नागरिकांचा हा कौल माहीत होता. तुझ्यावर हे सर्व नागरिक देवाप्रमाणें प्रेम करीत आहेत हें मी जाणून आहें. आतां तर तुझ्या मर्जीप्रमाणें झालें ना?"

"बाबा ! तुमची आज्ञा मला शिरसा वंद्य आहे." रामचंद्र म्हणाला.

उभयतां बापलेक राजवाड्याच्या तोंडाशीं आले. तेथें राममाता कौसल्या, रामपत्नी सीता आणि कैकयी, सुमित्रा इत्यादि सर्व राजस्त्रिया आरती-पंचारती घेऊन सज्ज होत्या. ओवाळीत असतां राममाता कौसल्या प्रेमनिर्भर स्वरानें म्हणाली,

"रामा ! शतायु हो. सुखी हो. आयोध्येच्या गादीचा यशस्वी राजा हो."

असे कौसल्या म्हणत असतांना सीता, कैकेयी इत्यादि स्त्रियांच्या डोळ्यांतून अश्रु ठिपकत होते. रामचंद्र कैकेयीकडे वळून म्हणाला,

"आई ! मला नागरिकांनीं युवराज म्हणून निवडलें."

" बाळा ! " कैकयी पुढें येऊन रामाच्या अंगावरून हात फिरवून हर्षभरानें म्हणाली, " माझा राम आयोध्येच्या नागरिकांचा आवडता सम्राट होवो. "

या कैकेयीच्या भाषणानें रामचंद्रापेक्षां दशरथास अधिक आनंद झाला. रामचंद्राचा यौवराज्याभिषेकोत्सव आतां निर्विघ्न पार पडणार असें त्याचें मन सांगूं लागलें.



स्त्रीहृदयांतील प्रेमाचे थर केव्हां सर्द पडतील ; केव्हां कुशंका आणि संशय यांची छाया त्याच्यावर पडून प्रणयाची उष्णता नाहींशी होईल यांचा नेम नाहीं. संशयपिशाच्च एकदां स्त्रीहृदयांत उत्पन्न झालें म्हणजे त्यांतील प्रणयाची दाणादाण उडते ; प्रसंगीं प्रणयाचा विध्वंस होऊन स्त्रीहृदय अत्यंत दुःखी बनतें. ही सर्वसाधारण स्त्रीहृदयाची अवस्था झाली. परंतु सीतादेवीचें हृदय अत्यंत पवित्र आणि विशाल. त्यांत वस्ती करून राहाणारी प्रणयदेवता संशयातीत आणि निर्दोष होती. अशा दैवी प्रेमाचा सांठा सीतादेवीच्या हृदयमंदिरांत होता. कसल्याहि संशयाचा मारा त्याच्यावर चालणार नाही इतकें पवित्र आणि सद्गुणानीं व्यान केलेलें असें तें प्रेम होतें. सीतादेवीचा प्रणयपरमेश्वर श्रीरामचंद्र. रामचंद्राचें चारित्र्य परमेश्वराइतकें निर्मळ. अशा चारित्र्यावर संशयाचा आघात मुळींच चालणार नाहीं. तथापि दोन दिवसांपूर्वीं एका क्षुल्लक दासीनें रामचंद्र दुसरें लग्न करणार आहे, अशी भूमका उठविली. ती भूमका खोटी आहे अशी सीतादेवीची खात्री झाली. तरीपण या खोटया आक्षेपानेंहि तिच्या मनावर एक संशयाचा ओझरता आघात झाला. ती आपल्या मनास वारंवार हा संशय खोटा आहे असें बजावून सांगे. यामुळें कांहीं काळ

तिच्या मनास विसर पडे. पण एकदा निर्माण झालेला संशय अद्याप पूर्णपणें लोपला नव्हता.

आजचा दिवस सीतादेवीचा मोठ्या गडबडींत गेला. रामचंद्र अयोध्येचा युवराज बनणार ही सुखद बातमी ऐकल्यापासून तिच्या आनंदास पारावार उरला नाहीं. रामचंद्र युवराज आणि मी त्याची युवराज्ञी. ही गोड कल्पना तिच्या मनावर वारंवार आनंदाच्या लहरी उत्पन्न करी. अशा रीतीनें सर्व दिवस आनंदाच्या लहरी तिच्या मनांत खेळत होत्या. त्यामुळें दोन दिवसापूर्वींच्या संशयाच्या आघातास ती आज विसरली. रामचंद्र राजदरबारांतून येऊन राजवाड्यांत शिरत असतांना ती हंसऱ्या मुद्रेनें त्यास ओवाळण्यास गेली. तिला रामचंद्राबरोबर कितीतरी बोलावयाचें होतें ; आनंद व्यक्त करावयाचा होता. पण लेशमात्रहि सवड तिला मिळाली नाहीं.

सभा विसर्जन झाल्यानंतर रामचंद्रानें तो दिवस राजा दशरथाच्या महालांतच भावी समारंभाबाबत तजविजी ठरविण्यांत घालविला. रात्रीं दोन घटिका झाल्यानंतर ' मी भोजनास येणार नाहीं. काम संपवून येण्यास मला बरीच रात्र होईल. ' असा रामचंद्राचा निरोप सीतादेवीस मिळाला. तिनें आपलें भोजन लवकर आटोपलें आणि चौथ्या मजल्यावरील मोकळ्या गच्चीवर ती झोंपण्याकरितां निघून गेली. सुवर्णाच्या रत्नखचित पलंगावर पराच्या गाद्यागिरद्या टाकल्या होत्या. आपले पतिराज आतां कांहीं लौकर येत नाहींत असें मानून ती आपल्या बिछान्यावर पडली आणि दिवसभर झालेल्या श्रमामुळें लौकरच निद्रावश झाली.

जे विचार जागृतावस्थेंत अयोग्य वाटतात, परस्परास जमणारे नाहींत असें वाटतात त्यांची योग्यायोग्यता आणि गैरमेळ स्वप्नसृष्टींत नाहींसा होतो. रामचंद्र दुसरा विवाह करीत आहेत ही संशयाची एक शृंखला रामचंद्राच्या जीवनास लेशमात्र न जमणारी आतां स्वप्नसृष्टींत रामचंद्र युवराज होणार या विचारांशीं संलग्न झाली. स्वप्नसृष्टीचा खोटा खेळ सुरू झाला. स्वप्नसृष्टींत सीतादेवी अत्यंत कष्टप्रद असे अनुभव घेऊं लागली; त्रासली; वैतागली; अत्यंत दुःखीकष्टी झाली. तिचे खऱ्या सृष्टींतील जीवन किती

सुखपूर्ण होतें ?--परंतु हें जीवन स्वप्नस्थितींत अत्यंत दुःखद असें तिला वाटूं लागलें. तिचें दुःखपूर्ण निःश्वास बाहेर ऐकूं येऊं लागले. रामचंद्र तितक्यांत तेथें येऊन आपल्या मंचकावर निद्रादेवीची आराकरीत पडला होता.

"देवा!" सीतादेवी अस्पष्टपणें झोपेंत बडबडली. "असलें भयानक संकट मजवर येणार होतें तर युवराजपदाची तरी आम्हांस काय जरूर होती." असें म्हणून ती अस्पष्ट आवाजानें कांहीं बडबडली आणि रुदन करूं लागली. रामचंद्र पूर्ण सावध होता. कसलें तरी दुःखद स्वप्न सीतादेवी अनुभवीत आहे असें वाटून तो उच्च स्वरानें म्हणाला,

"आर्ये! सावध हो, सावध हो! तुला कांहीं तरी दुःखद स्वप्नापासून त्रास होत आहे."

सीतादेवी सावध झाली आणि म्हणाली. "आर्यपुत्र! अशी आपली दुर्दशा व्हावयाची असेल तर युवराजपदाचा तुम्ही धिःक्कार करा."

'देवी!' रामचंद्र म्हणाला," तुझ्या सुखाकरितां मी कांहींहि करीन. परंतु अजूनहि मी तुला सांगतों कीं, तूं स्वप्नसृष्टींतील घटनेवर विश्वास ठेवूं नकोस."

"आर्यपुत्र! अजून तुम्हांस युवराजपदाचा लाभ व्हावयाचा आहे ना?" सीतादेवी म्हणाली, "तें स्थान अद्यापहि तुम्हांस सोडून देतां येईल. तुम्ही अद्याप माझ्या एकटीचे आहांत ना?"

"देवी! हा काय भ्रम?--तुझ्या मनांत हा भ्रम कसा शिरला? तूं मनःपूर्वक मला सांगत असशील तर मी युवराजपदाचाहि त्याग करीन. मला सांग पाहूं--तुला काय स्वप्न पडलें होतें तें?"

आतां सीतादेवी पूर्ण सावध झाली.ती उठून बसली आणि आपल्या पतीचा हात आपल्या एका हातांत घेऊन ती मुग्धबाला कंपित स्वरानें बोलूं लागली.

" तुमचा आणि माझा प्रेमसंबंध किती पवित्र आणि घनदाट. माझ्या स्त्रीहृदयास वाटे कीं ज्याअर्थी मी रामचंद्रावर पूर्णभावानें प्रेम करीत आहे त्याअर्थी आपल्या पूर्ण प्रेमास मी पात्र झालें आहे."

" देवी ! यांत काय संशय ? तुझ्यावर माझे निरतिशय प्रेम आहे. त्या प्रेमाच्या आड कसलीहि शक्ति येऊं शकणार नाहीं. तुझ्या निर्व्याज आणि अखंडित प्रेमाचा मी भोक्ता. आणि माझेहि तुझ्यावर निरतिशय प्रेम. असें असून आज तुझ्या मनांत ही विकल्पाची भाषा कां ?"

" आर्यपुत्र ! मी माझें स्वप्न तुम्हांस सांगणार आहें. त्यांत वस्तुस्थितीचा संपर्क नाहीं. तुमचें माझ्यावर व माझे तुमच्यावर निस्सीम प्रेम असतांना, देव ! तुम्ही माझ्या स्वप्नसृष्टींत युवराज बनला. युवराज बनल्यानंतर कांहीं काळ आपला सुखाचा गेला. पण त्यानंतर माझ्या हालअपेष्टेस सुरवात झाली. माझ्या स्वप्नसृष्टींत तुम्ही युवराज बनल्यानंतर थोडचा काळांत दोन, तीन, चार अशीं लग्नें केलीं. तुमची चतुर्थ पत्नी राजमाता कैकेयी देवीइतकी सुंदर होती. ती अत्यंत नखरेल होती. तिनें तुमच्या मनाचा ताबा घेतला आणि ज्याप्रमाणें मामंजी कैकयीच्या महालांत पडून असतात त्याप्रमाणें तुम्हीहि माझी आठवण न ठेवतां मला धिक्कारूं लागला. तुमचा धिक्कार मला असह्य झाला. जुन्या प्रेमास आठवावें आणि या नव्या परिस्थितिमुळें असहाय्य होऊन रडूं लागावें हा माझा नित्यक्रम बनला. महाराज ! मामंजीप्रमाणें युवराज झाल्यानंतर तुम्ही दुसऱ्या राण्या करीत असाल, माझ्या प्रेमास धिःक्कारणार असाल तर मी तुमच्या युवराज होण्याच्या विरुद्ध आहें."

" देवी ! " रामचंद्र म्हणाला, " हा सगळा स्वप्नसृष्टीचा खेळ. याच्यावर तूं कां विश्वास ठेवावास ? "

" दशरथमामंजींनीं कौसल्या सासूबाईंना असेंच सांगितलें होतें. मामंजींनीं सासूबाईंना आणाभाका दिल्या—त्या जुन्या शपथा आतां किती फोल ठरल्या आहेत, याचा विचार करा. युवराज होऊन आणि युवराज्ञी बनून आपल्या प्रेमाचा बिघाड होणार असेल तर आर्यपुत्र ! युवराजपदाचा धिक्कार करणें मला सुखाचें वाटतें."

"देवी ! तूं रामचंद्राची स्त्रीआसक्ति ओळखली नाहींस. युवराजपद थोर आहे, बहुमानाचें आहे आणि सुखाचें आहे-या भिकार भावनांच्या आधीन होऊन मी तें स्वीकारीत नाहीं. मला कोणत्याहि प्रकारची आसक्ति नाहीं. माझी आसक्ति मर्यादित आहे, आणि ती मर्यादितच राहणार. मी बाबांची निंदा करीत नाहीं. पण तूं त्याच्या दृष्टीनें मजकडे पाहूं नकोस. ते अत्यंत विलासप्रिय आहेत, तर विलासाचा मला तिटकारा आहे. उतारवयांतहि त्यांचा स्त्रीमोह अनावर आहे, आणि तारुण्यांतहि माझी स्त्रियावरील आसक्ति मर्यादित आहे. तूं बाबांचा आयुष्यक्रम पुढें ठेवलास आणि माझें चित्र रंगविलेंस; मात्र असें रंगवितांना माझ्या निर्मोह वर्तनाची, माझ्या निर्दोष चारित्र्याची आणि तुझ्यावरील अढळ प्रेमाची तुला आठवण झाली नाहीं काय?—पण तुला स्वप्नसृष्टींत यासर्व गोष्टींचा विसर पडला आणि तूं माझें चित्र भलत्याच रंगांनीं रंगविलेंस ! आतां सावध झालीस. आतां तरी कांहीं शुद्धीवर आल्यासारखी बोल."

सीतादेवी कांहीं वेळ थांबली आणि मनन करून ती पुनः म्हणाली, "आर्यपुत्र ! परवांच्या यौवराज्याभिषेकास कायमची रजा द्या. आपणांस 'युवराज' व्हावयाचें नाहीं आणि पुढील संकटांस तोंडहि द्यावयाचें नाहीं."

"देवी ! भावी संकटांची कल्पना तूं मनांतून समूळ नाहींशी कर. स्वप्नानें बेचैन झालेलें मन स्थिरस्थावर कर. सद्यःस्थितींत येऊन विचारपूर्वक जें बोलावयाचें असेल तें बोल."

"मग तुम्ही माझी इच्छा मोडून उद्यां 'युवराज' बनणार तर—" सीतादेवी मध्येंच म्हणाली.

"नाहीं, नाहीं. सीतादेवी ! हें कदापिहि होणार नाहीं. एकादा यःकश्चित् नागरिक जर माझ्या युवराजपदाआड आला असता तरीहि मी युवराजपद धिक्कारलें असतें. आणि माझी माध्वी पत्नी जर मला तसें सांगत असेल तर ऐश्वर्यशाली इन्द्राचें पदहि मला नको. मग अयोध्येच्या युवराजपदाची कथा काय ?— मात्र मी तुला पुनः विचारतों, मी युवराज कां होऊं नये ? याची कारणपरंपरा मला समजली पाहिजे.

" उद्यां युवराज बनण्याऐवजीं कषायवस्त्रें नेसून भणंगभिकारी बनून अरण्याचा रस्ता धरला आणि दीर्घकाल अरण्यवासांत राहिलों तर आपण अधिक सुखी होऊं. तुमच्याप्रमाणें मलाहि येथील डामडौलाचा कंटाळा आला आहे. अरण्यवासांत वनचर बनूं ; फल-मूलादि साधा आहार बनवूं ; कषायवस्त्रें परिधान करूं आणि सुखानें झोपडींतील आयुष्य घालवूं. मला चालू आयुष्यापेक्षां तें गरीबीचें आयुष्य जास्त आवडतें. "

" कोमल सीतादेवी ! " रामचंद्र म्हणाले,

" तुझ्यासारखें राजवाड्यांतील बगीच्यांत आणि ऐषआरामांत फुलणारें गुलाबाचें पुष्प निर्जन वनांत, अगदीं कोमेजून जाईल. अरण्यवासाची तुझी कल्पना, प्रणयाची उत्कटता रंगविण्यास कवींना उपयोगी पडेल-परंतु अरण्यवास तो अरण्यवासच; तो कधींहि सुखावह नसायचा. पण देवी, असा निष्कारण हट्ट तूं आज कां धरतेस ? तुझ्यासारखी आज्ञाधारक-माझें मनोगत ओळखून वागणारी-भार्या आज भलतेंच कां बोलत आहे ? देवी ! तुझ्याकरितां मी काय करूं कीं ज्यायोगें तुझ्या मनांतील हा भ्रम नाहींसा होईल ? "

" माझ्यावरील तुमचें प्रेम अखंड असेंच्या असें रहावें, दुसरी 'सवत' यामध्यें उत्पन्न होऊं नये आणि तुमच्या निर्मल प्रेमसरोवरांत मला एकटीलाच पोहण्यास मिळावें असा माझा वेडा विचार आहे. तुम्ही तो मान्य करावा म्हणजे मी पूर्ववत् सुखी होईन. "

" सीतादेवी ! माझ्या एकवचनीपणावर तुमचा कितपत विश्वास आहे ? "

" देव ! हें काय बोलतां ? तुमच्या एकवचनीपणाबद्दल कोण आक्षेप घेईल ? तुम्ही सत्यवचनी आहांत तसें एकवचनीहि आहांत."

" मग देवी ! " श्रीरामचंद्र म्हणाला, " तुझ्या संशयाचें निराकरण करण्याकरितां हा एकवचनी राम, हा सत्याचें पालन करणारा राम, प्रतिज्ञा करतो. ऐक ! सीतादेवी ही एकटीच माझी पत्नी राहील. मी आयुष्यांत दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीचें पाणिग्रहण करणार नाहीं. इतर सर्व स्त्रिया माझ्या भगिनी आहेत. हा रामचंद्र निरंतर सीतादेवीच्या प्रेमाखातर एकपत्नीव्रती राहील अशी मी शपथ घेतों.

देवी ! माझी शपथ तूं ऐकतेस ना ? ती तुला पटली ना ? माझा एकपत्नीव्रताचा पहिला निर्धार आहेच. मी आजपर्यंत सीतादेवी-व्यतिरिक्त अन्य स्त्रीस मनानेंहि वरलें नाहीं. एकपत्नीत्वाची आज-पर्यंत प्रत्यक्ष प्रतिज्ञा झाली नव्हती ती आज या रजनीनाथास साक्ष ठेवून मी घेत आहें. देवी ! आतां तुझ्या संशयाचें निरसन झालें ना ? "

सीतादेवी हंसत म्हणाली, " आतां रामचंद्र जन्माचा माझा झाला. देव ! तुमच्या युवराजपदाच्या आड मी येत नाहीं. केवळ जनतेच्या हिताकरितां आपण युवराजपद स्वीकारणार आहांत ? "

" मी जनतेचा सेवक. युवराज्ञीस जनतेची सेविका व्हावें लागेल." रामचंद्र म्हणाला.

" आपणास ऐषआराम नको." सीतादेवी म्हणाली, " नटणेंथटणें नको; दागदागिने नकोत; दासीसेवक नकोत. आपण उभयतां जनतेचे सेवक बनूं आणि देवलोकांतहि प्रशंसिली जाईल अशी जन-तेची अखंड सेवा करूं. "

" मग– अरण्यवासी बनून वनचरांप्रमाणें अरण्यांत दिवस कंठ-ण्याचा तुझा हेतू मावळला ना ? "

" नाथ ! ही माझी फारा दिवसांची इच्छा आहे. राजकारणांत अखंड वेळ घालविणारा रामचंद्र आतां लोककार्यांत अधिक वेळ खर्च करील आणि माझ्या सहवासांत दिवसेंदिवस कमी कमी वेळ घालवील. परंतु अरण्यवासांत रामचंद्राचा अखंड सहवास मला घडेल. त्या सोन्याच्या दिवसाची मी युवराजपदापेक्षां जास्त आतुरतेनें वाट पाहात आहे. किंबहुना उद्याचा ' युवराजमहोत्सव ' थांबला आणि आणि आपण अरण्यवासी बनून तिकडे सुखानें गेलों तरीही मी स्वतःस धन्य मानीन. "

" सीतादेवी ! तूं अत्यंत भावनाप्रधान आहेस. मी स्त्री-मोहाचा इतका चाहता नाहीं. लोककल्याण हेंच माझें व्रत. त्या लोककल्याणां-तून जितका वेळ मला फावेल तितका सीतादेवीच्या सहवासांत मी अवश्य घालवीन. व्यर्थ अरण्यवासाची इच्छा धरूं नकोस. "



युवराज-निवडणुकीच्या सभेंतील श्रीरामचंद्राच्या भाषणाची अयोध्येच्या नागरिकांत मोठी प्रशंसा झाली. युवराज म्हणजे भावी राजा; त्याला निवडून देण्याचा हक्क सर्वस्वी नागरिकांचा आहे. हा राजा राजघराण्यांतील असो वा नागरिकांतील असो असें उघड सभेंत खुद्द रामचंद्रांनीं सांगितलें आणि असें करून त्यांनी आपला मोठा सन्मान केला अशी नागरिकांची भावना झाली. यामुळें रामचंद्रावरील त्यांचें प्रेम सहस्त्रपटीनीं वाढलें. असा लोकमतानुवर्ती राजा प्रजानुरंजन खात्रीनें करील; असा निर्दोप आणि अत्यंत सद्‌गुणी राजा आपल्या आयुष्यांत निस्संदेह चांगलें वळण लावील; असा पुण्यवान आणि उद्दात्त विचारांचा राजा आपलें पुत्रवत् पालन करील असें वाटून विचारी नागरिकही परम आल्हादित झाले होते; मग उत्सवप्रिय नागरिकांची काय कथा?--

कित्येक वर्षांत झाला नाहीं, पाहिला नाहीं असा उत्सव-समारंभ आपण साजरा करूं, दरबाराकडून होणाऱ्या उत्सवाच्या कार्यार्थ बरोबरीनें मदत करूं असा नागरिकांनीं संकल्प केला. उत्सवाप्रीत्यर्थ होणाऱ्या मेजवान्या, होणारीं गाणींबजावणीं, कुस्त्या-शर्यती वगैरे अफाट कार्यक्रम दरबारनें मुक्रर केला होता. या कार्यक्रमांत भाग घेऊनही नागरिकांनीं आपले स्वतंत्र कार्यक्रम ठरविले होते. आसपासच्या प्रदेशांत आणि खुद्द अयोध्येच्या राज्यांतहि कधीं मिळाला नव्हता असा पुण्यश्लोक युवराज आपणास लाभत आहे हें अयोध्येच्या नागरिकांचें परम भाग्य असें मानून मोठ्या उत्साहानें आणि आनंदानें समारंभ पार पाडण्याकरितां अयोध्येचे नागरिक तयार झाले. त्यांनीं आपापलीं घरें सुशोभित केलीं. आणि सार्वजनिक मंदिरें, बाजारपेठा, दुकानें यांची अत्यंत उत्तम सजावट केली. आणि ते मोठ्या आतुरतेनें युवराज-पदप्राप्तीच्या प्रसंगाची वाट पाहात राहिले.

राजवाड्यांतील आनंद तर परमावधीस गेला होता. नजर–नजराणे काय द्यावेत; दानधर्म काय करावा; विद्वान् ब्राह्मणांस दक्षिणा काय द्यावी; नोकरचाकरांना कसलीं बक्षिसें द्यावीत इत्यादि वाटाघाटी आदल्या रात्रीं झाल्या. उद्यांचा दिवस गेला म्हणजे परवां सकाळींच युवराज्याभिषेक होणार. इतक्या निकटवर्ती उत्सवाकडे खुद्द राजा, त्याच्या राण्या–रामचंद्राव्यतिरिक्त त्याचे बंधु हे अत्यंत उत्सुकतेनें पाहत होते. रामचंद्र मात्र आनंदाची एकही छटा दिसू न देतां शांतपणें सर्व गोष्टी अवलोकन करीत होता.

चैत्र शुद्ध अष्टमीचा दिवस. कर्तबगार राणी कैकयी सुखमय निद्रेंतून अचानकपणें उठली. स्वप्नांतील रामचंद्राचा अभिषेक तिनें सानंद पाहिला होता. त्या आनंदाच्या उर्मीसह राणी जागी झाली. मैना, रांघू वगैरेंचे अनेक पिंजरे तिच्या शयनमंदिरांत लटकत होते. त्यांतील एका पिंजऱ्यांतून मैनेचा कर्णकटु आवाज तिनें ऐकला.

"काय, मैने! तूहि माझ्या आनंदास साथ देत आहेस?" कैकयी आनंदानें पुटपुटली.

पुनः पुष्पवाटिकेंतून वाहात आलेला सुगंधित वायु तिच्या अंगास स्पर्श करून गेला. 'अमूर्तिक वायुही अत्यत सुखी दिसत आहे' ती स्वगत म्हणाली. वातायनाकडे जाऊन तिनें बागेंत डोकावलें. तों तेथें एक मयूर आनंदानें पिसारा पसरून नृत्य करीत आहे; असें तिनें पाहिलें. 'मयूरहि आपला आनंद व्यक्त करून आपणाशीं सहकार्य करीत आहे' असें ती म्हणाली. बागेंतील हंसऱ्या फुलांनीं तर तिचा आनंद द्विगुणित केला. ही चराचर पृथ्वी आनंदित झालेली आहे असें तिनें आपलें मनोगत व्यक्त केलें. इतक्यांत पूर्वेकडील पर्वताच्या आड दडलेला बालसूर्य हंसतच वर आला. हें पाहून राणी कैकयीचा आनंद पराकोटीला गेला.

"उद्यां माझ्या रामास यौवराज्याभिषेक होणार– याकरितां जगांतील वस्तुमात्रांस आनंद झाला आहे' असे ती पुनः म्हणाली.

सूर्योदयानंतर तिला बऱ्याच गोष्टी करावयाच्या होत्या. दशरथाच्या तीन राण्या; पण कर्तबगार राणी एकटीच. महाराणी कौसल्या तर नेहमीं पूजाअर्चा आणि तत्सम धर्मकार्य करण्यांत

मग्न असे. राणी सुमित्रा ही तिचाच मासला. तेव्हां राजघराण्यांतील मुख्य स्त्री म्हणून सर्व भार कैकयीवरच होता. पूर्वेकडील वातायनांतून राणी परतत आहे तोंच एक दासी तिच्या संन्निध आली आणि लवून मुजरा करून म्हणाली, "राणीसाहेब ! बाहेर कापडांचे गठ्ठे घेऊन कारभारी आले आहेत."

"मी स्नान आटोपून थोड्याच वेळांत येतें; तोपर्यंत राजवाड्यांतील सर्व दासदासींना तूं एकत्रित कर. त्यांना बक्षिसें द्यावयाची आहेत." राणी म्हणाली.

दासी गेली आणि आतां स्नान करण्याकरितां कैकयी जाणार तोंच तिची दासी मंथरा फाडकन् दार उघडून आंत आली. मंथरा अत्यंत संतापलेली होती. तिची क्रुद्ध मुद्रा पाहून राणी कैकयी म्हणाली,

"असें उग्र रूप धारण कां केलेंस ? सर्व जग आनंदांत बेहोष झालें असतांना मंथरेनेंच इतकें क्रोधवश कां व्हावें ?

"राणी !" क्रुद्ध मंथरा म्हणाली, "तुझ्या शहाणपणाचें दिवाळें वाजलें; तुझी अक्कल लयास गेली. तूं हें काय प्रारंभलें आहेस ?"

"मंथरे ! " राणी म्हणाली, "तुझी अशी बेताल वर्तणूक पाहून मला फार आश्चर्य वाटते. तुला काय झालें तें सांग."

"मला कांहीं झालें नाहीं." मंथरा म्हणाली, "पण तुझी अक्कल कोठें गेली ?"

"यें म्हातारे ! तूं माझी दाई. म्हणून तुला अरेतुरे बोलण्यास परवानगी आहे. अश्वपालबाबांनीं 'मी नको' म्हणत असतांना तुला मजबरोबर येथें पाठविलें. तूं माझा दर्जा विसरून अपमानस्पद भाषा बोललीस तर तें मी सहन करणार नाहीं. काय असेल तें शांतपणें बोल." राणी म्हणाली, "उद्यां रामाचा युवराज-अभिषेक. मला अनेक कामें करावयाची आहेत. चटपट् बोल ! "

"कैकयी ! " मंथरा म्हणाली, "तूं दशरथाची आवडती पत्नी असून तुला दोन सवती-आहेत हें तूं विसरतेंस काय? तुझ्या सवतीच्या पोरास युवराज्याभिषेक होतो आणि त्यास तूं आनंदानें संमति देतेस ? माझा आजपर्यंतचा उपदेश तूं विसरलीस काय ?"

कैकयी मध्येंच म्हणाली, " महाराणी कौसल्यादेवी आणि राणी सुमित्रा यांना सवती मानून मी त्यांचा द्वेष करावा अशीच तुझी शिकवण ना ?"

मंथरेनें सम्मतीदर्शक मान हलविली.

"तूं मला वेळोवेळीं उपदेश केलास आणि मत्सराचें विष माझ्या मनांत पेरण्याचा प्रयत्न केलास. परंतु दुर्दैवी स्त्रिये ! पूर्ण लक्षांत घे ! झालाच तर तुझ्यासारख्या भिकारड्या स्त्रियांस सवती-मत्सराचा उपसर्ग व्हावयाचा. परंतु आम्ही भाग्यशाली सम्राटाच्या पत्नी आहोंत. आम्हास कशाची उणीव ? दररोज सोन्याचा घास खावयास आम्हांस मिळतो. मन मानेल तशीं भारी वस्त्रें आम्हांस परिधान करावयास मिळतात. हिऱ्यामाणकांच्या दागिन्यांनीं आमचा खजाना भरलेला आहे. मग कशाची वाण पडली म्हणून आम्हीं मत्सर करावा ? दरिद्री लोकांच्या घरांतून प्रत्येक गोष्टींची वाण असते. आणि मग अमक्यास चांगलें-अमक्यास कमी प्रतीचें असा मत्सर निर्माण होतो. भाग्यशाली सम्राट याच्या घराण्यांत तशा मत्सरास थाराच मिळणार नाहीं. त्यातून राजा दशरथांचा स्वभाव अत्यंत थोर व विलासी. त्यांच्या अफाट प्रेमाच्या समुद्रांत मी एकटीच काय पण आणखी दहा राण्यांनाही मनमुराद सुख मिळावयाचें. तशांतहि महिषी कौसल्या यानीं रामजन्मापासून भोगास लाथाडलें आहे. राणी सुमित्रादेवी कौसल्येच्या मागोमाग जाते. तूं उपदेश केलास तेव्हांच त्याचा मार्गेंच मी इन्कारही केला होता. तरीही तूं सांगत आहेस. तुझ्या अडाणीपणाबद्दल मी तुझी आजपर्यंत गय केली. परंतु आतां तुला मी निक्षून सांगतें कीं आम्हा तिघींच्या मनांत सवती-मत्सराची किंचित्‌हि छाया नाहीं. आम्ही तिघीजणी सख्ख्या बहिणीप्रमाणें परस्परांवर प्रेम करतों."

राणी कैकयीस वाटले कीं ही आपली म्हातारी दाई आतां आपली चूक कबूल करील आणि स्वस्थ बसेल. परंतु मंथरेचा राग कैकयीच्या भाषणानें काहींच कमी झाला नाहीं. ती अधिकच चिडून म्हणाली,

" उद्यां युवराजपद रामास मिळणार; भरतास मिळणार नाहीं. भरत हाच तुझा पुत्र. रामचंद्र तुझा पुत्र नाहीं. "

"हें मला माहिती आहे" राणी मध्येंच ओरडून म्हणाली, "रामचंद्र भरतापेक्षांहि जास्त प्रेम मजवर करतो. भरत आणि राम याच्यात मला मुळींच दुजाभाव वाटत नाहीं. रामचंद्र सद्‌गुणी आहे, मिष्टभाषी आहे आणि रामचंद्रास नागरिकांनीं निवडून दिलें आहे. कौसल्येसही उद्यां भरतासच युवराजपद प्राप्त होत आहे असें वाटतें. इतकी माझी अलोट भक्ति रामचंद्रावर आहे आणि सुदैवानें रामचंद्र वडील असल्यानें त्यासच युवराजपदाचा मान मिळणें योग्य आहे."

"चारदोन घटिकाच्या अवधीमुळें वडीलकी रामाकडे जात असली तर तसें प्रतिपादणारीं शास्त्रें जाळून टाकावीत." मंथरा म्हणाली "वडीलकीचा कांहीं संबंध नाही. राजाचा ओढा रामचंद्राकडे आहे. भरत येथें नाहीं याचा फायदा घेऊन त्यास आमंत्रणहि न करितां रामास युवराजपद देऊन राजा मोकळा होणार आहे. परंतु भरताची आई.-प्रत्यक्ष त्याची जननी-दशरथाची अत्यंत आवडती राणी येथें जिवंत आहे ना? प्रत्यक्ष पोटच्या पोराचा कैवार जी आई घेत नाहीं ती आई नव्हे, कृत्या ; ...."

"तोंड आटोपून बोल!" कैकयी म्हणाली, "पुन: दुरुत्तर आलें. जशी माझी रामचंद्रावर भक्ति आहे तसेंच भरताचें बन्धुप्रेम रामचंद्रावर आहे. रामचंद्र युवराज झाला हें ऐकून भरतासही आनंदच होईल. म्हातारे! तुझी वटवट बंद कर. असली वटवट ऐकण्यास मी नाराज आहें व मला सवडही नाहीं."

"आत्मघातकी स्त्रिये!" मंथरा संतापातिशयानें म्हणाली, "तूं आपण होऊन स्वत:च्या नाशास प्रवृत्त होऊं लागली आहेत. रामचंद्रास राज्यपद आल्यानंतर तुझी कोण दैना उडेल याचा विचार कर. कौसल्या ही राजमाता होईल आणि तुला बटकी-दासीचे दिवस येतील. गोड बोलणारा लाघवी राम आणि धर्माचें ढोंग करून बसलेली कौसल्या तुझा पुरेपूर सूड उगवतील! अरेरे, देवा! ही माझी भाग्यशाली कैकयी किती सुखांत आहे; परंतु भावी काळ किती दुर्दैवाचा आहे याची हिला कल्पनाही होत नाहीं."

"थेरडे !" कैकयी राणी म्हणाली, "तूं मला अपशब्द बोललीस ते मी सहन केले. पण रामचंद्राची निंदा तूं मजसमोर करतेस? देवी कौसल्या परमेश्वरी अवतार! त्यांची निंदा मजसमोर करतेस? तुला वेड का लागलें आहे?"

"हे दुर्दैवी स्त्रिये!" मंथरा म्हणाली, "तुझें दुर्दैव पूर्णपणें ओढवलें आहे असें मला वाटतें. राजा दशरथ पूर्णपणें तुझ्या मुठींत आहे. तूं म्हणशील ती गोष्ट करण्यास तो तयार आहे. या सुसंधीचा फायदा घेण्याचें सोडून आपमतलबी रामाच्या गोड गोड भाषणास तूं बळी पडतेस. पण पूर्णपणें लक्ष्यात ठेव कीं रामचंद्रास राज्यपद प्राप्त झालें रे झालें कीं तुझ्या आणि भरताच्या दुःखी जीवनास सुरुवात झाली. राणी! हा अविचार सोडून दे. अद्याप अवधी आहे. इकडची दुनिया तिकडे करण्याचें तुझें सामर्थ्य आहे. भरतास सिंहासन आणि रामाला वनवास अशा सर्वांस अतर्क्य वाटणारी घटना घडवून आणचें सर्वस्वी तुझ्या हातांत आहे. विचार कर; पुनः विचार कर आणि कामाला लाग."

"आतां मात्र तुला वेड लागलें आहे असें मी म्हणतें." कैकयी म्हणाली, "वेडाच्या भरांत तूं कांहींहि बडबडतेस. भरतास सिंहासन आणि रामास वनवास ही अभद्र भाषा पुनः बोललीस तर समारंभ पार पडेपर्यंत तुला बंदिस्त राहावें लागेल. शहाणी हो; विचारवंत हो. प्रसंगानुसार वागण्यास तयार हो. चल! माझे दाई मंथरे! तुला कसली साडी पाहिजे? त्याची निवड कर. पहिलें बक्षीस मी तुला देईन."

"या बक्षिसाचा आणि साडीचा मी इन्कार करतें." मंथरा म्हणाली, "रामास उद्यां युवराजपद प्राप्त झालें म्हणजे तुला सीतेची बटीक व्हावें लागेल आणि भरतास रामचंद्राचा सेवक व्हावें लागेल. ही आपत्ति टाळायची असेल तर माझे दोन शब्द ऐक!"

"तूं द्वेषानें अगदीं अंध झाली आहेस; तुझा मत्सराग्नि फारच भडकला आहे. तुझा मेंदू ठिकाणावर राहिला नाहीं. तूं वाटेल तें बकूं

लागली आहेस. माझ्या भरतावर राम आपल्या प्राणापेक्षांहि अधिक प्यार करील याची मला खात्री आहे आणि मला देवी सीता किंवा महिषी कौसल्या लेशमात्र अपमानानें वागविणार नाहींत. राजा दशरथाच्या समृद्ध घरीं आणि कुलदीपक राम प्रकाशत असतां आपत्तीची भीति आम्हांस कशी राहील ? तूं शांत होणार असलीस तर तूं जें अभद्र बोललीस त्याची अजूनहि माफी मिळेल. नाहींतर तुला शासन करावें लागेल. ''

'' दुर्दैवी स्त्रिये ! तुला दुर्दैवानें पुरें घेरलें आहे. कपटपटु रामानें तुला आपल्या जाळ्यांत पूर्णपणें धरलें आहे. तूं स्वतःच्या नाशाबरोबर आपल्या प्रियतम मुलाच्याहि नाशास प्रवृत्त झाली आहेस. आज तूं राज्ञीपदाचा उपभोग घेत आहेस. दशरथाची प्यारी राणी म्हणून तुझी हुकमत चालते. पण हे दिवस जातील आणि रामाची सीता राज्ञी होईल आणि कौसल्या राजमाता बनेल. तुझ्या राज्ञीपदाचा नाश झाला म्हणजे तूं येथें आम्हा चार बायकासारखी होशील. देईल तेवढें खावें, मिळेल तें ल्यावें, नेसावें आणि अखंड सीतादेवींची सेवा करावी असा तुझा दुर्दैवी कार्यक्रम होईल आणि भरत तर रामाचा दासानुदास बनेल. ही आपत्ति टाळणें तुला शक्य आहे. तूं शहाण्यासारखी वागलीस आणि माझ्या दोन गोष्टी समजून घेतल्यास तर अद्यापहि तुझा बचाव होईल. त्या कपटी रामाच्या मधुर भाषणास भुलूं नकोस ! गोड बोलणारीं माणसें महा बिलंदर आणि कपटी असतात. हा वरून सौम्य दिसणारा राम आंतून किती ' काळा ' आहे याची तुला कल्पना नाहीं. तूं शत्रुसच आपला मित्र समजतेस ! इतका मूर्खपणा तुझा वाढला आहे. '' मंथरा म्हणाली.

'' बस्स कर ! '' कैकयी रागानें म्हणाली, '' तुला फार वेळ बोलूं दिलें हा माझा अपराध आहे. शिक्षा भोगण्यास तयार हो ! ''

असें म्हणून तिनें शयनमंदिराचें दार खाड्‌दिशीं उघडलें. बाहेर तिच्या अनेक दासी उभ्या होत्या.

'' कुसुमावती ! '' राणी एका दासीस म्हणाली,

'' या मूर्ख म्हातारीस तूं आपल्या ताब्यांत घे. उद्यांचा समारंभ पार पडेपर्यंत हिला एकाद्या खोलींत बंदिस्त कर. तिचा शब्दहि

कोणास ऐकूं जाणार नाहीं असा सक्त पहारा ठेव. मात्र तिच्या अन्नपाण्यास जप. समारंभ संपल्यानंतर हिला मजसमोर उभी कर. म्हणजे हिची रवानगी बाबांच्याकडे करीन." असें म्हणून राणी कैकयी आपल्या अंतःपुरांतून स्नानगृहाकडे गेली. स्नान करून परत आली तेव्हां कैकयीदेवी अत्यंत शांत व प्रसन्न दिसत होती. तिच्या मुखावर आनंदाचें राज्य दृग्गोचर होत होतें.

"काय कारभारी!" ती म्हणाली, "कपडे आणलेत ना? स्त्रियांच्या साडया, पुरुषांची धोतरें आणि उत्तरीय वस्त्रें आणलींत ना?"

"होय!" कारभारी म्हणाले, "राणीसाहेब, बक्षिस देण्याकरितां सर्व कपडे आणलेले आहेत."

"राजवाडयांतील सर्व दासदासी, लहानमोठे नोकर येथें जमले आहेत ना?" राणीनें प्रश्न केला.

तिच्या प्रश्नास होकार मिळाला. बक्षिस देण्याचा कार्यक्रम सुरू झाला. हा कार्यक्रम दोन घटिका चालू होता. कार्यक्रम चालू असतांना राजा दशरथ तेथे आला. तो राणीस उद्देशून सहास्यवदनानें म्हणाला,

"काय? बक्षिसाचा समारंभ आजच उरकून घेतला?"

"आर्यपुत्र!" सुहास्यवदना कैकयी म्हणाली, "उद्याच्या समारंभास त्यांना नवे कपडे उपयोगी पडावेत म्हणून मी सर्व नोकरवर्गास आजच बक्षिसें दिली आहेत."

थोडयाच वेळांत बक्षिसाचा कार्यक्रम संपला. राजा राणीसह भोजनाकरितां निघून गेला.

दोनप्रहरीं कैकयी राणीकरितां बराच मोठा कार्यक्रम होता. तिनें जाऊन मंडपांतील बैठक तपासली, स्त्रियाकरितां जागा राखून ठेविल्या. अभिषेकापूर्वी रामचंद्र कुठें बसेल आणि अभिषेकानंतर तो कोठें बसेल या जागा मुक्रर केल्या. प्राणप्रतिष्ठा आणि होमहवन इत्यादि अभिषेकाचा धार्मिक विधि होतांना विद्वान् पंडित आणि इतर भिक्षुक यांनीं कोठें बसावें हें ठरवून ती मंडपाच्या तोंडाशीं

आली. तेथील नगारखान्याच्या प्रमुखास बोलावून तिनें सांगितलें, " कर्कश आवाजाची सनई आणि घोगऱ्या आवाजाचा नगारखाना यांचा उच्चारहि उद्यां होऊं देऊ नका. सुरेल संगीत मधुर आवाजानें सनईनें गावें आणि त्यास सौम्यपणें नगारखान्यानें मदत करावी, असा माझा हुकूम आहे. "

" होय महाराज ! " असें म्हणून नगारखान्याचा मनुष्य निघून गेला. त्यानंतर विविध ठिकाणचीं केंद्रें तिनें तपासलीं आणि सर्व व्यवस्था बिनचूक आहे असा आनंद व्यक्त केला. त्या वेळीं तिसरा प्रहर झाला होता.

सूर्याचा आताप किंचित कमी झाला होता. ती आपल्या महालांत गेली आणि किंचित काळ विश्रांति घेऊन पुनः दुसऱ्या कार्याला सुरवात करणार तोंच ती एकटी आहे असें पाहून तिच्या ओळखीचा प्रफुल्ल कुमार तेथें आला.

" प्रफुल्ल ! " राणी विस्मयानें म्हणाली, " तूं दोन दिवस दिसला नाहींस. अगदीं ऐन वेळेस कोठें निघून गेला होतास ? इकडे रामचंद्राचा अभिषेकमहोत्सव जोरानें सुरू आहे. बरें झालें ! उद्यांच्या महोत्सवाच्या पूर्वी तरी आलास. ये ! तुझें बक्षिस तयार आहे. " असें म्हणून राणीनें एक सुंदर रेशमी वस्त्र आणि तसलेंच भारी वस्त्र नेसण्याकरितां त्याला दिलें.

तेव्हां प्रफुल्लकुमार म्हणाला,

" माझ्या कोणत्या कामगिरीबद्दल मला हें बक्षिस मिळालें ? "

" कामगिरीबद्दल मोठें बक्षिस जें तू मागशील तें मिळणार आहे. परंतु तूं त्याचा उच्चारच करीत नाहींस. खालीं बैस ! "

प्रफुल्लकुमार म्हणाला, " राणीसाहेब ! मी एक विनंती करण्यासाठीं आलो आहें. "

"काय तुझी इच्छा आहे बोल " राणी म्हणाली. तो आसपास कोणी नाहीं अशी खात्री करून घेऊन हळूंच म्हणाला,

" विश्वामित्र ऋषी येथें आले आहेत. "

" त्यांचा उचित सत्कार येथें झालाच पाहिजे " राणी म्हणाली.

"विश्वामित्र महर्षी येथें जाहीर रीतीनें आले नाहींत. ते उद्यांच्या समारंभाला हजर राहूं इच्छित नाहींत. खुद्द रामचंद्र अगर राजा दशरथ यांचीहि भेट ते घेऊं इच्छित नाहींत. केवळ आपली भेट एकान्तांत व्हावी, अत्यंत गुप्तपणें ही भेट व्हावी, अशी त्यांची इच्छा आपणास कळविण्यास मला त्यांनीं सांगितलें आहे. "

" काय ? विश्वामित्र महर्षी माझी गुप्त भेट घेऊं इच्छितात ? ते रामचंद्राला भेट सुद्धां देत नाहींत ? इतकें महत्त्वाचें काम मजजवळ काय आहे ? कांहीं असो. महर्षींची इच्छा पुरी झाली पाहिजे. प्रफुल्लकुमार ! ते कोठें माझी भेट घेऊं इच्छितात ? "

" कोणत्याहि गुप्त जागीं. " प्रफुल्लकुमार म्हणाला.

" जा ! त्यांना मागील दरवाजानें माझ्या पांचूच्या महालांत घेऊन ये. तेथें कोणीहि येणार नाहीं. मी महर्षींची वाट पाहात तेथेंच आहें. " राणी म्हणाली.

प्रफुल्लकुमार राणीस अभिवादन करून त्वरेनें निघून गेला.

# ९

बेदरकार वृत्तीच्या, करारी स्वभावाच्या आणि प्रसन्न वदनाच्या विश्वामित्र महर्षींचें स्वागत आपणास इतक्या गुप्त रीतीनें करावें लागणार असें मानून कैकयी राणी आतुरतेनें वाट पहात होती. तोंच तिच्या हिरव्या महालाचा दरवाजा उघडला गेला आणि आंत एक विचारमग्न, चिंताव्यग्र, आणि मननवंदन अशा मुनीनें प्रवेश केला. त्याच्याकडे साशंक वृत्तीनें पहात कैकयी उद्गारली,

"ही राज्ञी कैकयी आपलें अत्यंत आदरपूर्वक स्वागत करते आचार्य ! आपण कांहीं आजारी होतां काय ? नेहमींची प्रसन्नता आज मला दिसत नाहीं. महर्षी ! आपलें दरबारी थाटानें अयोध्येच्या राजानें मंत्रिमंडळासह स्वागत करावयाचें, तें आज मला इतक्या गुप्तपणानें येथें करावें लागत आहे."

"राणी कैकयी !" विश्वामित्र म्हणाले. "मी आज कांहीं राजाचा आमंत्रित पाहुणा नाहीं. मीहून राणी कैकयीची भेट घेत आहे. स्वागताची अपेक्षा मुळीच नाहीं. माझें एक अत्यंत महत्वाचें कार्य—अत्यंत महत्वाचें कार्य—राणी कैकयी पार पाडील असें मला वाटतें. तें पार पाडण्याचा स्वीकार राणीकडून झाला म्हणजे मोठा सन्मान झाला असें मी समजतों."

"महर्षी !" राणी म्हणाली, "उद्यांच्या समारंभानंतर मला आपली आज्ञा व्हावी. मी ती शब्दशः पुरी करीन. शांत चित्तानें रामाच्या युवराज अभिषेकप्रसंगीं त्यास शुभाशिर्वाद द्या, उद्यांच्या समारंभास हजर रहा आणि नंतर तुमची आज्ञा शब्दशः मानण्यास मी तयार आहें."

"राज्ञी !" विश्वामित्र म्हणाले, "येथें आपली गुप्त बैठक होत आहे ना ? आपलें संभाषण कोणी ऐकणार नाहीं ना ?"

"त्याबद्दल महर्षींच्या मनास लेशमात्रही शंका नको. येथें कोणीहि येणार नाहीं." राणी म्हणाली.

"राज्ञी !" महर्षी म्हणाले "रामचंद्राचें महत्व तुमच्या लक्षांत आलेलें नाहीं. अयोध्येचा राजा बनण्यापेक्षां, एका लहानशा राज–वटीची धुरा शिरावर घेण्यापेक्षां अधिक जबाबदारीचें महत्कार्य त्यास करावयाचें आहे. अयोध्येचें राज्य मंत्र्यांच्या साहाय्यानें एकादा साधारण मनुष्य चालवील. रामचंद्रासारखा विष्णुतुल्य, सद्‌गुणी, पराक्रमी आणि लोकोत्तर पुरुष अयोध्येच्या गादीप्रीत्यर्थ इरेस घालणें म्हणजे आपल्याच पायावर आपण कुऱ्हाड मारून घेण्यासारखें आहे. उद्याचा युवराज-उत्सव पाहण्याकरितां मी आलों नाहीं. तो दीर्घ–कालापर्यंत स्थगित करण्याकरितां मी आलों आहें. राणी ! अशी घाबरूं नकोस. तुला माझें मनोगत कळलें, माझ्या भाषणाचा हेतू कळला म्हणजे माझ्या या भाषणांत किती सत्य आहे याचा प्रत्यय येईल. तुमच्या दरबारीं वशिष्ठ, वामदेव आहेत ना ? ते तपस्वी असून राजाच्या दरबारीं कां राहतात ? तपाची सिद्धि राजदरबारीं होते, का हिमाचलासारख्या शांत प्रदेशीं होते ?"

"वशिष्ठ, वामदेव अत्यंत विचारवंत आणि ज्ञाते आहेत. हिमा-चलासारखें तपसाधनास योग्य स्थान सोडून राजदरबारीं राहण्याचा त्यांचा हेतू काय असावा हें मी कसें सांगणार ?"

"तक्षशीलेचें गुरुकुल तूं अवलोकन केलें आहेस ना ? तेथील गोविंद वल्लभ स्नान-संध्या करण्याकरितां गंगातीरीं वास करीत नाहीं. हजार–पांचशें विद्यार्थी गोळा करून त्यांना शिक्षण देण्याचें कार्य करीत आहेत. याचा हेतू तुला समजतो काय ? आमच्याही सिद्धा–श्रमीं गुरुकुल आहे. तेथील शिक्षणाचें कार्य म्हणजे अध्यात्मदृष्ट्या मोक्षाचा मार्ग नव्हे. तरीही आम्ही तेथें शिक्षण देण्याचें कार्य करतों ना ? अशा प्रकारचीं अनेक गुरुकुलें आहेत. त्या गुरुकुलांतून शिक्षण देण्याचें कार्य मोठमोठे महर्षी आणि तपस्वी करतात. तपसाधनाचा मुख्य हेतू सोडून हें दुय्यम शिक्षणाचें कार्य आम्ही कां करतों याचा विचार कधीं राज्ञीस झाला आहे काय ? जसे वशिष्ठ–वामदेव अयो-

ध्येच्या दरबारीं आहेत तसेंच आर्यावर्तांत जितकीं आर्यांचीं राज्यें आहेत तितक्या सर्व राजवटींतून प्रत्येक राजवटींत एक अथवा दोन विद्वान महर्षी राजास सल्लामसलत देण्याकरितां विनावेतन स्वखुशीनें काम करीत आहेत आणि असें करण्यांत त्यांचें आत्मकल्याणप्राप्ती–कडे किंचित दुर्लक्ष होतें. हें दुर्लक्ष विचारांतही न घेतां स्वयंस्फूर्तीनें वशिष्ठ वामदेवादि मंडळी राजवटींत सल्लामसलतीचीं कामें करीत आहेत. गुरुकुलें चालविणें, राजवटींत सल्लामसलतीचीं कामें करणें हीं कार्यें सर्वसंगपरित्याग करणाऱ्या आमच्यासारख्या ऋषीमुनींनीं कां पत्करावीं यास राणी, तुजजवळ कांहीं उत्तर आहे काय ?'

राणीनें कांहीं वेळ विचार करून कांहीं उत्तर नाहीं असें सांगितलें.

"राजकारणांतून—" विश्वामित्र पुन्हा बोलूं लागले, "लोक-शिक्षणाच्या कार्यांतून आम्ही कां भाग घेतों याचा विचार अयोध्येच्या राजा दशरथानें केला नाहीं आणि एकाही राजवटीस हा विचार सुचला नाहीं. तो बिकट प्रश्न राज्ञी ! तुला कसा सोडवितां येईल ? आणि आम्ही ऋषीमुनी एक हिमालयावर रहावयाचें अथवा गंगा-नर्मदा इत्यादि पावन तीर्थांच्या ठिकाणीं आमचा वास असावयाचा. तपसाधन आणि आत्मशुद्धी हेच मार्ग निरंतर आमच्यापुढें असावयाचे. आम्ही मार्गच्युत झालों आहोंत असा तर राज्ञी, तुझा आमच्यावर दोषारोप नाहीं ना ?"

"आपणासारखे थोर, विचारवंत, ज्ञानी असे मुनी मार्गच्युत होतील असें मी कदापि म्हणणार नाहीं. तुमचा कोणता तरी स्तुत्य हेतू याच्या बुडाशीं असला पाहिजे."

"ठीक बोललीस, राज्ञी, ठीक बोललीस!" विश्वामित्र आनंदून म्हणाले, "आर्यांचीं राज्यें बाल्यावस्थेंत आहेत. तीं स्थिरस्थावर होऊन त्यांचा परम उत्कर्ष व्हावा, आर्यावर्तांतील आर्यांची वस्ती चिर-स्थायी व्हावी आणि आर्यांचीं साम्राज्यें कायम टिकावींत हा हेतू आमच्या प्रयत्नांच्या बुडाशीं आहे. किंबहुना आमची मध्यवर्ती संस्था आहे. वेळीं अवेळीं लोकशिक्षणानें जागृति करून आणि राजांस प्रसंगीं

योग्य मसलत देऊन आर्यांच्या उत्कर्षाचें कार्य आम्ही हातांत घेतलें आहे.'

" आणि त्यामुळें आपण अत्यंत धन्यतेस पात्र झाला आहांत. आतां माझ्या लक्षात आलें. आपलें मध्यवर्ती सल्लागार मंडळ आणि त्यांचें महत्कार्य यामुळें आमच्या आर्यांच्या राज्यास महत्व प्राप्त झालें आहे. आपल्या थोर व प्रशंसनीय कामगिरीची जाणीव मला नव्हती. ती आचार्यांनीं मला आज करून दिली. मी आचार्यांची अत्यंत आभारी आहें.''

"राणी ! मी तुला फक्त प्रास्ताविक भाग सांगितला. आतां आर्यावर्तास एकादें मोठें संकट निर्माण झालें आहे काय ? तुला त्याची माहिती आहे काय ? "

"आचार्य ! सर्वत्र आबादीआबाद चाललें आहे. कोठें युद्ध नाहीं, कोठेंहि कलह नाहीं. मला भावी संकटाची कल्पना मुळींच येत नाहीं. "

" सुखलालसा आणि ऐषआराम यांत आर्यावर्तातील राजे इतके तल्लीन झाले आहेत कीं, त्यांना उद्यांचा दिवस दिसत नाहीं. शत्रू जेव्हां राजधानींत शिरेल आणि छातीशीं भिडण्याचा प्रसंग प्राप्त होईल तेव्हां हे विलासी राजे जागे होणार ! राज्ञी ! आर्यावर्तावरील संकट फार मोठें आहे आणि तें इतकें निकटवर्ती आहे कीं, विचार केल्यास त्या संकटाची सहज कल्पना येईल. हल्लीं आमचीं धर्मकृत्यें निर्विघ्नपणें पार पडत नाहींत ही गोष्ट आपल्या ऐकिवांत आहे ना ?"

" होय ! राक्षसांचा उपसर्ग आपल्या यज्ञकार्यांत होत असल्यामुळें आपण राम-लक्ष्मणास कांहीं वर्षांपूर्वीं सिद्धाश्रमांत घेऊन गेला होता. त्यानंतरहि बऱ्याच ऋषींकडून राक्षसांचा उपसर्ग आम्हास होत आहे अशा तक्रारी दरबाराकडे आल्या आहेत." कैकयी म्हणाली.

" संपत्तीवर चोरटें हल्ले करणें-" विश्वामित्र म्हणाले, " आणि विशेषतः रूपवती स्त्रियांना पळवून नेणें, असे प्रसंग नित्यशः घडत

आहेत. उत्तर कुरु प्रांताचा राजा शत्रुंजय याची रूपवती कन्या उत्तरा काशीचा राजा अरिदमन याच्या राजपुत्रास दिली होती. लग्नाच्या पहिल्याच दिवशीं उत्तरा नाहींशी झाली, ही गोष्ट आपण ऐकली आहे ना ?"

" शत्रुंजयराजाची कन्या उत्तरा ही लग्नाच्या दिवशीं अचानकपणें नाहींशी झाली ही गोष्ट मीं ऐकली आहे. तिचा पुष्कळ तपास झाला; पण पुन: तिचा पत्ता लागला नाहीं." विश्वामित्र पुढें म्हणाले, " संपत्तीवर आणि रूपवती स्त्रियांवर चोरटे हल्ले कोणाकडून होतात याचा तपास आमच्या ऋषीमंडळास लागला आहे. उत्तरा नुकतीच संकटांतून मुक्त होऊन माझ्या आश्रमांत आली. तिचा सर्व वृत्तांत आम्हीं ऐकला आहे आणि आमची खात्री झाली आहे कीं, हे सर्व चोरटे हल्ले लंकेच्या रावणाच्या राज्यांतून होत आहेत. आर्यावर्ताचा शत्रू राजा रावण हा आहे. तो अत्यंत बेफाम, दुर्वर्तनी आणि सज्जनांचा छळ करणारा असा आहे. नारदमुनी त्याच्या भेटीस गेले होते. त्यांनी त्याची मुलाखत घेतली. तेव्हां त्या बेफाम राजानें जगांतील सर्व सुंदर वस्तु व रूपवती स्त्रिया यांचे मालक आपण आहोंत ; मन मानेल तेव्हां,वाटेल त्या स्त्रीस पळवून आणणें हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे असें त्यानें बिनदिक्कत सांगितलें. उत्तरा म्हणाली, कीं आर्यावर्तांतील ठिकठिकाणच्या शेकडों स्त्रिया त्या नराधमाच्या आणि त्याच्या बगलबच्च्यांच्या बंदिवासांत आहेत. त्यांच्यावर जुलुम जबरदस्ती करून ते आपल्या इच्छा पूर्ण करून घेतात. असला घोर अन्याय प्रत्यहीं आर्यावर्तांतून होत आहे. हा दशमुखी रावण महा बलाढ्य आहे. त्यानें जगांतील संपत्ति लुटून लंका सोन्याची केली आहे. तो राजा रावण केव्हां आर्यावर्तावर घाला घालील आणि त्यास गिळून गट्ट करील याचा नेम नाहीं. राज्ञो ! हें संकट आपल्या समीप असतां त्याचा विचारहि आर्यावर्तांतून झाला नाहीं."

" आचार्य, आर्यावर्तावरील परचक्राच्या भीतीपेक्षां आर्यावर्तांतील शेकडों स्त्रियांचा छळ आणि अपमान ऐकून माझें हृदय पिळवटून गेलें आहे. ते दुरात्मन् कोणत्या उपायानें स्त्रियांना पळवून नेतात ;

त्याचा बोभाटा कसा होत नाहीं ; त्यास प्रतिबंध कसा होत नाहीं ; हीं कृत्यें गुप्त कशीं राहातात ? " राणीनें पृच्छा केली.

त्यावर विश्वामित्र म्हणाले,

" शत्रुंजय राजाची कन्या इनें आम्हांस सर्व वृत्तांत सांगितला आहे. ज्या स्त्रीवर हल्ला करावयाचा ती स्त्री एकटी आहे, असें पाहून ते दुष्मन हल्ला करतात आणि तिला ओरडण्याची संधि मिळण्यापूर्वीच विमानांत घालतात. क्षणार्धांत विमान चालू होतें आणि लेशमात्रहि बोभाटा न होतां किंवा प्रतिबंधास सवड न सांपडतां तें विमान चालूं होतें. लंकेंत जाईपर्यंत विमान थांबत नाहीं. तेथें गेल्यानंतर ना आई,ना बाप, ना पति, ना गणगोत, अशी असहाय्य अवस्था त्या मुलीची होते. त्याचा फायदा घेऊन ते नराधम वाटेल तसे उपाय योजतात ; जुलूमजबरदस्ती करितात आणि त्या स्त्रीची अब्रू घेतात ! "

" अरेरे ! कोण हा अधमपणा ! कसली ही नीतिभ्रष्टता ! ! स्त्रियांना भ्रष्ट करण्याकरितां त्या अधमाचे चाललेले अमानुष प्रयत्न माझ्या दृष्टीसमोर उभे राहातात. असहाय स्त्रियांच्या करुणाव्यंजक किंकाळ्या माझें हृदय फोडित आहेत. असला आपल्या स्त्रियांचा होणारा अपमान गुलामही सहन करणार नाहीं. अशा अधमाधमास मानव जातीचे शत्रू समजले जाईल आणि आर्यावर्तांतील प्रत्येक आर्य आपल्या रक्ताचा शेवटचा कण या अपमानाबद्दल वेंचण्यास तयार होईल. लंकेच्या रावणाची स्वारी आर्यावर्तावर केव्हां व्हावयाची तेव्हां होईल; परंतु आजपर्यंत त्यांनीं जीं दुष्कृत्यें केलीं आहेत किंवा दुष्कृत्यें करण्यास आपल्या बगलबच्च्यांना संमति दिली आहे, त्या अपमानास्पद दुष्कृत्यांमुळें शत्रुत्वाचें पुरेपूर माप त्याचें भरलं आहे. गणगोतासह रावणाचा पुरा निःपात होईल तो दिवस आर्य स्त्रियांच्या दास्यविमोचनाचा मी मानीन ! तोंपर्यंत आचार्य ! माझे केस मोकळे राहतील. ही वेणी सोडली ! रावणवधानेंच हे केस बांधले जातील, अशी माझी प्रतिज्ञा आहे. "

असें म्हणुन कैकयी रडूं लागली. तिनें आपले केस मोकळे केले.

" राज्ञी ! संकट फार मोठें आहे. शत्रूजवळ सैन्य मोठें आहे. त्यांचेजवळ शस्त्रास्त्रें असून त्यांनीं अनेक युद्धांत जय मिळविला आहे. त्याला जिंकणें हें सुलभ कार्य नव्हे. "

" उद्यां रामास युवराज्याभिषेक झाला कीं, " राणी कैकयी म्हणाली, " राम लढवय्ये लोक घेऊन रावणावर स्वारी करील आणि रावणाचा पुरा निःपात केल्याशिवाय राहणार नाहीं. "

" राणी, ही तुझी कल्पना चुकीची आहे. एकट्या अयोध्येचेंच सैन्य काय, पण सर्व आर्यावर्तांतील राज्यांचें सैन्य एकवटलें तरी रावणाशीं युद्ध देणें शक्य नाहीं. अयोध्येचें सैन्य लंकेपर्यंत पोहोंचणारच नाहीं. मध्यें दण्डकारण्य, पर्वत, नद्या, निर्जन, रुक्ष प्रदेश इतका विस्तृत आहे कीं, त्या दूरच्या पल्ल्यावर सैन्य नेणें शक्य नाहीं. अयोध्येचें सैन्य लंकेपर्यंत जाऊन पोहोंचणारच नाहीं. राज्ञी ! अयोध्येहून सैन्य घेऊन जाणें आणि रावणाशीं युद्ध करणें ही गोष्ट सर्वस्वी अशक्य आहे. "

" आचार्य, मग आम्ही आर्यस्त्रियांनीं अपमानास नेहमींच तोंड द्यावयाचें काय ? उद्यांची युवराज्ञी सीतादेवी हिच्यावरहि संकट ओढवेल त्याचीच वाट पहावयाची काय ? बोला, तुम्ही थोर, ज्ञानी आहांत; तुम्ही कांहीं उपाययोजना ठरविलीच असेल. तुमची उपाययोजना मला ऐकवा म्हणजे माझ्या दुभंग झालेल्या हृदयास स्थिरता तरी मिळेल. "

" राज्ञी, आमच्या मध्यवर्ति मंडळानें संकटाचें जसें अनुमान केलें तशी त्याच्यावर उपाययोजना ठरविली आहे. दुष्टांचा संहार करण्याकरतां आणि सज्जनांचें रक्षण करण्याकरितां प्रत्येक युगांत परमेश्वर अवतार घेत असतो. पातकी रावणाचे अत्याचार कडेलोटास गेले आहेत. राजा आणि त्याची प्रजा एकसारखीच अधमाधम आणि दुष्ट. त्यांच्या दुष्टतेस पारावर उरला नाहीं. त्यांनीं सज्जनांचा छळ अमानुषपणें चालविला आहे. आणि शीलवती स्त्रियांवर त्यांनीं इतके अत्याचार केले आहेत कीं, त्यांच्या करुण हांकेस होकार देऊन विष्णू भगवानानें मनुष्य कोटींत अवतार धारण केला आहे. श्री-

विष्णूचे गुण आणि पराक्रम घेऊन युगकालीन पुरुष रावणवधाकरितां निर्माण झाला आहे. त्या युगकालीन पुरुषास शोधून काढणें, त्यास कार्यप्रवृत्त करणें हेंच आपलें कार्य ! "

" हं, आतां माझ्या सर्व ध्यानांत आलें." आनंदानें हंसून कैकई म्हणाली, " आमच्याच घराण्यांत श्रीविष्णूनें अवतार घेतला आहे. दैवी गुण आणि पराक्रम यावरून तुमचा युगकालीन पुरुष 'माझा राम' होय. महर्षि, माझा अंदाज बरोबर आहे ना ? "

" राज्ञी ! तुझ्या थोर बुद्धिमत्तेस अगोचर असें काय आहे? तुझा अंदाज बरोबर आहे. रामचंद्र हाच विष्णूचा अवतार. रामचंद्र हाच युगकालीन पुरुष. रामचंद्राच्या हस्तें रावण आणि त्याचे गणगोत यांचा निःपात होणार आणि सज्जनांचें संकट नाहीसें होणार ! "

कैकईला आतां केवढा आनंद वाटला ! किती थोरवी वाटली ! तिचें मन आनंदाच्या लाटांनीं भरून गेलें. ती डोळे मिटून 'माझा राम, माझा राम' असें म्हणूं लागली. राणी कैकयीस तिच्या आनंदाचा आस्वाद विश्वामित्रानें कांहीं काळ घेऊं दिला.

" आचार्य " ती पुन्हा म्हणली, " भगवान विष्णू अवतार घेऊन रावणवधास तयार आहे. तुमचा युगकालीन पुरुष दुष्टांचा संहार करण्याकरितां आणि सज्जनाचें रक्षण करण्यास सज्ज असतां आम्हां तुम्हांस काळजी करण्याचें कारण काय ?"

" राज्ञी ! अशा जगद्वंद्य पुरुषास दुष्टांचा संहार करण्याकरितां कार्यतत्पर करावयाचें सोडून तुम्ही अयोध्येचे लोक त्यास अयोध्येच्या राजवटीस जुंपून त्याची विशाल योग्यता आकुंचित करण्याचा प्रयत्न करूं लागला आहांत. रामचंद्र अयोध्येचा नाहीं, सर्व जगाचा आहे; जगताचा आहे हा त्याच्या कर्तव्याचा दृष्टीकोन राजा दशरथ आणि त्याची प्रजा बदलूं पाहात आहेत. ही घोर चूक होऊं नये म्हणून राज्ञी ! तुझी एकान्तात भेट घेतली."

राणी म्हणाली. " माझा राम युगकालीन असला, त्याच्या हातून जगत्कार्य व्हावयाचें असले तरी त्यास युवराजपद कसें आडवें येतें याचा खुलासा व्हावा. '

" राज्ञी ! रामचंद्रास येथील युवराज केलें म्हणजे तो कालेंकरून 'राजा' होणार त्याचे संबंध अयोध्येच्या राजवटीशीं जमल्यानंतर प्रथम अयोध्येच्या राजवटीचा विचार आणि नंतर जमल्यास व वेळ मिळाल्यास अन्य विचार. अशी कर्तव्याची दिशा ठरेल आणि तो रावणवधास हातही घालणार नाहीं. याकरितां केवळ जगाच्या कल्याणाकरितां त्यास मोकळें ठेवून स्वेच्छेनें रावणवधाचें कर्म त्यास करूं द्यावें. उद्यांचा युवराज-समारंभ जगाच्या कल्याणाच्या दृष्टीनें फार घातुक आहे. माझ्या म्हणण्याचा आशय, राज्ञी ! तुला समजला ना ?"

कैकेईनें दीर्घ निश्वास सोडला, म्लानवदन केलें आणि म्हटलें,

" उद्याचा युवराजसमारंभ रामचंद्राच्या जगद्वंद्य कार्यास प्रतिबंधक होईल ही गोष्ट खरी ; पण आतां त्याचें काय ? युवराज अभिषेकाची सर्व तयारी झाली आहे. अष्टप्रधानासह राजा यांनीं या समारंभास पूर्ण मान्यता दिली असून नागरिकांनींहि रामचंद्रास युवराज म्हणून निवडून दिलें आहे. केवळ पांच प्रहरांचा अवधी मध्यें उरला आहे. सर्वांचीं मनें रामास युवराज झालेले पाहाण्याकरितां उत्कंठित झालीं आहेत. उत्सवाचें कार्य इतकें पुढें गेलें आहे कीं, आतां माघार घेणें कोणालाहि शक्य नाहीं. युवराज्याभिषेक उदईक नियमित मुहूर्तावर होणार ! तो स्थगित होणें शक्य नाही. "

त्यावर विश्वामित्र म्हणाले, " इतरेजनांस शक्य नसेल ; तरी तो स्थगित करील अशी एकच व्यक्ति पृथ्वीतळावर आहे आणि तिच्याकडेच सर्व आर्यस्त्रियांच्या वतीनें त्यांचें संकट-विमोचन करण्याकरितां मी विनंती करीत आहें. राज्ञी ! राजा दशरथाच्या मनावर तुझा केवढा ताबा आहे हें मी जाणून आहें. तूंच दुःखांत होरपळणाऱ्या अनेक आर्यस्त्रियांची संरक्षणकर्ती हो आणि उद्यांच्या युवराज्याभिषेकांत रामचंद्र न सांपडेल असें कर. "

" मला तर हें कार्य सर्वस्वी अशक्य दिसतें. उद्यांचा युवराज्याभिषेकोत्सव आर्य स्त्रियांच्या दुःखविमोचनाच्या एकाच कार्याकरितां स्थगित करणें, आचार्य ! मलाहि जरूर वाटूं लागलें आहे. " राणी कैकयी विचारी मनानें म्हणाली, " पण रामचंद्रावर पतिदेवांचें

किती अंध प्रेम आहे याची थोडीफार कल्पना आपणांस आहेच. तुम्ही पूर्वी उग्र स्वरूप धारण केलें नसतें तर राम-लक्ष्मण तुमच्या यज्ञाच्या संरक्षणाकरितां मिळाले नसते. राजाची समजूत घालून त्याच्या हातून उद्यांचा अभिषेक महोत्सव बंद पाडणें कोणाच्याही स्वाधीनचें नाहीं; माझ्या प्रयत्नांस यश येणार नाही."

"राज्ञी !" विश्वामित्र निश्चयानें म्हणाले, "तूं अशी दुर्बल होऊं नकोस. कैकयीचा खरा करारी बाणा इरेस घाल; प्रयत्नांची शिकस्त कर. तुझ्या प्रयत्नांस यश येईल असा माझा तुला आशीर्वाद आहे."

यावर कैकयीनें बराच वेळ विचार केला. आर्यस्त्रियांची होत असलेली लाजिरवाणी परिस्थिति लक्षांत घेतली तर रावणाचा पुरा निःपात झाला पाहिजे आणि याकरितां रामास उद्यां युवराज होतां येत नाहीं हा विचार तिनें ठाम ठरविला. तिला मथरेच्या सकाळच्या शब्दांची आठवण झाली. उद्यांचा युवराजमहोत्सव हाणून कसा पाडावा याची उपाय-योजना मथरा सांगणार होती. ती चटदिशीं उठली आणि विश्वामित्रास उद्देशून म्हणाली, "आचार्य ! क्षणमात्र आंतल्या खोलीत बसा. मला मंथरेचा सल्ला ऐकला पाहिजे."

असें म्हणून तिनें विश्वामित्रास खोलीच्या आंत नेऊन बसविलें, दार घट्ट लावून घेतलें आणि ती मंथरेस आणण्याकरितां तेथून त्वरेनें निघाली. क्षणार्धात ती मंथरेसह तेथें परत आली. तो मंथरेस उद्देशून म्हणाली, "तुझा सकाळचा उपदेश मी भावनेच्या स्वाधीन होऊन ऐकला नाही. मी पुनः विचार केला. माझी चूक माझ्या लक्षांत आली. बोल ! उद्यां 'राम' युवराज होणार नाही याकरितां मी काय उपाययोजना करूं ?"

"राणी !" मंथरा म्हणाली, "अविचारानें तूं मला कैवेंत घातलेंस. तुझ्या हिताची गोष्ट सांगत होतें. तूं मला निष्कारण झिडकारलेंस. आतां तरी तू सावध झालीस हें महत्भाग्य ! पण राणी ! तुझ्या शब्दावर माझा विश्वास कसा बसावा ? तुझें रामावर अलोट प्रेम आहे, तें इतक्या लौकर एकाएकीं लयास कसें जाईल ? मला मोठा विस्मय वाटतो. सांग, तूं माझी थट्टा तर करीत नाहीस ना ?"

"माझे विचारवंत दाई!" कैकयी उसन्या प्रेमानें म्हणाली, "तूं माझ्या आईप्रमाणें आहेस. तुझी मी कधीं थट्टा केली आहे काय? सांग; तुझी उपाययोजना लौकर सांग."

"ऐक तर—" मंथरा यशाच्या गुर्मीनें उत्साहानें म्हणाली, "तूं आज रात्रीं क्रोधागारांत जावेंस. तुझे केस आयतेच सुटलेले आहेत. केस अस्ताव्यस्त करून, अंगावरील वस्त्रें अस्ताव्यस्त करून तुला भयंकर क्रोध आला आहे, असा बनाव राजा दशरथास दिसावा. दशरथ तुझी मनधरणी करील. परंतु बराच वेळ तूं क्रोधाची बतावणी करावीस. अखेर राजानें विनंती केल्यावर किंबहुना तुझ्या क्रोधशमनाकरितां 'वाटेल तें करीन' अशी प्रतिज्ञा केल्यावर तूं प्रेमाचा आविर्भाव दाखवून पूर्वीं शंबर नांवाच्या दैत्याशीं झालेल्या युद्धाच्या वेळीं तूं राजा दशरथास मोठी मदत केली होतीस, याची त्यास आठवण करून द्यावीस आणि त्या प्रसंगीं तुला दोन वर दशरथानें दिले होते, त्या वरांची मागणी तूं राजाकडे करावीस; तुझ्या मुठींत खेळणारा दशरथ राजा वरांची सफलता करण्यास तयार होईल. तेव्हां वरांची प्रत्यक्ष मागणी त्यानें पूर्ण खातरजमा केल्याशिवाय करूं नयेस. राजा वरांची पूर्तता करील अशी तुझी खात्री पटली म्हणजे तूं त्या वरांची मागणी करावीस. पहिल्या वरानें रामाच्या ऐवजीं भरतास युवराज करावें आणि दुसऱ्या वरानें रामानें चौदा वर्षेंपर्यंत वनवासास जावें आणि काषाय वस्त्रें परिधान करून ऋषिमुनीचें जीवन कंठावें."

"मंथरे!" कैकयी म्हणाली, "पहिला वर मला पसंत आहे. रामाचे ऐवजीं भरतास युवराजपद मिळावें ही गोष्ट मला कबूल. पण दुसरा वर मागण्याची काय जरूर? रामाला वनवासाला पाठविणें अनेक दृष्टींनीं अशक्यप्राय होईल. राजा विरोध करील; मंत्रीजनांचा तीव्र विरोध होईल; लक्ष्मणाचा क्रोध अनावर होईल आणि नागरिक लोक राम वनास निघाला तर आडवे पडतील."

"राणी!" मंथरा म्हणाली, "एकदां तूं वर मिळविलास म्हणजे आपलें कार्य झालें म्हणून समज. दशरथ कदापि आपली आज्ञा परत घेणार नाहीं. राम कदापि पितृआज्ञा उल्लंघणार नाहीं



६

आणि इतर लोकांच्या रडण्याभाकण्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून राम बापाची आज्ञा पाळण्याकरितां वनास निघून जाईल. आतां रामानें वनवासास कां जावें असें तूं म्हणतेस ! पण राम येथें राहिला तर भरतास राजा होणें व राज्य चालविणें शक्य नाहीं. नागरिक त्याला पदच्युत करतील. मंत्रीमंडळ रामास पुढें करतील. ही भरताची आपत्ति टाळण्याकरितां रामानें अयोध्या सोडून जावें आणि तें दीर्घ काळपर्यंत जावें, याकरितां दुसरा वर मागणें जरूर आहे. समजलें ? एक वर मागून भागणार नाहीं. दोन्हीहि वरांची मागणी करावी लागेल. "

कैकयीनें मंथरेची गोड समजूत घालून तिला तेथून पाठविलें. मंथरा आनंदानें बेहोष होऊन यशाच्या गुर्मीत तेथून निघून गेली. नंतर कैकयीनें दरवाजा उघडला आणि विश्वामित्राला आंत घेतलें.

" आचार्य ! " ती म्हणाली, " तुम्ही त्या नादान दासीचा उपदेश ऐकला ना ? बोला. एवढाच उपाय मला दिसतो. मी आर्य स्त्रियांच्या संकटनिवारणाकरितां माझ्या दासीनें सांगितल्या मार्गानें जावें असें आपणांस वाटतें काय ? "

" राज्ञी ! " विश्वामित्र म्हणाले, " तुला अत्यंत मनस्ताप होणार आहे. जननिंदेचें खडतर शस्त्र तुझ्या माथ्यावर पडणार आहे. प्रसंगीं तुझा पुत्र भरत हाहि तुझी अत्यंत निर्भत्सना करील. नागरिकांचा शिव्याशाप, मंत्रिमंडळाचा क्रोध यांस तुला तोंड द्यावें लागेल आणि प्रसंगीं दशरथ पुत्रशोकानें वेडा होईल. तीहि आपत्ति तुला सहन करावी लागेल. परंतु राज्ञी ! या आपत्प्रसंगीं हीं सर्व संकटें सोसूनहि मन घट्ट व निश्चयी करून तुला हें कार्य मोठ्या चातुर्यानें पार पाडावें लागेल आणि दोन्ही वरांची प्राप्ति दशरथाकडून मिळवावी लागेल. राणी ! याशिवाय चालू संकटांतून बाहेर पडण्यास दुसरा मार्ग नाहीं. "

" महर्षि ! " राणी म्हणाली, " आपण प्रत्यक्ष ब्रह्मदेवांचे अवतार. त्यांचा हुकूम मला होत आहे. रामचंद्र वनवासास जाणार या विचारानेंच मन दुभंगून जातें. माझ्या प्रियकर रामावर मी आपत्ति कशी आणवूं ? "

"ही तुझी वेडी भावना तूं सोडून दे. वनवासांत रामचंद्रास दुःख होईल ही वेडी समजूत तूं सोडून दे. आम्ही सदैव वनवासी असतों ना? परंतु आमच्याइतकें सुख राजधानींत राहून राजासहि मिळत नाहीं.

"तूं मन घट्ट कर. आर्यस्त्रियांच्या अब्रूवर मोठें संकट ओढवलें आहे. तूं मनानें कणखर बनलीस, कर्तव्याची जागरूकता तूं आपल्या मनापुढें सदैव ठेवलीस आणि युगकालीन पुरुषाच्या कर्तव्याचा मार्ग मोकळा करून देण्यास सज्ज झालीस, तर तुझ्या दासीनें सांगितल्या-प्रमाणें सर्व उपाययोजना झालीच पाहिजे. लक्षांत ठेव ! रामचंद्राचें तुझ्यावरील प्रेम लेशमात्रहि कमी होणार नाहीं. पण मी जें कांहीं बोललों, त्याची पूर्ण गुप्तता ठेवावी लागेल. रामाच्या युवराज-पदाच्या आड तूं आलीस, ही केवळ सवती मत्सरामुळें-सापत्नभावा-मुळें असा तुझा दुर्लौकिक होऊं दे. रावणवधाची प्रचंड कामगिरी करण्याकरितां तुला हा जनापवाद सोसावा लागेल ; पण आम्ही सर्व ब्रह्मर्षि नारदमुनीसह तुझी अखंड प्रशंसा गाऊं. राज्ञी ! माझ्या विनंतीस मान देतेस ना ? मी एकटा विश्वामित्र तुझ्याकडे याचना करतों असें तूं मानूं नकोस. नारदमुनीसह, वशिष्ठ वामदेवासह सर्व मुनींची अशी इच्छा आहे कीं उद्यां रामास युवराज होऊं देणें अत्यंत धोक्याचें आहे. उठ ! अशी म्लानवदन होऊं नकोस. उत्साह धर आणि कार्यास लाग. माझी पुनः भेट घेण्याचा प्रयत्न करूं नकोस !"

"आचार्यांच्या पदांची शपथ घेऊन मी जाहीर करतें कीं मी आतां जें करणार आहे तें अत्यंत कटुकर्तव्य म्हणून करणार आहें. माझ्या इच्छेविरुद्ध मी वागणार आहे; कधींहि वागलें नाहीं असा कपटप्रबंध मला खेळावयाचा आहे. माझा जीव म्हणजे श्रीराम. त्याच्या वन-वासास मी कारण होणार आहें. त्यांत माझा स्वार्थी हेतू मुळींच नाहीं. ब्रह्मर्षी ! तुमची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. स्त्रियांचें चारित्र्य किती दुर्गम असतें याचा मासला सर्व जगास पहावयास मिळेल. आपण निश्चित परत जा. उद्यां रामचंद्रास युवराजपद मिळणार नाहीं. तो युगकालीन पुरुष सर्व जगाचा आहे. जगाचें श्रेष्ठतर कार्य करण्याकरितां अयोध्येच्या युवराजपदांतून मी त्याची मुक्तता करणार !"

असें म्हणत असतां राज्ञी कैकयी अश्रूंनीं नाहली होती. तिच्या मनास असह्य वेदना होत होत्या.

तशाहि अवस्थेंत तिला शुभाशीर्वाद देऊन महर्षी विश्वामित्र परतले. तेव्हां ते बेदरकार वृत्तीचे, करारी स्वभावाचे आणि प्रसन्न वदनाचे दिसत होते.

# १०

रामाच्या यौवराज्याभिषेकोत्सवाची सर्व सिद्धता झाली होती. चार प्रहराची रात्र उजाडली कीं अभिषेकाचा समारंभ व्हायचा ! यश इतकें निकटवर्ति होतें कीं, तें कोणासहि सहज अनुमानतां येईल. राजा दशरथास वाटलें कीं, प्रत्यक्ष परमेश्वर खालीं उतरला तरी युवराज्याभिषेकास अडथळा येणार नाहीं ! रामाच्या ठिकाणीं असलेली नागरिकांची अढळ भक्ति, मंत्रीजनांची रामचंद्राच्या ठायीं असलेली अढळ श्रद्धा आणि आपलें निर्व्याज प्रेम—या प्रेमाच्या अजस्र कोटास कोणतीहि सत्ता झुगारूं शकणार नाहीं आणि उद्यांच्या समारंभास प्रतिबंध होणार नाहीं ! प्रतिबंधाची गोष्ट सर्वस्वी अशक्य कोटीस गेलेली आहे, असें राजा दशरथास वाटूं लागलें. भावी यशाच्या धन्यतेचा स्वाद तो प्रेमपुरस्सर घेत होता.

वसंतऋतुची ती उन्माददायक रात्र ; अष्टमीचा नितांतरमणीय असा शीतल चंद्रप्रकाश ; बागेंतील सुगंध वाहून आणणारा थंडगार वारा आणि राजवाड्याच्या चौथ्या मजल्यावरील गच्चीवर केलेली ती मनास आल्हाद देणारी सुंदर बैठक, यामुळें राजा दशरथाचें मन अत्यंत सुप्रसन्न झालें होतें. उत्सवाच्या निरनिराळ्या केंद्रांतील प्रमुखांसह राजा दशरथ निकटवर्ती उत्साहाचें चित्र विहंगम दृष्टीनें पाहात होता.

" प्रधानजी ! " तो म्हणाला, " इतक्या अल्पावकाशात तुम्ही उत्सवाची भव्य तयारी केली. आमच्या राज्यारोहणाची पुसट कल्पना आम्हांस आहे. पण तेव्हांहि असा जम जमला नव्हता. युवराज्याभिषेकाचीं सर्व धार्मिक कृत्यें आमचे सन्मान्य कुलगुरू वशिष्ठ यांच्या देखरेखीखालीं होतील. "

" महर्षी ! " राजा वशिष्ठास उद्देशून पुढें म्हणाला, " उद्यांचा समारंभ तुमच्या धार्मिक कृत्यांनीं प्रारंभला जाणार आहे. तुमची सर्व तयारी आहे ना ? "

" मोठमोठे विद्वान् पंडित " वशिष्ठमुनी म्हणाले, " समारंभाप्रीत्यर्थ आणविले आहेत. ते सर्व येथें आले असून त्यांचीं कृत्यें त्यांना विभागून दिलीं आहेत. मी आतां रामचंद्राची भेट घेतों आणि सीतादेवी आणि रामचंद्र यांना व्रतस्थ राहाण्याबद्दल विनंती करतों. "

" ठीक! " प्रधानजी म्हणाले, " उद्यां सूर्योदयास रामचंद्र आणि सीतादेवी यांना मंगलस्नानें अत्यंत थाटानें घातलीं जातील. आपली प्रेमळ स्नुषा उर्मिलादेवी यांनीं या कार्यांत पुढाकार घेतला आहे. सर्व राजमाता,सर्व आर्यस्त्रिया आणि प्रमुख नागरिकांच्या स्त्रिया अभ्यंगस्नानाचा हा विधी पार पाडतील. नंतर रामचंद्र आणि सीतादेवी बरोबर दोन घटिका दिवस आला आला असतांना अभिषेकाच्या मंडपांत प्रवेश करतील.त्या ठिकाणीं राजेरजवाडे आणि इतर नागरिक यांना बसण्याची व्यवस्था केली आहे.तंतुवाद्यांच्या सुरेल संगीतांत सर्व धार्मिक विधी पार पाडले जातील. महाराजांच्या इच्छेनुसार महर्षि वशिष्ठ यांत पुढाकार घेतील. गंगेच्या पावन तीर्थानीं नंतर अभिषेक विधी होईल. अभिषेकाचा पहिला कलश रामाच्या मस्तकावर महिषी कौसल्या आणि महाराज, आपण प्रेमभावानें ओताल. नंतर अभिषेकविधी यथासांग होईल. हा विधी तीन घटिकापेक्षां जास्त वेळ चालणार नाहीं. त्यानंतर रामचंद्रास रेशमी महावस्त्र परिधान करण्यास दिलें जाईल. सीतादेवीसही बहुमूल्य वस्त्र परिधान करण्यास्तव दिलें जाईल. हीं वस्त्रें राणी कैकयीदेवींनीं अनेक वस्त्रांतून निवड करून ठरविलीं आहेत. त्यानंतर कर्णभूषणें,बाहुभूषणें इत्यादि राजाचे अलंकार रामचंद्रास परिधान करावे लागतील आणि किरिटकुंडलादि राजाचीं मस्तकभूषणें रामचंद्र धारण करील. त्यानंतर दोन घटिका-

पर्यंत दुसऱ्या दालनांत रामचंद्र प्रमुख नागरिक आणि राजेरजवाडे यांच्या नजराण्यांचा स्वीकार करतील. त्यानंतर दरबारांत येण्या-करितां रामचंद्राची मिरवणूक निघेल."

"या मिरवणुकीकरितां कोणता हत्ती मुक्रर केला आहे ?" दशरथानें मध्येच प्रश्न केला.

तेव्हां सेनानायक प्रद्युम्नराय म्हणाला,

"महाराज ! मिरवणुकीच्या कार्याचें प्रमुखत्व माझ्याकडे आहे. आपला पांढरा हत्ती 'अश्विनीकुमार' हा मिरवणुकीकरितां नियोजित केला आहे. बहुमूल्य रत्नहारांनीं हा हत्ती अलंकृत केला आहे. अलंकारिलेल्या या हत्तीवरून सुवर्णमय अंबारींतून श्रीरामचंद्राची मिरवणूक निघेल आणि ती थेट जनतामंदिरापर्यंत जाईल. तेथें रामचंद्र अयोध्येच्या नागरिकांना भेट देतील."

त्यानंतर मंत्री भोरीवसु बोलूं लागले–

"अभिषेकप्रसंगीं जो दरबार भरणार त्या कार्याचें प्रमुखत्व माझ्याकडे आहे. श्रीरामचंद्रांना प्रमुख सिंहासनावर बसविलें जाईल. महाराज या समारंभास हजर राहून रामचंद्रास अयोध्येचें युवराज-पद दिलें असें जाहीर करतील. त्यानंतर अनेक नागरिकांचे पुष्पहार रामचंद्रास घातले जातील. . . . . . .

"त्यानंतर शेठ बाहुबली यांचें सर्व नागरिकांतर्फे छोटें भाषण होईल. प्रधानजीचे प्रास्ताविक भाषण होईल. नंतर रामचंद्र त्यास छोटेसें उत्तर देऊन आपल्या भावी कर्तव्याची दिशा कशी राहील याचें अल्पसें दिग्दर्शन करतील. हा कार्यक्रम सूर्योदयापासून दहा घटिकांनीं संपेल."

पुन: सेनानायक प्रद्युम्नराय म्हणाला,

"नंतर प्रचंड मिरवणुकीस प्रारंभ होईल. महाराज रथांतून बसतील. महाराण्या आणि राजस्त्रिया यांचेहि रथ मिरवणुकींत सामील होतील. लक्ष्मण आणि शत्रुघ्न हे दोन शृंगारलेल्या अश्वां-वरून रामचंद्राच्या मिरवणुकीच्या हत्तीबरोबर दोन्ही बाजूंनीं असतील. मध्यें रामचंद्राचा हत्ती, मागाहून सीतादेवीचा हत्ती, दोन्ही बाजूस लक्ष्मण शत्रुघ्न, त्यांच्यामागून राजाचा रथ, नंतर राजस्त्रियांचे

रथ, त्यानंतर पायीं चालणारे मांडलिक राजे, प्रमुख नागरिक अशी मिरवणुकीची रचना केली आहे. वाजंत्र्यांचे अनेक ताफे निवडून ते सर्वांच्या पुढें राहतील अशी योजना ठरली आहे. चौकांतून तोफांचे गडगडाट होतील, नगाऱ्यांचा गगनभेदी ध्वनी होईल, अशी व्यवस्था झाली आहे. नागरिक आपल्या घरांवरून पुष्पवृष्टि करणार आहेत आणि कांहीं धनिक नागरिक या मिरवणुकीवर सोन्याच्या नाण्यांचा वर्षाव करणार आहेत. प्रत्येक चौकांत सुवासिनींचा मेळा येऊन रामचंद्रास अत्यादरानें ओवाळील आणि मंगल गीतें गाईल. ही मिरवणूक सूर्योदयापासून बरोबर पंधरा घटिकांनीं राजवाड्यांत येऊन स्थगित होईल."

नुसत्या कार्यक्रम ऐकून मिरवणुकींत भाग घेतला असा बहाणा करीत राजा दशरथ हर्षभरानें म्हणाला,

"त्यानंतर मिष्टान्नभोजनाची तयारी राजवाड्यांत झालेलीच असेल. रामचंद्राचा पंक्तिलाभ आपण सर्व उद्यां मनमुराद घेऊं. आतां बरीच रात्र झाली आहे. प्रात:काळीं सर्वांस कामास लागावें लागेल. याकरितां सर्वांस नमस्ते ! " राजा उठला; प्रधानजी व इतर मंत्री आणि कार्यकर्ते उठले आणि राजास अभिवादन करून स्वगृहाकडे चालते झाले.

वशिष्ठ, रामचंद्र आणि सीतादेवी यांना व्रतस्थ ठेवण्याकरितां त्यांच्याकडे निघून गेला आणि वृद्ध दशरथ कैकयीदेवीची आराधना करण्याकरितां कामुक बुद्धीनें तिचा शोध करूं लागला. नजीकच्या सेवकास तो म्हणाला, " मला देवी कैकयी ज्या महालांत असेल तेथें नें."

"इत इतो देव: ।" (असें महाराजांनीं यावें) तो सेवक म्हणाला.

सेवक पुढें व दशरथ मागें असें ते अनेक महालांतून गेले. त्यांना कैकयीदेवी कोठें दिसली नाही. कैकयीदेवीचा शयनमंदिरांत शोध केला. तो सेवक तेथें थांबला नाहीं. तो पुन्हा म्हणाला, " इत इतो देव: ।"

'देवी आहे तरी कोठें ?' दशरथानें आपल्या मनाशीं प्रश्न केला. शेवटीं क्रोधागारापाशीं तो सेवक थांबला. आपण क्रोधागाराजवळ

आलों असें पाहून राजा सभय आश्चर्य चकित झाला. राणी कैकयी देवी दिवसभर किती उत्साहांत दिसली ; मग ती क्रोधागारांत आतां काय करीत आहे ? या विचारांच्या फेऱ्यांत राजा सांपडला. त्यानें भीतभीतच क्रोधागारांत प्रवेश केला. तों त्याला अनपेक्षित असें दृश्य दिसलें. राणी कैकयी जमीनीवर अस्ताव्यस्त पडली आहे, मोठ-मोठ्यानें स्फुंदत आहे ; तिचे केस अस्ताव्यस्त पसरले असून अंगा-वरील वस्त्रेंहि अस्ताव्यस्त झालेलीं आहेत. हें दृश्य पाहून राजा दशरथाचें तोंड खरकन् उतरलें. त्याला वाटलें होतें कीं कैकयीची हंसरी व प्रसन्न मुद्रा आपणास पहावयास मिळेल; प्रसन्नवदना कैकयी आपलें अत्यंत प्रेमानें स्वागत करील. त्याचा सुखाचा डोलारा ढांसळून पडला. कैकयीच्या क्रोधशमनाकरितां तो भग्नहृदयी राजा वाटेल तें करण्यास तयार झाला. कसेंहि करून शक्य तितक्या लवकर तिला संतुष्ट केलें पाहिजे आणि आपली बिघडलेली आनंदाची घडी सुधारली पाहिजे असें त्यानें मनांत ठरविलें.

तो म्हणाला, " अरेरे ! ! देवी कैकयी ! कोण ही तुझी दुःखद अवस्था ! माझी उभी राजवट आनंदांत बेहोष झालेली आणि खुद्द ही माझी राणी दुःखांत होरपळत पडलेली ! दहा घटिकापूर्वी तूं मला सीतादेवीकरितां निवडलेले दागिने दाखविण्यास आली होतीस. माझा समृद्ध जामदारखाना उद्यांच्या युवराज्ञीकरितां तूं शोधलास आणि त्यांतून बहुमूल्य दागिने तूं निवडलेस. ही केलेली निवड बरोबर झाली आहे ना, असें दाखविण्यास तूं आली होतीस, तेव्हां तुझ्या आनंदास पारावार नव्हता आणि केवळ दहा घटिकांच्या अवधींत तुझी अशी दुःखद अवस्था कशामुळें झाली ? सांग, राणी ! तुझ्या दुःखाचें कारण सांग. "

यावर राणी अधिकच स्फुंदून स्फुंदून रडूं लागली; तिनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

" तुझ्या दुःखाचा परिहार माझ्याकडून होणार नाहीं असें तूं समजतेस काय ?" राजा पुनः म्हणाला.

" वयातीत झालों असलों तरी दुर्बळ झालों नाहीं. उभ्या जगास

या दशरथाचा पराक्रम माहित आहे; असें असतां तुझ्या दुःखाचा परिहार माझ्याकडून होणार नाहीं असें तूं समजतेस काय ?'

राणीचें स्फुंदणें पूर्ववत् चालूच होतें. ती अद्दी बोलली नाहीं.

" कुबेराची संपत्तीहि माझ्या जामदारखान्यापुढें तुच्छ दिसेल इतकी अलोट संपत्ती, वैभव आणि पराक्रम माझ्याजवळ असतांना आपल्या दुःखाचें परिमार्जन होणार नाहीं असें आझ्या आवडत्या राणीनें कां मानावें ? राणी ! तूं बोलली नाहीं तर तुझ्या दुःखाचें कारण आम्हास कसें समजणार ?" राजा म्हणाला.

तरीहि राणीचें स्फुंदणें संपेना. तेव्हां दशरथ म्हणाला,

" माझे लाडके कैकयी ! तुझा कोणीही उघड उघड अपमान करणार नाहीं. बोल ! कोणी तुझा अपमान तर केला नाहीं ना ? अपमान करणाऱ्यास क्षणाचाहि विचार न करितां मी देहान्त शासन करीन. राणीनें एका शब्दानें अपराध्याचें नाव सांगावें ! खऱ्या-खोटयाची चौकशीहि न करितां त्यास क्षणार्धांत स्वर्ग दाखवीन. बोल, राणी ! कोणी कांहीं अपराध केला आहे काय ?"

तरीहि राणी बोलेना. तेव्हां राजा दशरथ मनांत विचार करूं लागला. कैकयीचा बाप अश्वपाल यास मी समारंभास आमंत्रण पाठविलें नाहीं; भरत अश्वपालाकडेच राहात आहे. त्यास समारंभास आणवून घेण्याची तजवीज केली नाहीं. हा तर राग राणीच्या मनास आला नसेल ? तेव्हां तो राणीस म्हणाला,

" देवी कैकयी ! राजकारणाच्या कांहीं गुंतागुंतीच्या प्रश्ना-करितां तुझा बाप अश्वपाल यांजकडे आम्ही आमंत्रण पाठविलें नाहीं. तुझा पुत्र भरत यासहि त्याच कारणाकरितां आमंत्रण पाठविलें नाहीं. यामुळें तर तुझ्या मनास विषाद वाटत नाहीं ना ?"

तेव्हां राणी हुंदके देत देत म्हणाली,

" देव ! तुमच्या राजकारणांत मला पडावयाचें नाहीं. बाबा आज आले नाहींत, तरी उद्यां येतील. भरत समारंभास आला नाहीं हेंहि माझ्या दुःखाचें कारण नाहीं. "

" राणी ! मग बोल, तुझ्या दुःखाचें कारण बोल. " राजा म्हणाला, " तुझें दुःखपरिमार्जन करण्याकरितां माझा उभा जामदार-

खाना मी रिता करीन. वैभवशाली रघुकुलाचें ऐश्वर्य मी इरेस घालीन आणि जरूर पडेल तर माझे लढवय्ये योद्धे तुझ्या दुःख-परिमार्जनाकरितां माझ्यासह समरभूमीवर प्राण देण्यास तयार होतील. तुला खूष करण्याकरितां मी हें दिव्य करीन. लेशमात्रहि माघार घेणार नाहीं. बोल, राणी, कृपा करून मला तुझ्या दुःखाचें कारण कळूं दे. सूर्योदय होण्यापूर्वी तुझ्या दुःखाचा परिहार मी करीन आणि तूं आनंदी झाली म्हणजे, कैकयी ! आपण उद्यांचा युवराजोत्सव साजरा करूं."

इतकें झाल्यानंतर अधिक वळसे देणें राणीस बरें वाटलें नाहीं. ती उठून बसली आणि राजास म्हणाली,

"माझ्या दुःखाचा परिहार करणें सर्वस्वीं आपल्या हातांत आहे."

"असें असेल–" राजा मध्येंच म्हणाला, "तर मला सरळपणानें तुझ्या दुःखाचें कारण कळूं दे."

"मला वचन द्या." राणी म्हणाली, "मी सांगेन त्याप्रमाणें वागण्याचें मला वचन द्या."

"राणी कैकयी !" राजा म्हणाला, "तूं हें काय बोलतेस ? आम्ही जसें बोलतों तसें शब्दशः वागतों. तुला वचनाची अपेक्षा कां वाटावी ? रघुकुलाची ख्याती आहे कीं, प्राण जाईल, परंतु एकदां दिलेला शब्द मोडणार नाहीं."

"मला वचन पाहिजे." राणी हट्टानें म्हणाली. दशरथ मागला पुढचा विचार न करितां अविचारानें म्हणाला, "हें मी तुला वचन देतों, ऐक ! 'तूं ज्या ज्या गोष्टींची मागणी करशील किंवा जी जी घटना घडवून आणावी अशी तुझी मागणी होईल ती घटना किंवा त्या गोष्टी मी शब्दशः पुऱ्या करीन' आणि रामाची प्यारी शपथ घेऊन सांगतों कीं या प्रसंगीं तुझ्या सर्व मागण्या मी शब्दशः पाळीन. असें करण्याकरितां जी किंमत द्यावी लागेल ती किंमत अथवा स्वतःचे प्राण तुझी वचनपूर्तता करण्याकरितां मी अर्पण करीन. राणी ! तुझे कपडे सावर, केस नीटनेटके कर आणि माझी सुंदर कैकयी मला पाहूं दे."

"देव !" राणी कैकयी म्हणाली, "तुमच्या लक्षांत आहे ना ?

शंबर नामक दैत्याशीं झालेल्या युद्धाच्या वेळीं मी तुमची सेवा अति-चातुर्यानें केली; त्या प्रसंगीं तुम्ही मला दोन वरांचें वरदान दिलें. ती गोष्ट तुमच्या स्मरणांत आहे ना ? "

" तुझ्या पराक्रमानेंच त्या युद्धांत मला यश मिळालें आणि माझी दिगंत कीर्ति गाजली. राणी, तो प्रसंग मी कसा विसरेन ? मी तुला तुला दोन वर दिले होते; परंतु त्या वरांची मागणी अद्याप तुझ्या-कडून झाली नाहीं. " राजा सरळभावानें म्हणाला. त्यावर कैकयी निग्रही आवाजानें म्हणाली, " त्या दोन्ही वरांची पूर्तता आज झाली पाहिजे." तेव्हां राजा सरळ मनानें हंसत म्हणाला,

" याकरितां हा क्रोध आणि हें रोदन चाललें होतें काय ? राज्ञी ! तुला माहित आहे कीं तुझा प्रत्येक शब्द मी झेलतों. तुझी मागणी मी कधींहि अपुरी ठेवली नाहीं. तुझ्या विलासाकरितां जगांतील सर्व सुंदर वस्तु एकत्रित केल्या आहेत. अयोध्येची राजवट तुझ्या पायाशीं लोळण घेत आहे आणि हा राजा दशरथ तुझ्या पायाचा दास होऊन तुझी प्रत्येक इच्छा तृप्त करण्यास तयार आहे. असें असून राज्ञीनें आजच्या मंगल दिवशीं अमंगल रोदन कां करावें ? आजच्या आनंदाच्या प्रसंगीं क्रोधागारांत प्रवेश कां करावा ? बोल, तुला काय वर मागावयाचे ते माग. दोन्ही वरांचें पुरेपूर माप तुझ्या पदरांत घालतों. "

" देव ! " राणी म्हणाली, " म्हणाली, " मला संपत्ती अथवा दागिना मागावयाचा नाहीं; पोशाख अथवा कोणतीहि वस्तु मागा-वयाची नाहीं. तुम्ही माझ्या त्या सर्व इच्छा पूर्ण केल्या आहेत. मी मागणार ते वर इतके साधेसुधे नाहींत. राजानें पुरापुरा विचार करावा आणि वरदानास तयार व्हावें. "

" तूं कांहींहि माग ! " राजा अधीरतेनें म्हणाला, " तुझ्या सर्व इच्छा पुऱ्या करण्यास मी तयार आहें. "

" नको ! वरांची मागणीहि नको आणि वचनभंगाचा प्रसंगहि तुम्हांवर नको. " राणी म्हणाली, " माझी मागणी सर्वस्वी आपणास अप्रिय वाटेल आणि मग ती पुरी केली जाणार नाहीं. "

राजा तरी सावध झाला नाहीं. त्याचा स्त्रीमोह अनावर होता. त्याची कामेच्छा अतिकामसेवनानें वाढलेली होती. तो अत्यंत विषयासक्त होता. राणी कैकयीस पाहिलें कीं तो विकारवश बने व विचारहीन होई. एवढा मोठा बलाढ्य दशरथ! पण तो कैकयीच्या महालांत आला कीं तिचा दासानुदास बने. त्यांतून आज राणीनें केवढें कपटनाटक रचलें होतें !

बिचारा दशरथ कैकयीच्या कपटनाटकास बळी पडला आणि अधीरतेनें अर्थात अविचारानें म्हणाला,

" देवी ! माझी प्यारी राणी ! तूं वरांची मागणी तरी कर. तुझे वर शब्दशः मानले जातील. "

" जरूर वाटल्यास तुमच्या मंत्रिमंडळाचा सल्ला घ्या. " राणी कपटनाटकाचा पुढील वळसा देत म्हणाली,

" रामचंद्राचें मनोगत विचारा आणि नंतर वरदान करण्यास वचनबद्ध व्हा. वरदान मी मागितलें तर त्याची पूर्तता व्हावी लागेल. कसल्याहि कारणांकरितां वरदान अपुरें राहणार नाहीं. "

" वरदानाची बाब खाजगी आहे. त्या बाबतींत मंत्रिमंडळाच्या सल्ल्याची काय जरूर ? " दशरथ म्हणाला, " रामचंद्र उद्यां युवराज झाला तरी आमच्या मर्जीनुसार सर्व हुकूम होणार. रामचंद्राच्या मसलतीची किंवा इतरेजनास विचारण्याची दशरथास मुळींच जरूर वाटत नाहीं. झोपेंत दिलेलीं वचनेंहि आम्ही सूर्यवंशी राजे पुरीं करतों. मग राणी कैकयी ! तुला पूर्ण सावध असतां मी वचन दिलें आहे. या वचनाचा भंग कधींहि होणार नाहीं. वचनपालनाकरितां दशरथ आपले प्राणहि अर्पण करील. बोल ! तुझे वर काय मागावयाचे आहेत ते माग. "

कैकयीदेवी विचारपूर्वक एक एक शब्द बोलूं लागली. ती म्हणाली,

" मला दिलेल्या पहिल्या वरानें अयोध्येचें युवराजपद रामाच्या ऐवजीं माझ्या पुत्रास म्हणजे भरतास द्यावें...... "

राजा निस्तेज बनला ! त्याच्या तोंडावर मरणकळा आली ! ! राणीस दुसरा वर बोलण्यास बराच वेळपर्यंत धाडस झालें नाहीं.

तरी ती स्वकर्तव्य जाणून होती. कांहींहि आपत्ति येवो, दुसरा वर मागितलाच पाहिजे असें ठरवून ती हलक्या आवाजानें म्हणाली,

" महाराज ! माझ्या दुसऱ्या वरानें रामचंद्रानें चौदा वर्षेपर्यंत वनवास स्वीकारावा व काषाय वस्त्रें परिधान करून ऋषिमुनीप्रमाणें जीवन कंठावें. "

हे शब्द ऐकतांच राजा दशरथ यास असह्य दुःख झालें. त्याच्या कानांत तप्त लोहरस ओतल्याप्रमाणें भयंकर यातना झाल्या. त्याचें हृदय कोलमडून गेलें आणि कैकयीच्या जहरी शब्दांबरोबर तो बेशुद्ध होऊन खालीं पडला ! !

'राजा बेशुद्ध झाला' 'राजा बेशुद्ध झाला' अशी भयंकर किंकाळी कैकयीनें फोडली. आसपासचे दोनचार, दहावीस, पांच पन्नास, अनेक लोक तेथें निमिषाधींत जमले. कोणी कांहीं, कोणी कांहीं उपचार केला. कांहीं वेळानें सावध झाल्यानंतर तो राजा रोदन करीत कैकयीस म्हणाला,

" तुला वेड लागलें आहे काय ? भूतबाधेनें तुला पछाडलें आहे काय ? कलीचा संचार तुझ्यांत झाला आहे काय ? जरा विचारानें बोल आणि आपले बोललेले शब्द परत घे. एखादा मद्यपीहि तुझ्या-इतक्या अविचारानें बोलणार नाहीं. "

राणीचें कोमल हृदय अत्यंत द्रवलें. तिच्या नेत्रांत अश्रू उत्पन्न झाले. तरी पण आर्य स्त्रियांवरील आपत्तीची जाणीव तिच्या मनांत जागृत होती. स्वतःचा यज्ञ करण्यास ती तयार होती; परंतु आतां तिला दुसरें संकट वाटूं लागलें. रामाच्या विरहानें दशरथ मृत्युमुखीं पडेल; आपणांस दशरथाच्या मृत्यूबद्दल जबाबदार धरलें जाईल. विचारमग्न अवस्थेंत दशरथाकडे दयार्द्र दृष्टीनें पहात ती उभी होती.

" राणी ! " राजा आर्जवानें म्हणाला, " माझ्यावर अद्यापि दया कर. रामचंद्राचा विरह मला सहन होणार नाहीं. तुझा पहिला वर मी देण्यास तयार आहें. जरूर तर रामचंद्राला अयोध्येच्या भोंवतालचीं पांच गांवें दे आणि भरतास निष्कंटक राज्य द्यावें अशी वरदानांत दुरुस्ती कर. दुसऱ्या वराची पूर्तता करून घेण्याइतकी तूं मनानें दुष्ट नाहींस; त्याच्याऐवजीं दुसरा कोणताहि वर माग. पण

' रामचंद्रास वनवास ' हा शब्दप्रयोग मनाचा अत्यंत छळ करतो! " असें म्हणून तो बलाढ्य राजा धाय धाय रडूं लागला.

कैकयीनें इतक्या वेळांत विचार ठाम केला; ती सर्व शक्ति एकवटून म्हणाली,

" दोन्हीहि वरांची शब्दश: पूर्तता झाली पाहिजे " राजा उठून कैकयीच्या पायावर लोळण घेत म्हणाला,

" राणी ! व्याघ्राची क्रूरता आणि सर्पाची दुष्टता तूं सोडून दे. मनुष्यासारखी विचारवंत बन. हा दशरथ तुझ्या पाया पडत आहे. भलतेच जहरी वर तूं मागूं नकोस. तूं ते परत घे. "

" आपण मला वचन दिलें होतें ना, कीं दोन्ही वरांची पूर्तता करीन म्हणून ? " राणी कैकयी निश्चयानें बोलूं लागली. " आपण राजे आहांत. खुशाल वचनभग करा. रघुकुलाच्या उज्ज्वल यशास वचनभंगानें दशरथानें काळोखी फासली असा बोभाटा मी करीन. तुमचे मंत्री मला वेडे ठरवतील; लक्ष्मण माझी नालस्ती करील. परंतु वचनभंगाचा बोभाटा सर्वत्र होईल असें मी करीन ! "

" राणी ! " आतांपर्यंत धायधाय रडणारा दशरथ अत्यंत निग्रहानें म्हणाला, " वचनभंगाची भाषा बोलूं नकोस. सूर्योदय होण्यापूर्वी रामचंद्र वनवासाला जाईल. माझी आज्ञा तो कदापिहि मोडणार नाहीं. अखेर तूं सापत्नभाव साधलास ! " असें म्हणून डोक्यावर हात मारून तो वृद्ध राजा पुनः रडूं लागला !

रामचंद्राला बोलवण्याकरितां दूत गेले. तो प्रसंग किती करुणाव्यंजक होता याचें यथोचित वर्णन आमच्याचानें करवत नाहीं !

# ११

नजीकच्या काळच्या ढगाआड लपून सतेज रोहिणी तारानाथाकडे सलज्ज पाहून स्मित करीत होती व्योममार्गानें गमन करणारा तारानाथ भित्र्या रोहिणीकडे पाहून खदखदा हंसत होता. त्याच्या दंतपंक्तींतून श्रवणारें स्वर्गीय अमृत त्याच्या शीतल प्रकाशभर पसरून वस्तुमात्रांस नूतन जीवन देत होतें. रोहिणीहून लावण्यानें आगळी सीतादेवी बगिचांत विहार करणाऱ्या रामाकडे पाहून स्मित करीत होती. चंद्राहूनहि नयनांस आल्हाद देणारा राम सीतादेवीच्या चोरट्या नजरेकडे पाहून हास्य करीत होता. विश्वांतील प्रत्येक जिवत प्राणी निद्रावश झाला होता. तरी संयमी राम आणि तितकाच संयमी चंद्र जवळच्या आपल्या प्रेयसीकडे पाहून लगटहि न करतां व्रतस्थ अवस्थेंत मौजेनें जागत होते.

"तारानाथ!" सीतादेवी म्हणाली, "तूं क्षणार्धांत जगांतून नाहींसा होणार. तरीहि रोहिणीशीं संलग्न होत नाहींस. या तुझ्या अरसिकपणास काय म्हणावें?"

तेव्हां रामचंद्र म्हणाला, "चंद्र मुळींच अरसिक नाहीं. त्याच्या प्रत्येक अवयवांत रसिकता भरली आहे. पण तो आपल्याप्रमाणेंच व्रतस्थ असावा! कुलगुरु वशिष्ठ यांनीं आपणांस व्रतस्थ राहण्याबद्दल आज्ञा केली नसती तर देवी, आपण संयमांत ही रात्र न घालवितां आनंदानें निद्रावश झालों असतों. उद्यां आपणांस युवराज्याभिषेक होणार! तन्निमित्त आपणांस व्रतस्थ राहावें लागत आहे."

"आपणांस उद्यां धार्मिक कृत्यें करावयाचीं आहेत. त्यामुळें आपण व्रतस्थ राहिलों. पण....तारानाथास व्रतस्थ राहण्याचें कारण काय? नभाचा बगिचा स्वर्गीय सौंदर्यानें फुलला आहे. त्यांतून विहार करीत असतांहि चंद्रानें व्रतस्थ राहावें यांत त्याचा हेतू काय?"

" जगाच्या कल्याणाकरितां . ." रामचंद्र म्हणाला, " हातांत कंकण बांधून जेव्हां एखादी व्यक्ति तयार होते तेव्हां स्वार्थी सुखा-वर त्यास लाथ मारावी लागते आणि कसल्याहि मादक प्रसंगीं त्यास व्रतस्थ राहावें लागतें."

" म्हणजे उद्यां युवराज बनल्यानंतर " सीतादेवी सभय म्हणाली, " व्रतस्थ राहाण्याचे प्रसंग वारंवार येणार काय ?"

" त्यांत इतकें भयभीत होण्याचें कारण काय ?" रामानें प्रश्न केला, " जसजसा जनतेच्या कार्याचा विस्तार होत जाईल तसतशी आपली स्वार्थी सुखलालसा कमीकमी होत जाईल आणि स्वार्थी सुखलालसा कमी होत जाऊन ती पूर्णपणें नष्ट झाली म्हणजे मनुष्य-जन्माचें कार्य सफल झालें."

सीतादेवी भीतीनें गांगरून रामचंद्राकडे पाहूं लागली. तेव्हां तो म्हणाला, "देवी ! पूर्ण संयमी होणें अर्थात निरंतर व्रतस्थ राहणें हें मनुष्य जीवनांतील साध्य आहे. तूंहि उद्यां युवराज्ञी होशील, थाटा-माटानें हत्तीवरून मिरवशील व यामुळें तुझी स्वार्थी चैन वृद्धिगत होईल, ही कल्पना तूं करूं नकोस. राजेमहाराजे आणि त्यांच्या महाराण्या अत्यंत सुखांत लोळतात या कल्पना खोट्या आहेत. जनतेचें प्रचंड कार्य युवराज्ञी, तुजकरितां वाढून ठेवलें आहे. हें कार्य करूं लागलीस म्हणजे स्वार्थी सुख तुला विसरावें लागेल. युवराज्ञी ही थाटामाटानें मिरवणारी आणि झगझगीत पोशाखांत शोभणारी अशी वरपांगीं दिसली तरी ती खरी जनतेची सेविका आहे. खरा राजधर्म अत्यंत बिकट आहे. सोन्याच्या मुकुटानें त्याचें अलंकृत मस्तक जनतेच्या हिताकरितां चिंता आणि काळज्या यांनीं व्यग्र झालेलें असतें ऐश्वर्यशाली सम्राट बनला कीं त्याच्या स्वार्थी सुखाचा ऱ्हास झाला असें समजावें. वैभवशाली राजसिंहासनाचा लाभ म्हणजे व्यक्तिगत सुखाचा संन्यास. देवी ! उद्यां आपण आपल्या स्वार्थी सुखाच्या दृष्टीनें संन्यासी बनणार आहोंत. व्रतस्थ अवस्था आपणांस निरंतर स्वीकारावी लागेल. राजा म्हणजे जनतेचा सेवक. जनतेच्या सेवेचें व्रत उद्यांपासून आपणांस स्वीकारावयाचें आहे आणि याकरितां आपणांस वारंवार व्रतस्थ राहावें लागेल. पण देवी ! यांत

भिण्याचें काय कारण ? जसजसें आपलें स्वार्थी सुख विनाश पावेल तसतसें आपण मनुष्यत्वाच्या उच्च पायऱ्या चढत जाऊं आणि अखेर आपण चिदानंद स्वरूपास प्राप्त होऊं."

ही रामचंद्राची तत्त्वप्रणाली सीतादेवीस पटली नाहीं. ती सभय उद्‌गारली, " देव ! युवराजपद असें अवघड असेल तर सूर्योदयापूर्वीच आपण रानावनांत पळून जाऊ, तेथें वनचराप्रमाणें राहूं आणि साहचर्याचें प्रेम अखंड उपभोगू. युवराज आणि युवराज्ञी होण्यापेक्षां माझ्या मतें वनवासी सीताराम अधिक सुखी होईल ! "

" देवी ! " रामचंद्र म्हणाला, " वनवासावर तुझें अलोट प्रेम दिसतें. दैववशांत आपणांस वनवासहि पत्करावा लागेल; पण आज आपणांस जनतेचे सेवक बनलें पाहिजे. पहा, तारानाथ आपल्या पश्चिमेकडील महालांत शिरला आणि रोहिणीसह लुप्त झाला. चल! आपणहि आपल्या मंदिरांत जाऊं. "

असें म्हणून रामचंद्र सीतादेवीसह आपल्या महालांत येऊन प्रविष्ट झाला. तेथें मंचकावर ऐषआरामाची बैठक केली होती. पण तिकडे न जातां जवळच दोन गवताचीं आसनें पसरलीं होतीं त्यावर व्रतस्थ रामचंद्र आणि सीतादेवी जाऊन बसले.

मध्यरात्र उलटली होती. निशादेवी आपल्या भरज्वानींत होती. तिनें काळें वस्त्र परिधान केलें होतें. लांबून होणाऱ्या घुबडाच्या अनिष्टसूचक ध्वनिशिवाय कसलाहि ध्वनी ऐकूं येत नव्हता. चोहोंकडे भीषण स्तब्धता पसरली होती. प्रसन्नवदन रामाच्या मनावर एकाएकीं दुःखाची छाया दिसूं लागली. आपलें मन निष्कारण कां दुःखी झालें याचा शोध रामचंद्र करीत होता. कांहीहि कारण घडून आलें नसतां मनांत उदासीनता ज्या अर्थी निर्माण झालेली आहे त्या अर्थी कांहींतरी अनिष्टसूचक बातमी आपणास ऐकण्यास मिळणार असें रामचंद्रास वाटूं लागलें.

" देवी ! " रामचंद्र म्हणाला, " बाबांची प्रकृति तर बिघडली नाहीं ना ? "

असें रामचंद्र म्हणत आहे तोंच दशरथाचा सेवक त्याच्यापुढें येऊन उभा राहिला.

" काय ? बाबांच्याकडील काय हकीकत आहे ? इतक्या रात्रीं तूं येथें कां आलास ? बाबांची प्रकृति बरी आहे ना ?" रामानें प्रश्न केले.

" राजकुमार !" तो सेवक उत्तरला, " तुम्ही बरोबर ताडलें. " महाराजांनीं तुमची आठवण केली आहे आणि 'तुम्हाला ताबडतोब पाचारण कर ' अशी मला आज्ञा झाली आहे. "

" अरे !" रामचंद्र म्हणाला, " माझ्या प्रश्नाला तूं नीट उत्तर दिलें नाहींस. बाबांची प्रकृति बरी आहे ना ? "

" प्रकृतीनें नसले तरी ते मनानें अत्यंत अस्वस्थ आहेत. राजकुमारांनीं येण्याची त्वरा करावी. "

" हा मी निघालों. " असें म्हणून रामचंद्र ताडकन् उठला आणि त्या सेवकाच्या मागोमाग वाट चालूं लागला.

रामचंद्र क्रोधागारांत पाय ठेवतो तोंच त्याला अत्यंत करुणाव्यंजक दृश्य दिसलें. तो दशरथाजवळ गेला; दशरथ पलंगाच्या खालीं जमिनीवर हताश होऊन बसला होता. त्याच्या नेत्रांतून अश्रूबिंदू ठिबकत होते. जवळच एका मंचकावर धाडसाची ढाल करून तिच्या आश्रयानें कैकयीदेवी बसली होती. तिच्या चर्येत कठोरतेचा अंशहि नव्हता; पण निश्चयीपणा पुरापुरा भरला होता. ती धैर्याची पराकाष्ठा करून प्रसंगास तोंड देत होती. दशरथाची करुण अवस्था पाहूनहि तिचें मन द्रवलेलें दिसत नव्हतें. स्त्रियांचें हृदय कोमल खरें; परंतु एकदां कोणत्याहि गोष्टीचा निश्चय झाल्यानंतर त्यांची कोमलता पार नाहींशीं होते आणि करारी निश्चयानें कसल्याहि हृदयास पाझर फोडणारे प्रसंग त्या पाहूं शकतात.

" बाबा ! मी राम आलों आहें. " रामचंद्र म्हणाला,

" रामचंद्रा, आलास ? बैस, माझ्याजवळ बैस. " असें म्हणून दशरथानें रामचंद्राच्या पाठीवर हात फिरविला, त्याच्या तोंडावरून कुरवाळलें आणि तो भग्नहृदयी राजा रामचंद्रास कडकडून भेटला. त्याच्या मनाचा उसना धैर्याचा बांधारा फुटला आणि तो अत्यंत शोकाकुल झाला.

" बाबा ! हें काय, हें काय ? " रामचंद्र म्हणाला, " मी समीप असल्यावर तुम्हास शोक करण्याचें कारण काय ? "

"मला तुझा दीर्घकाळ विरह होणार" दशरथ म्हणाला. "मी तुला चौदा वर्षेपर्यंत वनवासास जाण्याची आज्ञा निरुपायानें देणार आहें."

" कां बाबा ? " रामचंद्र म्हणाला, " मला हें शासन कां करता ? नकळतपणें माझ्या हातून कांहीं दोष घडला आहे काय ? अजाणतेपणानें तुमच्या हुकुमाचा कांहीं भंग झाला आहे काय ? मी जाणूनबुजून कांहीं अपराध करणार नाहींच. पण नकळत माझ्याकडून कांहीं चूक झाली आहे काय ? "

" रामचंद्रा, तूं माझा पंचप्राण ! मला अप्रिय अशी गोष्ट तुझ्या हातून कशी होईल ? तूं कोणताहि अपराध केला नाहींस. "

" मग मला चौदा वर्षेपर्यंत वनांत जाण्याची आज्ञा कां करतां ? " रामचंद्र म्हणाला.

" हा सगळा माझ्या दुबळेपणाचा परिणाम. वृद्ध झालों असतां स्त्रीमोहांत अडकून राहिलों त्याचें प्रायश्चित्त मला मिळणार ! रामा, माझें हृदय फाटून जातें रे ! अखेर शाप खरा ठरणार !!" दशरथ विव्हल अवस्थेंत बोलूं लागला, " आणि अखेर हा स्त्रीलंपट दशरथ तुझ्या विरहानें मृत्युमुखीं पडणार ! हाय, ' माझा राम !' हाय ! हाय !! " दशरथ राजा आतां ओक्साबोक्शीं रडूं लागला.

रामानें प्रश्नसूचक मुद्रेनें कैकयीकडे पाहिलें. तेव्हां कैकयी म्हणाली,

" पूर्वी युद्धप्रसंगीं मी तुझ्या पित्याची महत्वाची कामगिरी केली होती. त्या वेळीं महाराजांनीं मला दोन वर दिले. त्या वरांची पूर्तता करण्यास ते वचनबद्ध झालेले आहेत. पहिल्या वरानें तुला युवराजपद न मिळतां तें भरतास मिळावें अशी मी मागणी केली आहे... "

" त्यास माझी पूर्ण संमति आहे. " रामचंद्र म्हणाला, " अयोध्येचा ' युवराज ' माझ्या प्रेमळ मातेच्या इच्छेकरितां माझा बन्धू भरत हा होईल. माझी त्यास पूर्ण सम्मति आहे. "

हे शब्द बोलतांना रामचंद्राच्या मनाला किंचित्‌हि दुःख झालें नाहीं. तो म्हणाला,

" मातोश्री ! तूं दुसरा वर कोणता मागितलास ? "

त्यावर अधोवदन कैकयी म्हणाली, "सूर्योदयापूर्वी रामानें चौदा वर्षांचा वनवास स्वीकारावा व काषाय वस्त्रें परिधान करून ऋषिमुनींचें जीवन कंठावें!" हे शब्द बोलत असतांना तिचें म्लान वदन झालें होतें. कशी तरी आपली कामगिरी पार पाडण्याकरितां तिनें शब्दोच्चार केला.पण त्याबरोबर तिचें मन नव्हतें. तें दशरथाइतकेंच दु:खी झालें होतें. खरी अवस्था बाहेर दिसू नये म्हणून मनास तिनें तीव्र निश्चयाचा लगाम घातला होता.

"बाबा!" रामचंद्र म्हणाला, "तुम्ही दोन्ही वर देण्यास वचनबद्ध झाला आहांत. मातोश्रींचे वर वरपांगीं अत्यंत कठोर दिसतात. पण माझी माय इतकी दुष्ट नाहीं. रामचंद्रानें भरताचा जिव्हाळा कैकयीमातेजवळ संपादन केला आहे. कैकयीदेवी रामालाच आजपर्यंत भरत मानत होती. मला वनवासास पाठविण्यांत तसाच तिचा अत्यंत शुद्ध व उदात्त हेतू असला पाहिजे."

"रामा! स्त्रीजात म्हणजे सर्पाची जात; वाघाइतकी क्रूर जात." दशरथ म्हणाला, "तिच्या दुष्टपणास चांगुलपणाचा मुलामा देऊं नकोस. दुष्टेनें मला फसविलें; माझ्या नाशास कारण झाली!! रामचंद्रा, तुझा विरह कसा रे माझ्याच्यानें सहन होईल?"

असें म्हणून तो शोकमग्न राजा बेशुद्ध होऊन खालीं पडला!!!

कैकयीच्या मनाची अत्यंत कालवाकालव होत होती. परस्परविरुद्ध विचारांची तिच्या मनात झुंज चालली होती. तिचा प्रेमळ, सरळ स्वभाव तिला सांगे, दोन्ही वर परत घ्यावे, दशरथाचा चाललेला मनस्ताप नाहींसा करावा आणि रामाच्या युवराजोत्सवांत आनंदानें सामील व्हावें. तोंच आर्यस्त्रियांच्या विपन्नावस्थेचें चित्र तिला दिसे आणि कोणत्याहि सौम्य विचाराच्या स्वाधीन न होतां जगाच्या कल्याणाकरितां रामास वनवासास धाडलेंच पाहिजे असा तिच्या विचारांत बदल पडे.

ती शेवटीं म्हणाली, "रामा, तुझ्या पित्यानें तीन वेळां लग्नें केलीं. तुझी माता महिषि कौसल्या, राणी सुमित्रा आणि मी, अशा एकमेकींच्या सवती. परंतु आमच्यांत द्वेषभाव कधींही उत्पन्न झाला नाहीं. आम्ही तिघी सख्या बहिणीप्रमाणें प्रेमानें वागलों हें रामचंद्रास

माहित आहे. भरत आणि राम यामध्यें माझा दुजाभाव नाहीं. मी सवतीमत्सरामुळें अथवा तुमच्या सापत्न भावामुळें तुला वनास पाठविण्यास कारणीभूत झालें, असा माझ्यावर जनापवाद येईल. परंतु रामचंद्रा, तुला माझ्या मनाची खरी पारख आहे. एकटच्या रामचंद्रानें मला निर्दोषी ठरविलें, तरी मी जनापवादाची मुळींच पर्वा करणार नाहीं."

"मातोश्री, माझी खात्री आहे कीं तूं द्वेषभावानें अगर सवतीमत्सरानें मुळींच प्रेरित झाली नाहींस. मला वनवासास पाठविण्यास तुझा कोणता तरी स्तुत्य हेतु आहे."

रामचंद्राच्या या आश्वासनानें कैकईचें मन शांत झालें. ती कांहीं तरी बोलणार तोंच राजा दशरथ शुद्धीवर येऊं लागला आणि अर्धवट शुद्धीवर येऊन म्हणाला,

"माझा राम मला सोडून गेला ना?"

"नाहीं बाबा." प्रेमळ रामचंद्र दशरथाजवळ जाऊन म्हणाला, "मी अद्याप तुमच्या चरणाजवळ आहें." इतक्यांत मुख्य मंत्री सुमंत आणि कुलगुरु वशिष्ठ तेथें आले. त्याच्याकडे वळून राजा दशरथ म्हणाला, "तुम्ही अगदीं वेळेवर आलांत. मी शुद्धीवर आहें, माझी बुद्धि नष्ट झालेली नाहीं, त्यापूर्वी मला सर्व सांगितलें पाहिजे. मी कैकईस पूर्वी दोन वर दिले होते. वर पुरे करण्यास मी वचनबद्ध झालों आहें.

"एका वरानें भरतास युवराजपदाची प्राप्ति आणि दुसऱ्या वरानें रामास चौदा वर्षें वनवास, असा दुहेरी पेंच कैकयीनें घातला आहे. याकरितां आतां रामास युवराज्याभिषेक होणार नाहीं. तो यथाकाळ भरतास होईल. रामानें सूर्योदयापूर्वी शरयू नदी उतरून वनवासास जावें." असें म्हणून 'हा राम, हा राम!' असा दशरथ शोक करूं लागला.

"बाबा, तुमची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. सूर्योदयास दोन घटका अवकाश आहे. त्यापूर्वी वनवासाची सिद्धता मला केली पाहिजे. मी क्षणार्धांत मातेची परवानगी घेऊन येत आहें. तोंपर्यंत तुम्ही मला प्रेमानें निरोप देण्यास तयार व्हा."

असें म्हणून रामचंद्र राजमाता कौसल्या देवीकडे निघून गेला.

चौदा वर्षांचा वनवास किती दुःखद असेल, हा विचारहि त्याच्या मनास शिवला नाहीं !

ही चमत्कारिक घटना ऐकून वशिष्ठ विस्मयचकित झाला. परंतु तो दुःखी मुळींच झाला नाहीं ! !

## १२

महिषी कौसल्यादेवीच्या लावण्याचा फुलोरा वयोमानानें जरी कोमेजला होता, तरी त्याचा सुगंध आणि रमणीयता कमी झाली नव्हती. त्यांतून महिषीपदास अनुरूप अशा बहुमोल वस्त्रालंकारांनीं ती मढलेली असल्यामुळें ती अद्यापिहि तरुण भासे. तिचें लावण्य आणि वेशभूषा उन्मादक अथवा नखरेल नव्हती. साधेपणानें देखील त्यांत पराकाष्ठेचें दैवी तेज विलसत होतें. रामचंद्राच्या जन्मापासून ती व्रतस्थ अवस्थेंत होती. गेल्या चोवीस वर्षांच्या काळांत तिनें भोगास स्पर्श केला नाहीं. प्रथमप्रथम विलासी राजा दशरथ यानें तिचें मन भोगास प्रवृत्त करण्याचा प्रयत्न केला. परंतु तिची व्रतस्थ अवस्था ढळली नाहीं. शेवटीं राजानें कंटाळून कैकयीशीं विवाह केला आणि तिला आपली भोग्यांगना बनविलें. एकाद्या धार्मिक अथवा सामाजिक विधीच्या वेळीं पट्टराणी म्हणून महिषीपदावर कौसल्या विराजमान होई. परंतु तिचा इतर सर्व वेळ पूजाअर्चा, जपजाप्य, नेमधर्म यांत ती घालवीत असे. प्रत्यहीं सूर्योदयापूर्वी दोन घटिका उठून ती स्नान व देवार्चन करी आणि बरोबर सूर्योदयाच्या वेळीं उगवत्या सूर्यास नमस्कार करण्याकरितां नियमितपणें ती आपल्या मंदिराच्या बाहेरील ओटयावर आलेली दिसे. सूर्य हा आपला आदिवंशज अशी तिची समजूत होती; आणि त्या श्रद्धेनें तिचा दररोजचा उगवत्या सूर्यास नमस्कार कधींही चुकला नाहीं. आज मात्र

नियमित वेळेपेक्षां बरेच अगोदर तिनें आपलें स्नान आटोपलें आणि देवदेवहि सूर्योदयापूर्वीं आटोपला. रामचंद्रास आज युवराज्याभिषेक होणार, तन्निमित्त त्यास मंगलस्नान सूर्योदयास घालावयाचें याकरितां ती सज्ज झाली होती.

महिषी कौसल्या रामाच्या मंगल स्नानाची वाट पाहत बसली होती. तिला आज अपरिमित आनंद झाला होता. क्षणानें माझ्या रामास मंगल स्नान घातलें जाईल आणि एक प्रहरच्या आंत रामास यौवराज्याभिषेक होईल या सुखद विचारांत ती होती. तिला रामचंद्राचा सारा इतिहास आठवला. रामचंद्र जन्मला तेव्हां घननील रामचंद्राच्या सौंदर्याचा प्रकाश खोलीभर पडला होता. त्याची जन्मपत्रिका वामदेवांनीं वर्तविली तेव्हां ते म्हणाले, " हा सद्गुणी, सदाचारी, आणि सत्वगुणांचा परम धारक असा महनीय पुरुष होईल; तो अत्यंत शूर, प्रजाहितदक्ष आणि समुद्रवलयांकित पृथ्वीचा चक्रवर्ती राजा होईल. समुद्र ही त्याच्या राज्याची सीमा राहणार नसून त्याच्याहि पलीकडे त्याची सत्ता चालेल. दुर्जनांचा संहारक होऊन तो सज्जनांचा सहाय्यक होईल. एकंदरींत हा युगकालीन पुरुष रघुकुलदीपक आणि इक्ष्वाकु कुळांत लोकोत्तर असा श्रेष्ठ पुरुष होईल." हें वामदेवाचें भविष्यकथन ऐकून आपल्या पोटीं 'परमेश्वरानें अवतार घेतला' असा आनंद कौसल्येस झाला. अशा महनीय पुरुषास जन्म देऊन पवित्र झाल्यानंतर विषयांच्या अपवित्र कर्दमांत आपण मुळींच लोळणार नाहीं, यावत्जन्म भोगाचा आपण त्याग केला असून विषयवासनेचा मळ मनांतून पूर्णपणें काढून टाकला, असा केलेला निर्धार कौसल्येच्या मनःचक्षुपुढें उभा राहिला आणि तेव्हांपासूनचें आपलें सर्व आयुष्य रामाच्या संगोपनांत आणि त्याच्या हितचिंतनांत घालविलें आणि आजचा रामाचा परमोच्च भाग्याचा दिवस, तोहि पाहणें आपल्या भाग्यांत आहे. अशा सुखद विचारांत महिषी कौसल्या होती. तिनें आपले डोळे मिटले आणि रामाच्या रूपाचें ध्यान करून त्याचें दर्शन तिनें आपल्या मिटलेल्या डोळ्यांनीं घेतलें.

" आई, मी तुझा आवडता राम ! "

तिला हवा तो शब्दनिनाद तिच्या कानीं पडला.... तिनें डोळ् उघडले आणि प्रसन्नवदन रामास आनंदानें चित्तांत सांठवीत ती म्हणाली,

" राम, तुझ्या मंगल स्नानास किती अवकाश आहे? मी केव्हां-पासून तयार होऊन बसलें आहें ! "

" आई, आतां माझें मंगल स्नान शरयूतीरीं ! "

" म्हणजे ? सूर्योदयानंतर दोन घटिकांनी तुला युवराज्याभिषेक होणार; त्याला उशीर नाहीं का होणार ? "

" आई, बाबांचा विचार बदलला ! मला अयोध्येचें युवराजपद मिळणार नसून मला बाबांनीं सर्व अरण्याचें राज्य बहाल केलें आहे." श्रीराम म्हणाला.

रामाच्या भाषणाचा कांहींसा अर्थ कौसल्येस लागला. ती अत्यंत दु:खीकष्टी झाली. चिंतेचें साम्राज्य तिच्या प्रफुल्लित मनावर पसरलें. ती म्हणाली,

" राम, मला नाहीं रे तुझ्या बोलण्याचा अर्थ कळत ! जरा स्पष्ट बोल. "

जवळ सुमंत प्रधानाचा मुलगा अभिनंदन उभा होता. त्यानें आईस दु:खद वार्ता कळविण्याचा रामाचा प्रसंग टाळला आणि कौसल्येस सर्व वृत्तांत सांगितला व शेवटीं तो म्हणाला,

" हा रामचंद्राचा वनवास चौदा वर्षांचा आहे आणि आज सूर्यो-दयापूर्वी रामानें अयोध्या सोडावी अशी राजाची आज्ञा आहे. वनांत गेल्यानंतर काषाय वस्त्रें परिधान करावीं व ऋषीमुनीचें जीवन कंठावें, हा कैकईचा वर राजानें पुरा केला आहे. "

" हाय रे देवा ! माझा सुकुमार राम चौदा वर्षाचा वनवास एकटा कसा कंठील ? ऐन भाग्योदयाच्या दिवशींच हा घाला कसा पडला ? "

असें म्हणून कौसल्यादेवी हृदय फुटेल असा विलाप करूं लागली. तो विलाप ऐकून सीतादेवी व इतर स्त्रिया तेथें येऊन दाखल झाल्या. त्या सर्वांनींहि रडून आकाशपाताळ एक केलें.

शेवटी रामानें सर्वांकडे पाहून हात जोडले आणि म्हटलें,

" सूर्योदयास फार थोडा अवकाश उरला आहे.त्यापूर्वी मला शरयू-पार झालें पाहिजे. थोडा विचार करा. ज्या ज्या गोष्टी संचितांत लिहिल्या आहेत, त्या कधींही टळणार नाहींत. उरलेल्या थोड्या वेळांत माझ्याशीं दोन गोष्टी प्रेमानें, गोडीनें बोला. नाहींतर मला याच पावलीं परत जावें लागेल. आई, तूं इतकी संयमशील; तूं तरी शांत हो ! "

" रामा !" कौसल्या स्फुंदून स्फुंदून रडत म्हणाली,

" मी तुझी कोणीच नाहीं काय ? आईचा विचार न घेतां तूं चौदा वर्षांचा वनवास कां स्वीकारलास ? माता हें पहिलें दैवत, असें तूं आजपर्यंत म्हणत होतास. मग माझी आज्ञा तूं कां न मानावीस ? चौदा वर्षें वनवासाची आज्ञा कठोर व निंद्य आहे. तूं वनवासांस जाऊं नयेस, अशी मी आज्ञा करतें. माझीच आज्ञा तुला पाळावी लागेल. "

" आई, अशी आज्ञा करूं नकोस " राम अजिजीनें म्हणाला, " बाबा वचनबद्ध झाले आहेत. त्यांचा वचनभंग होईल असें मी कधींहि वागणार नाहीं. "

इतका वेळ सीतादेवी स्वस्थ उभी होती. ती पुढें येऊन म्हणाली,

" पतिदेवांचा निर्धार वनवासास जाण्याचा असेल तर त्यांना मलाहि घेऊन जावें लागेल. जेथें ज्या अवस्थेंत पतिदेव, तेथें त्या अवस्थेकरितां मीहि त्यांची भागिदारीण आहें. "

सीतादेवीचें हें भाषण ऐकून कौसल्येचें रडणें बंद झालें. तिला हें नवीनच संकट अधिक भयप्रद वाटलें. ती सीतेजवळ गेली आणि तिच्या तोंडावरून हात फिरवीत म्हणाली,

" राम एकवचनी आहे. तो वडिलांची आज्ञा कधींही उल्लंघणार नाहीं. या वेळीं बरोबर जाण्याचा हट्ट धरणें चुकीचें होईल. तूं गादी, सिंहासन, फार तर हिंदोळा यावर बसणारी कोमल राजकन्या आहेस. तुला राजवाड्यांतील जमिनीवरूनहि चालण्याचें माहित नाहीं. तसबिरीमधील वानराचें विकृत चित्र पाहूनही तूं घाबरतेस.

वनवास तुजकरितां नाहीं; तूं मजजवळच येथें रहा. चौदा वर्षांचा रामचंद्राचा विरह तुझ्या संगति-सुखांत मी कंठूं शकेन."

" वनांत तपस्वी लोकांच्या कन्यका आणि बायका रहातात ना ? वनांत कायमची वस्ती करून राहणारे भिल्ल, मातंग आहेत ना ? त्यांच्या बायका-मुली त्यांच्याजवळ वनांतच रहात असतील." सीता म्हणाली.

त्यावर रामचंद्र म्हणाला,

" विंचू, सर्प, इत्यादि विषमय प्राण्यासारखें कठोर जीवन भिल्ल आणि मातंग यांच्या कन्यकांचें असतें त्यामुळें त्यांना वन मानवतें. पण तुम्हांस दिवा मालविण्याचा त्रास होईल म्हणून आईनें तुम्हांस मालवूं दिला नाहीं. इतका तुमच्या रोमरोमांत नाजुकपणा भरला आहे. तुम्हीं वनवासास येणें योग्य नाहीं. तपस्वी लोकांचें जीवन अत्यंत कष्टप्रद असतें. त्यांच्या कष्टाळु स्त्रिया आणि देवी तूं, यांची तुलना कशी होईल ? व्यर्थ हट्ट धरूं नकोस. माझा विरह मातोश्रीस फार त्रासाचा आणि कष्टाचा वाटेल. तूं येथें राहिलीस तर तिचे विरहाचे दिवस हलके जातील ! याकरितां देवी, तूं माझ्या आईजवळ रहा. सासुसासऱ्यांची सेवा करणें हा उत्तम स्त्रीधर्म होय. त्यास जाग आणि माझी आज्ञाधारक पत्नी हो ! "

सीतादेवीस हा रामाचा उपदेश मुळींच रुचला नाहीं. ती म्हणाली, " मी सध्यां सुखासीन आहें. कोमलपणा आणि सौम्यपणा हे माझ्या सध्यांच्या स्थितीचे गुणदोष आहेत. परंतु पतिदेवहि वनवासांतील त्रास सहन करण्यास हल्लींच्या त्यांच्या परिस्थितीप्रमाणें योग्य नाहींत. अंगात कपडे चढविण्यापासून सायंकाळीं निद्रावश होईपर्यंत त्यांचीं सर्व कामें नोकरचाकरांकडून होतात. त्यांना जर वनवासांतील कष्ट सहन होतील, तर बदललेल्या परिस्थितीप्रमाणें मीहि ऋषि-कन्यका अथवा भिल्ल-कन्यका यांच्याइतकी कणखर बनेन आणि मला माझा स्त्रीधर्म उत्तम रीतीनें पाळतां येईल. राजवाड्यांतील आयुष्यांत मला त्यांची सेवाचाकरी मुळींच घडत नाहीं. परंतु वनवासांतील आयुष्यात त्यांची सेवाचाकरी करून मी धन्य होईन. त्यांचें वनवासाचें एकाकी आयुष्य रुक्ष बनेल. तें माझ्या संगतीसोब-

तीनें प्रफुल्लित राहील. पतिदेवास मी तयार केलेलें अन्न खाण्याचा कधींही योग आला नाहीं. ती माझी इच्छा वनवासांतील आयुष्यांत पूर्ण होईल. अरण्यांतील कंदमुळें शिजवून त्यांचा गोड आहार बनवीन. डोंगरकटारीचें वहाणारें शुद्ध जल आणि कंदमुळाचें अन्न यांचें सुग्रास जेवण मी पतिदेवांना घालीन. झाडाखालीं गळलेल्या पानांची मी पतिदेवाकरितां मृदुल शय्या बनवीन. अशा स्वयंरचित शय्येवर पतिदेव निजले असतां त्यांची ही दासी त्यांचे पाय चुरीत रात्रीच्या रात्री कंठील. वनांत विहरणाऱ्या पशुपक्षांचें जीवन ज्याप्रमाणें स्वछंदी व निरामय असतें, त्याप्रमाणें सुखी जीवन, माझ्यामुळें त्यांचें व त्यांच्यामुळें माझें जाईल. सासुबाईंनीं मला पतिसेवेस जाण्यास विरोध करूं नये व पतिदेवांनींहि माझा त्याग करून जाऊं नये. वनवासांतील जीवनाची मी किती चाहती आहें हें पतिदेवास माहित आहे. हा पतिसेवेचा योग मी कधींहि टळूं देणार नाहीं."

आतां कौसल्यादेवीच्या मनांत प्रकाश पडला. सीतेनें रामचंद्राबरोबर जावें हाच खरा सतीधर्म आहे असें तिला वाटूं लागलें. रामाचें वनवासांतील जीवन सुखी बनण्यास सीतेचें साहचर्य पाहिजे, असा विचार तिच्या मनांत ठाम होऊं लागला. पण सुखांत वाढलेली, राजवाड्यांत लहानाची मोठी झालेली राजकन्या वनवासांतील भयप्रद जीवन कंठण्यास नालायक आहे असें तिला वाटत होतें. सीतेचें निग्रहाचें भाषण ऐकून ती म्हणाली,

"कोमल लतापल्लवांनीं बागेंतूनच जगावें आणि मोठें व्हावें, गुलाब पुष्पांनीं झाडावर आहे, तोंपर्यंत टवटवीत दिसावें त्याप्रमाणें कोमल राजकन्येचें जीवन आहे. राजवाडा सुखाचा असेपर्यंत त्या सुखांत राहतील. पण वनवासाचें स्थित्यंतर त्यांच्या नाशास कारणीभूत होईल. मुली, तूं समजूतदार व शहाणी आहेस. तुझ्या सतीधर्मास मी विरोध करणार नाहीं. परंतु अरण्यांत सिंहव्याघ्र इत्यादि क्रूर पशूंचा भरणा फार. सर्प, अजगर इत्यादि दुष्ट जंतु अरण्यांतील जीवनांत पदोपदीं दृष्टीस पडणार. शिवाय नरमांसभक्षक अशा राक्षसापासून अरण्यांत फार भीति. अशा भयप्रद अरण्यांत तूं जाऊं नयेस अशी माझी इच्छा आहे."

त्यावर सीतादेवी म्हणाली, "पतिदेवासारखा एकबाणी वीर समीप असल्यावर मला कशाची काळजी ? जेथें पतिदेवांचा निवास राहील त्या ठिकाणचे सिंहव्याघ्रादि क्रूर पशु आपली नैसर्गिक क्रूरता विसरून जातील आणि आम्ही राहूं त्या ठिकाणची रखवाली ते करतील सर्पअजगरादि जंतु आपला विषमय दंश करण्याचें विसरून पतिदेवाच्या शयनाचे ठिकाणीं आपले अंगाचें मृदुल उसें देतील. इतका पतिदेवाच्या पुण्यमय जीवनांचा प्रभाव आहे. माझ्या संरक्षणाची काळजी मुळींच तुम्हांस करावी लागणार नाहीं. पतिदेवांच्या पुण्याईनें आणि पराक्रमानें माझें संरक्षण होईल. "

"देवीनें असा भलताच दुराग्रह धरूं नयें आणि मला निष्कारण अडथळा करूं नये. " रामचंद्र म्हणाला, " परवाच्या वनविहारांतील सुखी जीवन आणि माझ्या वनवासांतील रुक्ष व कष्टमय जीवन हीं सारखींच आहेत असें देवी, तूं मानूं नकोस. वनविहार तो वनविहार आणि वनवास तो वनवास ! वनवासांतील त्रासाची कल्पना देवी,तुला होणार नाहीं. तुझ्या पित्यास तूं वनवासास गेलीस, हें रुचणार नाहीं. लौकिकाचारास रामानें सीतेस वनवासास नेलें ही गोष्ट पटणार नाहीं. याकरितां देवी, मजबरोबर वनवासास येण्याचा दुराग्रह धरूं नकोस. "

" देव, मातुश्रीतुल्य सासुबाई !" सीताबाई किंचित रोषानें म्हणाली, " मी सतीधर्मानें वागत असतां, पतिव्रता धर्मानें वागण्याचा निश्चय मी बोलून दाखवित असतां, तुम्ही मला विरोध करितां, हें पाहून मला फार दुःख होतें. वनवासांत पतिदेवासमवेत राहून त्यांच्या कष्टांत आणि दुःखांत भागिदारीण होऊन त्यांची अखंड सेवा करीत राहणें हा सतिधर्म, का वनवासांत पतिदेव कष्टांत आणि त्रासांत दिवस कंठीत दिवस कंठित असतांना राजवाड्यांत सुखानें मौजा मारणें, हा सतिधर्म ? वनवासांत पतिदेवांच्या उपयोगी पडून सदैव त्यांच्या आपत्कालीं त्यांचा मित्र बनणें हा सतीधर्म; का वनवासांत गेलेल्या पतिबद्दल निष्काळजी राहून आपत्काळींहि त्यांचा त्याग करून राजवाड्यांत आनंदानें काळ कंठणें हा सतीधर्म ? चौदा वर्षांचा वनवास ! एवढा दीर्घकाळ अखंड

पतिदेवांच्या साहचर्यांत राहणें, हा सतीधर्म, का अंगचोरपणा करून शरीर बचावून दुःखी जीवनाचा त्याग करून चौदा वर्षें मोजा मारीत राहणें, हा सती धर्म ? विचार करा. मी पतिदेवांच्या सुख-दुःखाची भागिदारीण आहें. आजपर्यंतचा काळ पूर्ण सुखांत आम्ही घालविला. मग आपत्तीच्या वेळीं त्यांची भागिदारीण होणें यांतच खरा पति-व्रताधर्म आहे. मला सत्धर्मापासून परावृत्त करूं नका. जनापवादाची भीति निरर्थक आहे. जनापवाद हें दुतोंडी मूर्ख जनावर आहे. मला वनवासास नेलें नाहीं तरी जनापवाद, चौदा वर्षपर्यंत तुम्ही हिला टाकलें अशी तुमची निंदा करील आणि मला वनवासास नेलें तर कोमल राजकुमारीला तुम्ही वनवासास नेण्यांत क्रूरपणाची कमाल केली अशी तुमची निंदा होईल. याकरितां जनापवादाकडे दुर्लक्ष करणें जरूर आहे. सत्धर्म पाळणें, आणि सद्धर्म पाळण्यास परवानगी देणें, हाच खरा उचित मार्ग. त्यांतून आयुष्मन्, तुम्ही आपल्या विवाहाच्या वेळीं वचनबद्ध झाला आहांत 'नातिचरामि, नाति-चरामि' म्हणजे त्याग करणार नाहीं, सोडून जाणार नाहीं, अशी प्रतिज्ञा तुम्ही मजकरितां भाकली आहे. या प्रतिज्ञेचा भंग मला राजवाड्यांत डांबून ठेवून होणार नाहीं काय? विवाहकाळच्या प्रतिज्ञा, इतर प्रतिज्ञांपेक्षां अधिक महत्वाच्या आणि धार्मिक स्वरू-पाच्या आहेत. तुम्ही सत्यप्रतिज्ञ आहांत,एकवचनी आहांत. रघुवशांत वैवाहिक प्रतिज्ञा मोडणाराही मनुष्य निर्माण झाला असा तुमचा दुर्लौकिक होईल. सत्यप्रतिज्ञ असाल, तर माझा सतीधर्म पाळण्या-करितां मला तुमच्याबरोबर न्या. जननिंदेचें लंगडें कारण मी ऐक-णार नाहीं. जननिंदेवरून चालत जाऊन मी सतीधर्म पाळीन. मातोश्रीतुल्य सासुबाई, तुम्ही थोर पतिव्रता आहांत. मनाचें दुःख बाजूस ठेवून पतिदेवास योग्य सल्ला द्या. माझ्या पित्यासंबंधाचें तुम्ही दुसरें कारण दाखविलें. परंतु तुम्ही मला वनवासास घेऊन गेला तरच त्यास आनंद वाटेल. तुमच्या कर्तव्याची आणि पराक्रमाची त्यास खात्री पडेल. जर आपण मला राजवाड्यांत ठेवून जाल तर राजा जनक अत्यंत दुःखीकष्टी होईल आणि ज्यास पत्नीचेंहि संरक्षण करतां येत नाहीं अशा दुर्बलास मी कन्यादान केलें, असा त्यांस पश्चात्ताप वाटेल. सासुबाई पतिदेवाच्या

आपत्तीच्या काळांत त्यांच्या समीप राहून त्यांच्या दु:खाची भागीदारीण होण्याची पदर पसरून मी मागणी मागतें. माझ्या पदरांत सत्धर्माचें ' वाण ' घाला."

कौसल्यादेवी ही थोर पतिव्रता होती. तिला सीतेचें म्हणणें पटलें. तिनें आपल्या डोळ्यांतील अश्रु पुसले आणि धैर्यानें ती म्हणाली, " बायांनो, आतां रडणें बंद करा. माझ्या सुनेची पाठवणी थोड्या वेळांत झाली पाहिजे. राम, सीतेचे विचार थोर साध्वीच्या विचारासहि मागें टाकणारे आहेत. तूं तिला वनवासास घेऊन जा आणि चौदा वर्षांचा काळ दु:खांत, आनंदांत, कष्टांत कंठून तुम्ही सुखी व्हा. मला माझ्या मुलीची पाठवणी करण्याकरितां फार थोडा वेळ आहे."

" मातोश्री " रामचंद्र म्हणाला, " माझ्या प्रेमळ आई, तुझी आज्ञा मला शिरसावंद्य आहे. देवी, तुला वनवासास येण्याची मोकळीक आहे. मी बाबांचा निरोप घेतों. तोंपर्यंत तुम्ही तिकडेच या " असें म्हणून त्या मातृभक्त पुत्रानें आपल्या आईचे पाय धरले. त्याच्या नेत्रांत अश्रु उत्पन्न झाले. दोन अश्रुबिंदू आपल्या पायांवर पडले, असा कौसल्येस भास झाला. तेव्हां तो म्हणाला,

" आई, तुझा मी प्रेमळ राम ! "

रामचंद्र गडबडीनें तेथून क्षणार्धांत निघून गेला. सुनेची पाठवणी करण्याकरितां सीतेसह कौसल्यादेवी निघून गेली.

महिषि कौसल्यादेवीचा विलाप एकाएकीं कसा संपला, याचें जमलेल्या स्त्रियांस परमाश्चर्य वाटलें.

# १३

काळ्याकुट्ट ढगांनीं ज्याप्रमाणें सहस्त्ररश्मीचीं चंडकिरणें आच्छादून टाकावीं किंवा डोंगराच्या कृष्ण शिखरांनीं ज्याप्रमाणें नयनरम्य अशा सरोवरास दृष्टिआड करावें त्याप्रमाणें चौदा वर्षाच्या वनवासानें रामचंद्राची प्रातःस्मरणीय जनसेवा, विशाल कर्तबगारी आणि अफाट पराक्रम यांना आच्छादून टाकलें होतें. या वनवासकालांतच रामाचें रामायण बनलें. या दीर्घ वनवासकाळास अनुलक्षून प्रतिभाशाली वाल्मिकींनीं अजरामर अशा राष्ट्रीय काव्याची रचना केली आणि तुलसीदासांनी आपलें सुरेल तुलसीरामायण रचलें. अनेक राक्षसांचा संहार या वनवासकालांतच झाला आणि विंध्याचलाच्या दक्षिणेकडील दण्डकारण्याकडे झुकणाऱ्या ऋषिमुनींचीं आश्रमस्थानें निर्भय झालीं. सुंदर आर्यललनांच्या पातिव्रत्यावर पडणारे राक्षसांचे घाले या रामाच्या वनवासकाळांतच बंद झाले आणि विंध्याचलाच्या उत्तरेकडे राक्षसांचें एकहि विमान तेव्हांपासून पुन्हा फिरकलें नाहीं. याच महत्वपूर्ण चौदा वर्षांत रावणवधाचें जगद्वंद्य कार्य रामाच्या हातून तडीस गेलें; आणि अखिल मानवजात निर्भय झाली. रामाच्या प्रखर जनसेवेस, अतुल पराक्रमास आणि अवर्णनीय कर्तव्यतत्परतेस ज्या कालीं प्रचड उठाव मिळाला, तो त्याचा चौदा वर्षाचा वनवासकाळ होय. रामचंद्राच्या जीवनातील हें सत्य अयोध्येच्या नागरिकांना माहीत असतें तर वनवासाचा आजचा प्रारंभाचा दिन त्यांनीं सणाप्रमाणें घालविला असता आणि अत्यंत हर्षभरित होऊन रामचंद्रावरून सुवर्णमुद्रिका उधळीत त्यानीं रामचंद्रास प्रेमाचा निरोप दिला असता; पण पहा ! ‘ रामचंद्र वनवासास जाणार ! ’ ही बातमी विद्युत् वेगानें नागरिकांना अल्पकाळांत समजली आणि ते दुःखानें छाती पिटीत जमावानें राजवाड्याकडे येऊं लागले. खुद्द राजा दशरथ, त्याचे अष्ट प्रधान आणि राजवाड्यांतील याच्चयावत् सेवक या सर्वांचें चेहरे निस्तेज बनले होते.

राजपुत्र लक्ष्मण याची रामचंद्रावर अतुल भक्ति अर्थात् अवर्णनीय प्रेम होतें. रामचंद्राला चौदा वर्षांच्या वनवासाची आज्ञा झाली ही बातमी ऐकतांच लक्ष्मण तीराच्या वेगानें धांवत दशरथ बसला होता त्या महालांत आला. तेथें राजा दशरथ यास गराडा घालून अष्टप्रधान किंकर्तव्यमूढावस्थेंत बसले होते. राजा दशरथ गुडघ्यांत मान घालून शोकदग्ध अवस्थेंत बसला होता. राणी कैकेयीदेवी ही मुळींच खुषो नव्हती. तिचा चेहेराहि निस्तेज दिसत होता.

" सुमंत ! " लक्ष्मणानें प्रश्न केला, " रामचंद्रास चौदा वर्षांच्या वनवासाची कठोर आज्ञा झाली आहे काय ? "

" होय. " सुमंतानें उत्तर दिलें,

" ही आज्ञा तुमच्या या येथें बसलेल्या राजानें दिली काय ? " पुन: लक्ष्मण म्हणाला.

त्यालाहि ' होय ' असेंच उत्तर मिळालें.

" असली कठोर आज्ञा प्रिय पुत्राकरतां कां फर्माविली ? रामचंद्राच्या हातून कांहीं अपराध घडला असें म्हणण्याचें धाडस कोणाचें आहे ? "

" अपराध म्हणून नव्हे तर माझ्या वचनाचा प्रतिपाल करण्यास रामचंद्रास वनवासास जावें लागत आहे. दैवाचा दुर्देवी घाला, लक्ष्मणा ! आपणांवर पडला. " दशरथ मध्येंच उद्गारला.

त्यानंतर प्रधान सुमंतानीं वरप्रदानाची सर्व हकीकत लक्ष्मणाच्या कानीं घातली आणि म्हटलें,

" कैकेयीदेवींनी पहिल्या वरानें भरतास राज्य आणि दुसऱ्या वरानें रामास वनवास, अशी मागणी दशरथाकडे केली. राजा वचनबद्ध झाला. त्याचा निरुपाय झाला आणि आपल्या हातून वचनभंग होऊं नये म्हणून त्यानें ही आज्ञा निरुपायानें रामचंद्रास दिली. "

" तुम्ही अष्ट प्रधान म्हणजे नागरिकांचे नोकर. नागरिकांच्या करवसूलींतून तुमचा तनखा देण्यांत येतो. तुम्ही नागरिकांच्या पैशावर पोसलेले असून राजाची आज्ञा कितपत ग्राह्य आहे याचा स्वतंत्र विचार कधीं केला आहे काय ? राजा दशरथ वृद्ध झालेला आहे. तो अत्यंत स्त्रीलंपट आहे. अशा राजानें दिलेले हुकूम मानावयाचे

किंवा नाहीं याचा विचार तुम्हीं केला पाहिजे. राजाची बुद्धि स्थिर नाहीं. राजा बुद्धिभ्रष्ट झालेला आहे. आपल्याच लाडक्या मुलास असली अमानुष शिक्षा देणारा बाप एक बुद्धिभ्रष्ट तरी झाला असला पाहिजे अथवा फाजील स्त्रीमोहांत सांपडून विवेकशून्य तरी बनला असला पाहिजे. बुद्धिभ्रष्ट राजाचे हुकूम कोणताहि प्रधान अमलांत आणणार नाहीं. विवेकशून्य राजाच्या आज्ञा प्रधानमंडळानें धाब्यावर बसवाव्यात, हा उचित मार्ग होय. तुम्ही रामचंद्रास प्रधान मंडळी हो ! प्रेमाचा सल्ला द्या. रामचंद्रानें वनवासास जाऊं नये असा निग्रह धरा. अशा अविवेकी राजास पदच्युत करण्याची व्यवस्था मी करतों. नंतर रामचंद्र युवराज व राजा बनेल. ज्यांला देहांत शिक्षा झाली असा अपराधी मनुष्यहि देहांत शासनाच्या ऐवजीं असला चौदा वर्षाचा वनवास स्वीकारणार नाहीं. देहांत शासनानें मरण एकदांच येईल. पण चौदा वर्षेपर्यंत नरकाची यातना भोगून खितपून मरणें, परमावधीच्या त्रासाचें आहे. ज्या जिभेनें ही आज्ञा फर्माविली ती जिव्हा वाघाची का सर्पाची हें तुम्ही ठरवा. ”

“ लक्ष्मणा ! तूं फार संतापलेला आहेस. कधींहि घडला नाहीं असा अभिनय तुझ्या हातून घडत आहे. मी स्त्रीलंपट असलों तरी बुद्धिभ्रष्ट झालों नाहीं आणि अविवेकीहि खास नाहीं. वरांची पूर्तता करण्याची कैकयीनें मागणी केली. मी वचनबद्ध झालों.

“ माझ्या वचनाचा प्रतिपाळ करण्याचें रामाच्या स्वाधीनचें आहे. मला पदच्युत करण्याइतका मी अप्रिय झालों असेन तर नागरिकांनीं तशी इच्छा बोलून दाखवावी. ” राजा दशरथ बोलला.

“ वनवासासारख्या कठोर शिक्षा वरप्रदान म्हणून फर्मावल्या जातात हें कठोर बुद्धिभ्रंशाचें लक्षण नव्हे काय ? परमेश्वर जेव्हां वरप्रदान करतो तेव्हां भक्ताची एखादी सदिच्छा तो परिपूर्ण करतो. संपत्ति, राज्य, पुत्र-प्राप्ति वगैरेंचे वर भक्त मागतात व परमेश्वर देतो. यावरून वर मागणें म्हणजे शुभ गोष्ट मागणें असा अर्थ ध्वनित होतो. परमेश्वरा ! तूं अमक्याचा डोळा फोड, तूं अमक्यास संकटांत घाल, अमक्याची प्राणाहुती घे, असले वर कोणाहि भक्तानें मागितले नाहींत व मागितले तरी देव ते पुरे करणार नाहीं. याकरितां

भरतास युवराजपद मिळावें अशी वर म्हणून मागणी करणें योग्य होईल. परंतु मातोश्रीची दुसरी मागणी अत्यंत अविवेकपूर्ण व मूर्खपणाची आहे. अशी मागणी मागणें वर या सदरांत येणार नाहीं आणि अशी मागणी न दिली तर वचनभंग घडणार नाहीं. वनवासाची मागणी वर म्हणून करणें हा मातोश्रीचा जसा अविवेक, तसा वनवासाची मागणी पुरी करणें हा देणाऱ्याचा अविवेक! राजास मागितलेला दुसरा वर जितका अविचाराचा आहे तितका तो देणेंही शुद्ध वेडेपणाचें आहे. म्हणून प्रधान हो ! मी सांगतों, राजाचा वचनभंग ही भ्रामक कल्पना आहे. जेथें वचनासच ठिकाणा नाहीं तेथें वचनभंग कोठून होणार ? राजानें वचनभंगाची कल्पना मुळींच करूं नये; आपली आज्ञा दुरुस्त करावी आणि रामचंद्रास अयोध्येंत राहूं द्यावें. "

"तें माझ्याडून कदापिहि होऊं शकणार नाहीं. मी राणी कैकयीस पूर्ण शुद्धीवर असतांना वचन दिलें आहे. आम्ही रघुकुलवंशी राजे प्राण देऊं. पण वचनाचा भंग करणार नाहीं." राजा म्हणाला.

"आई !" लक्ष्मण कैकेयीकडे वळून म्हणाला, "तुझ्या मनास तरी कांहीं पाझर फुटूं दे. वनवासाचा क्रूर वर परत घे आणि आपल्या घराण्यावरची आपत्ति नाहींशी कर. तुझ्या दुराग्रहानें रामचंद्र तर वनवास भोगेलच; पण हा वृद्ध राजा 'राम' 'राम' म्हणून विरहानें मरेल.अशा रीतीनें नवऱ्याची हत्या व पुत्राची हत्या असें दुहेरी पातक तूं करूं नकोस. बोल आई, तूं आपला वर परत घेतेस ना ? "

"मीं मागणी दोन वरांची केली आहे आणि ती पुरी करतों असें राजानें मला अभिवचन दिलें आहे." कैकयी म्हणाली.

"तूं आई नव्हेस, कृत्या आहेस !" लक्ष्मण संतापानें म्हणाला. "भरतास राज्य मागितलें हा तुझा भयंकर स्वार्थच ! पण त्याच्याहि पलीकडे जाऊन तूं दुष्टपणाची परमावधि गाठतेस. रामासारख्या सत्त्वशील पुरुषास वनवास देण्यास कैकयी तयार झाली. हा सावत्र-पणाचा, मत्सराचा कळस कैकयीनें गांठला, अशी आई, तुझी निंदा होईल." असें लक्ष्मण बोलत आहे तोंच रामचंद्र तेथें प्रविष्ट झाला. त्यानें लक्ष्मणाचें भाषण ऐकलें होतें. तो म्हणाला,

" बा लक्ष्मणा, अशीं दुर्वचनें बोलण्याकरितां का तूं येथें आलास ? मातोश्री कैकयी देवीस एकहि अपशब्द बोलूं नकोस. तिचें माझ्यावर पूर्ववत् प्रेम आहे. कैकयीनें मला वनवासांत पाठविण्यांत सावत्रपणा केला असें मी तरी म्हणणार नाहीं. कोणता तरी सद्हेतु मनांत धरून आईनें तो वर मागितला असावा. "

" रामचंद्रा, तुझ्या सात्त्विकपणाची कमाल झाली. उघडउघड दुष्टावा तुझ्याविरुद्ध चालला असतां तूं भोळेपणानें स्वस्थ बसतोस ?" लक्ष्मण म्हणाला.

" बाबा " तो पुनः दशरथाकडे वळून म्हणाला, " परमेश्वरच रामाचें रूप घेऊन आपल्या सूर्यवंशांत अवतरला आहे. अशा थोर पुरुषास वनवासांत पाठविल्यास राजा दशरथ याचें यश मलीन होईल. बाबा, तुमची चोहोंमुलखी निंदा होईल. राणी कैकयीदेवीचा वर म्हणजे विषाचा काठोकांठ भरलेला प्याला. तो ग्रहण कराल तर 'राम राम' म्हणून प्राणाला मुकाल. तो लवंडून द्याल तर मुत्सद्दी दशरथ म्हणून नावलौकिकास चढाल. प्याल्यांतील विषाची खात्री पटल्यानंतरहि तो लवंडून देत नाहीं आणि आपल्या घराण्यावर येऊं पाहणारी आपत्ति नष्ट करीत नाहीं. म्हणा, रामाचा वनवासाचा वर मूर्खपणाचा आहे. तो राजा दशरथ यास कबूल नाहीं. "

त्यावर दशरथ म्हणाला,

" वर कसलाहि असो, तो पुरा करण्याचें अभिवचन मीं दिलें आहे. राजा दशरथ आपल्या प्राणापेक्षां प्रिय पुत्रांस मुकेल, अखेर आपल्या प्राणाची आहुति देईल. पण वचनभंग करणार नाहीं. रामा, तुला माझी आज्ञा आहे. राणी कैकेयीदेवीचा दुसरा वर पुरा झाला पाहिजे. तुला वनवासाला गेलेंच पाहिजे. "

तेव्हां लक्ष्मण अत्यंत संतप्त होऊन म्हणाला, " जेथें अविचाराचा गाढ अंधःकार, तेथें ज्ञानाचा शिरकाव कसा होणार ? अप्रबुद्ध राजा ! तुझें मंत्रिमंडळ तुझी आज्ञा मूर्खपणाची ठरवतील. सुमंत, बोला, आपल्या सहकारी मित्रांचा पूर्ण विचार घेऊन बोला. हा आत्मघातकी राजा आपल्या पुत्राच्या सुखावर स्त्रीमोहानें निखारे ठेवत आहे. त्याची वनवासाची आज्ञा पूर्ण अन्यायाची आहे असें

तुम्ही त्यांस बजावा. सुमंत, स्वस्थ कां बसतां ? अशा आणीबाणीच्या प्रसंगीं तोंड उघडलें पाहिजे. "

" राजपुत्र, राजाची आज्ञा वैयक्तिक आहे. ती त्यानें राजा म्हणून दिली नाहीं. पित्याची आज्ञा पुत्रास झाली आहे. अशा वैयक्तिक बाबतींत राजास आमचा सल्ला देण्याचा अधिकार नाहीं."

त्यावर लक्ष्मण म्हणाला, " राजा अविचारी बनला, विवेकभ्रष्ट झाला आणि त्याचे मंत्री कोणताहि सल्ला त्यास देण्यास नाराज झाले, तर बाहेर उभारलेल्या नागरिकांची मला मदत घ्यावी लागेल. त्यांच्या मदतीनें राजास पदच्युत करण्याशिवाय अन्य उपाय मला राहिला नाहीं. "

" थांब, लक्ष्मणा, थांब ! " रामचंद्र आवेशानें म्हणाला, " कोणतीहि अविचाराची गोष्ट तूं करूं नकोस. राजा दशरथ इतका लोकप्रिय आहे कीं त्याच्याविरुद्ध ब्रहि बोलण्यास कोणी नागरिक उभा राहणार नाहीं. मग पदच्युत करण्याची गोष्ट दूर राहिली. माझ्या वनवासाबद्दल नागरिक दुःखी झाले असतील; परंतु हा राजाचा हुकूम आहे असें त्यांना कळतांच मुकाट्यानें ते निघून जातील.

"बाबाचा वचनभंग व्हावा अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. मी चौदा वर्षांचा वनवासकाळ आनंदानें पत्करला आहे. ही पहा सीतादेवी आली. आम्हा उभयताचा वनवासाचा जाण्याचा निर्धार आहे. "

" या नाजूक राजपुत्रीनें वनवासास जावें अशी मागणी मीं मागितली नाहीं." कैकेयी म्हणाली. परंतु कौसल्या देवी पुढें येऊन म्हणाली, " सीतेस तिचा सतिधर्म उत्तम रीतीनें चालवितां यावा म्हणून मी तिला रामचंद्राबरोबर राहण्याची परवानगी दिली आहे. नवऱ्याव्यतिरिक्त राजवाड्यांतील सुखांत ती राहण्यास तयार नाहीं. राजवाड्यांतील आपलें जिणें वनवासाइतकें तिला तापदायक वाटतें. पण रामचंद्राच्या सहवासांत जाणारा वनवासांतील प्रत्येक क्षण तिला स्वर्गसुखाचा वाटतो. "

" काय ही विधिघटना ! ! ! " राजा कपाळावर हात मारून म्हणाला, " रामचंद्राबरोबर सीतादेवीहि वनवासास निघावी ! ! "

" बाबा !" लक्ष्मण मध्येंच म्हणाला, " रामचंद्र आणि सीतादेवी यांचा वनवासास जाण्याचा निर्धार झाला आहे. तुमची त्यांना संमतीहि मिळाली आहे. परंतु माझी अशी प्रतिज्ञा आहे कीं सीतादेवी आणि रामचंद्र यांच्या चौदा वर्षांच्या वनवासकाळांत त्यांचा सेवक म्हणून मी अखंड त्यांच्या समीप राहीन. रामाप्रमाणें ऋषिमुनींचा वेष मी धारण करीन आणि तपस्व्याचें जीवन मी कंठीन. सीतादेवीचें संरक्षण हें माझें वनवासांतील श्रेष्ठ कर्तव्य होईल. हा माझा निर्धार रामचंद्राइतका कायम आहे. कोणीहि यांत बदल करूं शकणार नाहीं."

"बा लक्ष्मणा, तूं निष्कारण आपला देहदण्ड कां करून घेतोस? मैथिलीचें संरक्षण करण्यास मी समर्थ आहें. तूं वनवासाला येण्याचा निष्कारण हट्ट धरूं नकोस."

" जेथें रामसीतेचें वास्तव्य त्या ठिकाणीं धनुष्य बाण घेऊन लक्ष्मण अहर्निश उभा राहील."

लक्ष्मणाचा निर्धार ऐकून रामास निरुपायानें होकार द्यावा लागला. तो लक्ष्मणास म्हणाला,

" लक्ष्मणा, तूं मातेस, बाबास आणि जमलेल्या मंत्रीमंडळास निष्कारण अपशब्द बोललास. त्यांची माफी माग. कैकयीमातेच्या पाया पड. ' चुकलों ' असें बाबांस कबूल कर; शांत हो, स्थिर हो. ऋषिजीवन क्रोधवश होणाऱ्या मनुष्यास मिळत नसतें. ऋषिजीवनास उचित अशी शांत वृत्ति तुझी असली पाहिजे."

लक्ष्मणाचा क्षोभ खर्रकन् उतरला. त्यानें कैकयी देवीचे ' चुकलों ' म्हणून पाय धरले आणि राजाची क्षमा मागितली. हें रामचंद्राच्या जीवनांतील नाटय इतकें हृदयस्पर्शी होतें कीं तेथें जमलेले सर्व डोळे दुःखाश्रूंनीं भरून आले. ' हा राम !' ' हा सीते !' ' हा लक्ष्मणा !' असा आवाज काढून दशरथ रडूं लागला. सूर्योदयास अगदीं थोडा अवकाश राहिला होता. रामानें गडबडीनें सर्वांचा निरोप घेतला. तेव्हां शोक आवरून दशरथ म्हणाला,

" रामा, सीते, लक्ष्मणा, तुम्ही सर्व माझ्याजवळ या. मला डोळे भरून पाहूं द्या. तुमचें दर्शन मला पुन्हा होणार नाहीं."

तिघेहि दशरथासमीप गेले. त्यांनीं दशरथास अभिवादन केलें. ' बाबा, येतों ' असा रामाचा आवाज दशरथाच्या कानीं पडला. भ्रमिष्ट मुद्रेनें राजा दशरथ त्या तिघांकडे अनिमिष लोचनांनीं पाहत राहिला. कांहीं वेळानें पुढें धनुर्धारी राम, मागें सीता व तिच्यामागें लक्ष्मण अशी ती त्रयी तेथून निघून गेली. तेव्हा ' हा राम ' ' हा सीते ' ' हा लक्ष्मण ' असा हुंबरडा फोडून राजा दशरथ बेशुद्ध जमीनीवर पडला. त्या वेळीं कैकयीच्या मनांत अनेक परस्परविरुद्ध भावना जागृत झाल्या होत्या. पण भरतास राज्य मिळणार याबद्दल होणारा आनंदाचा लवलेशहि तिच्या मनांत नव्हता.

वनवासी रामचंद्र, सीता आणि लक्ष्मण यासह राजवाड्यांतून बाहेर पडला, तेव्हां अयोध्या नगरींत मोठा हाहा:कार उडाला. अयोध्येच्या नागरिकांचा राम हा जीव कीं प्राण होता. रामचंद्र युवराज होणार याबद्दल त्यांचें मन पराकाष्ठेच्या आनंदानें भरून गेलें होतें. त्या आनंदाची जागा आतां दु:खानें व्याप्त झाली. रामचंद्राच्या गुणांची आठवण करीत, राणी कैकयीस शिव्याशाप देत दशरथाची स्त्रैण म्हणून निंदा करीत, अयोध्येचे सहस्त्रावधि नागरिक रामचंद्रास निरोप देण्यास त्याच्यामागे वेड्याप्रमाणें धांवत होते. मुख्य प्रधान सुमंत आणि त्याचे सहकारी मित्र असे दशरथाचे अष्टप्रधान रामास अखेरचा निरोप देण्यास त्याच्या मागोमाग चालले होते. हें करुणामय दृश्य शरयू नदीच्या तीरापर्यंत येऊन स्थगित झालें. रामचंद्रानें दोन्ही हात जोडून नागरिकास पुढें न येण्याची विनंती केली. तो हात जोडून म्हणाला,

" सुमंत आणि इतर नागरिक जनहो ! माझ्याबरोबर तुम्ही कोठपर्यंत येणार ? पाण्याचा प्रवाह ही शास्त्रोक्त मर्यादा तुम्हांस परतण्याचा इषारा देत आहे. तुम्हांस यापुढें येतां येणार नाहीं. तुम्ही येथूनच परत फिरावें अशी माझी आग्रहाची विनंती आहे. तुमचा दीर्घ काळाकरितां निरोप घेतांना मला एक विनंती करावयाची आहे. सुमंत, तुम्ही मातुलगृहाहून भरतास ताबडतोब परत आणून घ्या व शक्य तितक्या लवकर त्यास युवराजपदावर आरूढ करा. या योगानें मातोश्री कैकयीस समाधान वाटेल आणि माझा

विरह बाबास सौम्य वाटेल. परमेश्वर करो आणि बाबांचें समाधान त्यांना सत्वर परत मिळो! मातोश्री कैकेयी देवीस भरत कठोर शब्दांनीं ताडन करील. तिला कोणीहि कटुशब्द बोलून दुखवूं नये, अशी माझी शेवटली विनंती आहे. प्रमुख नागरिकहो! तुम्ही माझ्यावर प्रेम करीत आला त्याप्रमाणें भरतावरहि प्रेम करा. मी तुमचा युवराज बनणार होतों, तो वैभवाकरितां नव्हे, स्तुतीच्या लालसेनें नव्हे, धनाच्या लालसेनें नव्हे, अधिकार गाजविण्याच्या हेतुनें नव्हे, तर तुमची सेवा करण्यास मिळावी म्हणून मी युवराज बनणार होतों. त्या सेवेस मी आतां मुकणार हेंच माझ्या वनवासांतील प्रमुख दुःख मी मानेन. परंतु तुमचा माझ्यावरील लोभ कायम ठेवा. चौदा वर्षानंतर तुमची सेवा करण्यास अधिक लायक असे आम्ही बनून येतों. तो पहा! सूर्य आतां डोकावूं लागला. या आतां, नमस्ते!" असें म्हणून रामचंद्रानें सर्वास अभिवादन केलें आणि ते तिघे वनवासी शरयूपार होण्याकरितां नौकेवर चढले. सर्व नागरिक आणि अष्टप्रधान यांनीं रामाचें अभिवादन अत्यंत सन्मानानें स्वीकारलें आणि नौका शरयूपार होईपर्यंत ते तेथेंच उभे राहिले. शरयूपार झाल्यानंतर रामानें पुन्हा नागरिकाकडे पाहिलें, हात जोडून पुन्हा अभिवादन केलें व हातानें त्यांना जाण्याची खूण केली. रामचंद्रानें पुन्हा अयोध्येकडे पाहिलें नाहीं. सूर्य क्षितिजावर येऊन नुकताच स्थिर झाला होता. त्या आपल्या पूर्वजास आदरानें नमस्कार करून राम, सीता आणि लक्ष्मण हे नौकेंतून उतरले. शरयूतीरीं स्नान करावें अशी रामाची इच्छा होती. ती रामाची इच्छा परिपूर्ण झाली. राम आणि लक्ष्मण यांनी स्नानें उरकून घेतलीं. त्यांना बदलण्याकरतां काय द्यावें असा सीतादेवी विचार करीत होती. तोच प्रफुल्लकुमार हातांत कांहींसें गाठोड घेऊन तेथें धांवत आला आणि म्हणाला,

"रामचंद्र आणि लक्ष्मण यांच्याकरतां ही मंगलकारक भेट ब्रह्मर्षि विश्वामित्रानें दिली आहे." असें म्हणून दोन काषाय वस्त्रें अर्थात् वल्कलें रामचंद्राच्या स्वाधीन केलीं. ब्रह्मर्षि विश्वामित्राची ही प्रसंगास अनुरूप अशी भेट पाहून रामचंद्रास आश्चर्य वाटलें. त्यानें

ब्रह्मर्षींच्या अफाट ज्ञानाची स्तुति केली आणि त्या वल्कलांचा स्वीकार त्यांनीं अत्यंत आदरानें केला. तेव्हां रामचंद्र म्हणाला,

"आज युवराजदिन होता. बहुमूल्य वस्त्रालंकारांनीं सुशोभित होण्याचा योग होता. आज वनवासी स्वयंसेवक बनणार आणि तन्निमित्त अशा वस्त्रांची जरूर भासणार. हें माझें भविष्य ब्रह्मर्षींनीं आपल्या अगाध ज्ञानानें तंतोतंत वाचलें. प्रफुल्ल, ब्रह्मर्षींची अजून काय इच्छा आहे ? "

त्यावर प्रफुल्लकुमार म्हणाला,

" तुम्हीं वनवासांतील पहिला मोठा मुक्काम सिद्धाश्रमांत करावा अशी आचार्यांची इच्छा आहे.

"तुम्हांस मार्ग दाखविण्यास मी तुमच्या बरोबरच राहणार आहें."

" जशी आचार्यांची इच्छा. " रामचंद्र म्हणाला.

बरोबर सूर्योदयास रामचंद्राच्या वनवासास सुरवात झाली. तो दिवस अयोध्येच्या नागरिकांनीं अत्यंत दुःखांत काढला. परंतु एकाच व्यक्तीस आजच्या यशप्राप्तीबद्दल अपरिमित आनंद होता.

ती व्यक्ती कोण ?

राणी कैकेयीदेवी ? खास नव्हे. ती आपल्या खोलीचें दार बंद करून रडत बसली होती. मग ती व्यक्ति कोण ? रामचंद्राच्या वनवासाचे सूत्रचालक ब्रह्मर्षि विश्वामित्र तर नव्हेत ?

●

# १४

ब्रह्मर्षि विश्वामित्र यांचा उत्साह मोठा, कर्तृत्वशक्ति अफाट आणि निर्णायक शक्ति विशाल अशी होती. तथापि ते विचारांच्या भोवऱ्यांत सांपडून कधींहि चिंतामग्न दिसले नाहींत. ते नेहमीं प्रसन्नवदन दिसत. परंतु ते अयोध्येहून परत आल्यापासून त्यांचा उत्साह आणि आनंद अपरिमित वाढला होता. त्यांचें प्रसन्नवदन अधिक उत्साही दिसूं लागलें आणि त्यांच्या तेजस्वी मुद्रेंत नूतन तेज चमकूं लागलें. त्यांचा आनंद परमोच्च कोटीस गेला होता. त्यांच्या कर्तबगार आयुष्यात असा आनंदाचा उपभोग त्यांनीं कधींहि घेतला नव्हता. स्वर्गीय अप्सरा मेनका अत्यंत मनमोहक आणि रमणीय! तिची प्राप्ति झाली तेव्हांहि आजच्यासारखा आनंद त्यांना झाला नव्हता ! अनेक वर्षांच्या कष्टप्रद तपश्चर्येनंतर त्यांनीं अत्यंत पराक्रमानें ब्रह्मर्षिपद मिळविलें. पण तेव्हांचाहि आनंद आजच्या आनंदापुढें फिक्का होता. रामचंद्र अयोध्येचा युवराज होणार, ही घटना रावण-वधाच्या दृष्टीनें त्यांना प्रतिबंधक वाटली. राजा दशरथाच्या प्रेमाच्या तावडींतून रामचंद्रास सोडवून आणणें आणि कार्यप्रवृत्त करणें ही अगदीं दुःसाध्य गोष्ट. प्रयत्नांस अवकाशहि फारसा नव्हता. तथापि आपल्या बलवान् कर्तबगारीच्या शक्तीवर राजा दशरथानें आंखलेली घटना आपण सर्वस्वी बदलून टाकली आणि जागतिक कार्याकरितां रामचंद्रास कार्यप्रवण केलें. या अतुल यशाबद्दल बह्मर्षि विश्वामित्रास महनीय आनंद झाला होता. रामचद्र आतां एकटया अयोध्येचा राहिला नाहीं. तो सर्व जगाचा झाला.

चौदा वर्षांचा वनवास-काल रावणवधाच्या योजना ठरविण्यास आणि त्या योजना यशस्वी करण्यास पुरेसा काळ आहे आणि या काळांत रामचंद्रावर कसल्याहि प्रकारची अन्य जबाबदारी नसल्यामुळें रावणवधाकडे त्यास आपलें मन व पराक्रम केंद्रिभूत करतां येतील, असें वाटून विश्वामित्रास आपल्या स्वीकृत कार्याचा प्रारंभ

तर उत्तम झालाच; एकटच्या अयोध्येच्या युवराजपदांतून रामास मोकळें करण्यास कैकयीच्या दुसऱ्या वराची अमोल भर पडली आणि युवराजपदांतून मोकळा झालेला रामचंद्र अयोध्येस राहणार नाहीं. तर विंध्याद्रीच्या दक्षिणेस दण्डकारण्यांतून आपलीं चौदा वर्षें व्यतीत करणार आहे. हा काळ राक्षसांच्या तावडींतून ऋषीमुनींना मुक्त करण्यांत अर्थात त्यांना निष्काळजी बनविण्यांत घालविला जाईल. त्यामुळें अनेक राक्षसांचा वध होईल. अर्थात रावणाशीं कलह जुंपण्यास हें कारण पुरेसें होईल. कलहाचें रूपांतर युद्धांत होईल आणि एकबाणी रामचंद्र त्या महाबलाढ्य रावणाचा निस्संदेह वध करील अशी विचारपरंपरा विश्वामित्राच्या मनानें योजून ठेवली होती. त्यामुळें रावणवधाच्या आपल्या स्वीकृत कार्यांत त्याला यश दिसूं लागलें होतें. त्याचा आनंद परमावधीस जाण्याचें हें बलवत्तर कारण होतें.

सूर्य नुकताच पूर्वदिग्भागीं लाल गुलाल फेकित आला होता. गंगेच्या संथ प्रवाहावरून येणारा थंडगार वारा मनास आल्हादित करीत होता. आश्रमांतील विद्यार्थ्यांचें सुरेल प्रातःस्मरण मनास प्रसन्न करीत होतें. अशा वेळीं विश्वामित्र सिद्धाश्रमाच्या प्रवेशद्वाराजवळ प्रसन्नवदनानें कोणाची तरी मार्गप्रतीक्षा करीत होते. सिद्धाश्रमांत येण्याकरितां बऱ्याच पाहुण्यांना आमंत्रणें दिलीं होतीं. काशीचा राजा अरिदमन आणि उत्तर कुरुप्रांताचा राजा शत्रुंजय यांना बोलावण्यांत आलें होतें. परंतु त्यांना येण्यास अद्याप दोन दिवसांचा अवधी होता. चित्रकूट पर्वतावर वास करणारे ऋषि आणि दंडकारण्याच्या तोंडाशीं वस्ती करणारे धाडशी ऋषि यांना बोलावण्याकरितां हेर गेले होते. परंतु त्यांनाहि येण्यास अवधी होता. मग विश्वामित्र कोणाची मार्गप्रतीक्षा करीत होते ? त्यांच्या मनांत ‘ राम ’ भरला होता. त्यांच्या विचारांत रामानें ठाणें दिलें होतें. त्यांच्या नयनांत रामचंद्राशिवाय कांहीं दिसत नव्हतें. अखंड ‘ माझा राम, माझा राम ’ असें जप करणारे त्यांचें मन रामचंद्र केव्हां येतो हें पाहण्यास अत्यंत आतुर झालें होतें. नदीच्या परतीरापर्यंत बारीक दृष्टीनें न्याहाळावें, नदींत होडी तरंगत आहे काय याचा कानोसा

घ्यावा व अद्याप कोणीहि दिसत नाहीं असें वाटून त्यांच्या आतुरतेंत भर पडावी असें त्यांचें चाललें होतें.

इतक्यांत एक व्यक्ति आपल्याजवळ उभी राहून आपल्याकडे आश्चर्यानें अवलोकन करीत आहे असें त्यांना दिसलें. त्यांच्या मनानें ठाम केलेला, त्यांच्या विचारानें धारण केलेला ' राम ' आला आहे असें त्यांच्या नेत्रांनीं ठरविलें.

" कोण, राम ?" असा त्यांनीं प्रश्न केला.

" नाहीं; मी नारद आहें. "

आतां रामचंद्राच्या तंद्रींतून विश्वामित्राचें मन जागें झालें आणि देवर्षि नारदमुनि आपल्या जवळ उभे आहेत असें त्यांनीं पाहिलें.

" देवर्षि ! अविनयाची माफी व्हावी. तुम्हांला मी किती काळ तिष्ठत ठेविलें ? " विश्वामित्र म्हणाले.

" ब्रह्मर्षे ! यांत अविनय कसला ? " नारदमुनि म्हणाले, " आमचें आगमन आकाशमार्गानें होतें. प्रत्यक्ष प्रकट होईपर्यंत आम्ही कोणास दिसत नाहीं. मी आतांच आलों. "

" देवर्षि ! " विश्वामित्र म्हणाले, " आपण आज कोठून निघाला ? "

" ब्रह्मर्षे ! " नारदमुनि म्हणाले, " तुम्हाला भेटण्याचा आज मी तीन दिवस प्रयत्न करीत आहें. "

" आणि मीहि तीन दिवस तुमची भेट व्हावी अशी इच्छा धरून आहे. " विश्वामित्र म्हणाले, " परंतु आम्ही आपणांस कोठें आमंत्रण पाठवावयाचें ? जगभर विहार करणारे आपण. आपलें एकहि स्थान निश्चित नाहीं. "

" अशा प्रसंगीं " नारदमुनी म्हणाले, " माझ्या भेटीची इच्छा आपण धारण केली म्हणजे आम्हांस आमंत्रण पोहोचलें. तीन दिवसांपूर्वीच तुम्ही तशी इच्छा धारण केलीत त्याप्रमाणें मी येथें येण्यासहि तयार झालों. परंतु देवकार्यामुळें मला येण्यास विलंब झाला. . . . .

" ब्रह्मर्षे ! आपल्या कार्याच्या दृष्टीनें महत्वाची अशी घटना नुकतीच घडून आली आहे. ती सत्वर आपणास समजावी म्हणून मी येणार होतों...."

विश्वामित्रांनीं प्रश्नसूचक मुद्रा करून पृच्छा केली. तेव्हां नारदमुनी पुन: म्हणाले,

" अयोध्येचा राजा दशरथ यानें रामचंद्राचा विरह होऊं नये म्हणून त्यास अयोध्येचें युवराजपद देण्याचा बेत केला. समारंभाचें प्रसिद्धीकरण फारसें होऊं दिलें नाहीं. तुम्हांसहि या समारंभाप्रीत्यर्थ बोलविलें नसेलच ! "

विश्वामित्रानें नकारदर्शक मान हलविली तेव्हां नारदमुनि पुन: म्हणाले,

" समारंभांत कसल्याहि प्रकारचें विघ्न येऊं नये म्हणून दशरथानें अत्यंत चातुर्यानें कित्येक आमंत्रणें टाळलीं. परंतु आम्ही समारंभाचे आदले दिवशीं अयोध्येस जाऊन दाखल झालों. तेथें वशिष्ठ महामुनीकडे आमचा मुक्काम होता. अष्टमीचे दिवशीं मध्यरात्रीपर्यंत युवराजमहोत्सवाची तयारी जोरानें चालू होती. आणखी तीन प्रहरानें रामास युवराजपदाची प्राप्ति होणार. मी आणि वशिष्ठमहामुनी यांनीं रामचंद्रास युवराजपदप्राप्ति होत आहे ही घटना आपल्या रावणवधाच्या कार्याच्या दृष्टीनें प्रतिकूल आहे असें ठरविलें ! रामचंद्र अयोध्येचा युवराज होणार; अयोध्येच्या प्रजेंत त्याचें लक्ष केंद्रिभूत होणार, त्यांच्या हितानहिताकरितां तो अहर्निश झटणार आणि असें झाल्यानें रावणवधाचें जागतिक कार्य त्याच्या हातून तडीस जाणार नाहीं, त्याचें तिकडे लक्षहि जाणार नाहीं असें वाटून आम्हांस होणारा समारंभ अत्यंत अप्रिय वाटला. पण तळमळत बसण्यापलीकडे काय करणार ? दशरथाचें मन वळविणें आणि रामचंद्राचा युवराजमहोत्सव स्थगित करणें, कोणाच्या शक्तींतील होतें ? तळमळ करण्यापलीकडें आम्ही कांहीं करूं शकलों नाहीं. परंतु ब्रह्मर्षे ! विधिघटना अशी चमत्कारिक कीं, प्रात:कालीं सर्वच वारें उलटें वाहूं लागलें. आनंदाच्या जयध्वनीच्या ऐवजीं अयोध्या नगरींत रडारड सुरू झाली आणि राजवाड्यांतील

आकांत तर विचारूं नका! परमेश्वरी नेमानेम वेगळा होता. विधि-घटना निराळी होती. दशरथाचा प्रारब्धयोग खडतर होता. दशरथाची प्रिय राणी कैकयीदेवी इनें दोन वर मागून अप्रत्यक्षपणें आपल्या कार्यांत मदत केली. रामाच्या ऐवजीं भरतास युवराजपद मिळावें असें ठरलें आणि रामचंद्रानें चौदा वर्षांच्या वनवासास जावें अशी राजाज्ञा झाली. वशिष्ठ महामुनी परमावधीचे आनंदित झाले. त्यांनीं आपला आनंद मला बोलून दाखविला; परंतु आनंदाचें लेशमात्रहि दिग्दर्शन न करतां ते माझा निरोप घेऊन राजवाड्यांत निघून गेले. ब्रह्मर्षे! सूर्योदयापूर्वी रामचंद्र तर शरयपार पडलाच; परंतु त्याच्याबरोबर सीतादेवी व लक्ष्मण हीहि वनवासास निघालीं. हें ऐकून तुम्हांस आश्चर्याचें भरतें कसें येत नाहीं? राम चौदा वर्षे-पर्यंत आपल्या कार्यास लाभला आणि त्याच्याबरोबर लक्ष्मण आणि सीता हीं आहेत या गोष्टी ऐकून फत्तरालासुद्धां आश्चर्य वाटेल. विश्वामित्र महामुने! या नवीन घटनेमुळें रावणवधाच्या आपल्या कार्यास प्रचंड उठाव मिळत आहे ही गोष्ट तुमच्या लक्ष्यांत येत नाहीं काय?"

"देवर्षि!" विश्वामित्र थंडपणानें म्हणाले, "या सर्व गोष्टी मला अवगत आहेत."

"इतक्या सत्वर त्या तुम्हांस कशा कळल्या? कोणी हेर अयोध्येहून आला काय?"

"नाहीं. मी त्या वेळेस अयोध्येसच होतों."

"मग आम्हांस भेटला नाहीं?"

"मी अयोध्येंत कांहीं काळ गुप्तपणानें काढला. कार्य केलें, तें यशस्वी झालें; त्याबरोबर मी अयोध्या सोडली." विश्वामित्र म्हणाले.

"कोणतें कार्य केलें? काम यशस्वी झालें? मला तुमच्या बोलण्याचा कांहीं अर्थ समजत नाहीं." नारदमुनी आश्चर्यानें म्हणाले.

"देवर्षि!" विश्वामित्र म्हणाले, "मला रामचंद्रास युवराज-पदप्राप्ति होणार ही गोष्ट समजतांच मी चिंतातुर होऊन तळमळत पडलों नाहीं. मी रात्रीचा दिवस करून अयोध्या नगरींत दाखल

झालों. युवराज महोत्सवाच्या आनंदानें वेडे झालेले नागरिक रामचंद्राचा जयघोष करीत रस्तोरस्तीं फिरत होते. अष्टप्रधानासह राजा भावी उत्सवाची तयारी करून दरम्यानचा वेळ केव्हां जातो याची आतुरतेनें वाट पाहत होता. जिकडे तिकडे आनंदीआनंद फैलावला होता. पण इतक्या पुढें गेलेली गोष्ट पाहून मी माझें मन लेशमात्रहि डळमळूं दिलें नाहीं. अखेरपर्यंत प्रयत्नांची शिकस्त करावयाची असें ठरवून मी कामास लागलों आणि माझ्या प्रयत्नास केवढें यश मिळालें हें आपण पाहातच आहांत. रामचंद्र अयोध्येचा राहिला नाहीं. जागतिक कार्याकरितां तो चौदा वर्षेपर्यंत आपणास लाभला. देवर्षि ! आपल्या कार्याच्या दृष्टीनें बदललेली घटना तुम्हांस आणि महामुनी वशिष्ठासहि मजप्रमाणें आदरणीय वाटते, याबद्दल मला संतोष होत आहे."

"ब्रह्मर्षे !" नारदमुनी म्हणाले, "तुम्ही बदललेल्या परिस्थितीचें यश सर्वस्वीं स्वतःकडेच ओढता याचा अर्थ मला समजत नाहीं. जरा खुलासा करा !"

तेव्हां ब्रह्मर्षींनीं चोंहोकडे न्याहाळून पाहिलें. आसपास कोणी नाही असें पाहून त्यांनीं अयोध्येच्या आपल्या कार्याची तपशीलवार हकिकत नारदमुनीस समजून सांगितली आणि शेवटी म्हटलें,

"कैकयीदेवी जितकी भावनाप्रधान तितकी बुद्धिमानहि आहे. रामचंद्राकरितां किती महत्वाचें जागतिक कार्य खोळंबलेलें आहे हें त्या चतुरस्र स्त्रीस सर्वस्वी पटलें.

"'भल्या अथवा बुऱ्या मार्गानें रामचंद्रास युवराजपदापासून मुक्त करतें आणि नियोजित कार्याकरितां त्याला तुमच्या हवाली करतें' अशी तिनें आणभाक वाहिली आणि अगदीं थोड्या वेळांत तिनें त्या कार्यांत यश मिळविलें."

नारदमुनी विश्वामित्रानें सांगितलेली सर्व हकिकत ऐकून थक्क झाले. त्यांना विश्वामित्राच्या कर्तबगारीबद्दल परमावधीचें आश्चर्य आणि कौतुक वाटलें. ते म्हणाले,

"विश्वामित्र महामुने ! तुम्ही अत्यंत कर्तबगार आहांत. तुमच्या आयुष्यांत अत्यंत प्रशंसनीय अशीं अनेक कार्यें तुम्ही केलीं आहेत;

तथापि रामचंद्र जगाकरितां संपादन केला हें तुमचें यश इतर यशांच्या शिरोभागीं विलसणारें आहे. धन्य तुमची बुद्धिमत्ता ! ! धन्य तुमची विचारशक्ति ! ! ! अगदीं अशक्य कोटीस गेलेली गोष्ट तुम्ही शक्य करून दाखविली आणि तुमच्या आदरणीय बुद्धिमुळें, तुम्हा एकटयास रावणवधाचे सर्वाधिकार सोंपविण्यांत आले. तुम्ही जी घटना घडवून आणली आहे त्यामुळें रावणवधाचें कार्य आपल्या अपेक्षेप्रमाणें पार पडेल असें वाटूं लागलें आहे."

"देवर्षि !" विश्वामित्र म्हणाले,

"आपण माझ्याशीं सहमत आहांत हें पाहून माझा उत्साह द्विगुणित होत आहे. रामचंद्राबरोबर सीतादेवी आणि लक्ष्मण हेहि वनवासास निघाले आहेत. यामुळें पुरेपुर यश आपल्या पदरीं पडणार असें मला वाटं लागलें आहे, रामाच्या हातून शेंकडों राक्षसांचा वध होईल. यामुळें रावण संतापला नाहीं, रामाशीं युद्ध करण्यास तो तयार झाला नाहीं तरी कलहाचें खात्रीचें बीज या सीतादेवीच्या वनवासांत आहे."

"हें कसें ?" नारदमुनी मध्येंच म्हणाले,

"सीतादेवी सुंदर आहे. तिच्या सौंदर्याची बातमी रावणाच्या कानावर सहज जाईल आणि कपटपटू रावण कपटानेंच सीतेचें हरण करील. राम लक्ष्मणास ही गोष्ट विषारी खड्गाप्रमाणें लागेल आणि सीतेला परत मिळविण्याकरितां कधींहि झालें नव्हतें असें युद्ध ते रावणाशीं पुकारतील. या युद्धांत रावण आणि त्याचे जातभाई यांचा फन्ना उडेल. अर्थात हे सर्व माझे अंदाज आहेत. एवंच रावणवधाचें कार्य दण्डकारण्यांत शिरणारे रामलक्ष्मण निस्संदेह रीतीनें पार पाडतील असा मला भरंवसा आहे."

"देवांचीही योजना अशीच आहे." नारद म्हणाले, "चौदा वर्षांच्या वनवासाच्या काळांत रावणाचा पुरा निःपात झाल्याशिवाय राहत नाहीं आणि हें सारें यश ब्रह्मर्षे ! तुमच्या अलोट बुद्धिमत्तेस मिळणारें आहे. विश्वामित्र एवढ्या मोठ्या यशाचा धनी आहे ही गोष्ट मात्र गुप्त ठेवावी लागणार !"

"ती पहा," विश्वामित्र म्हणाले, "गंगानदींत नाव टाकली.

त्या नौकेंत नावाड्याशिवाय चार माणसें दिसतात. एक रामचंद्र, एक लक्ष्मण, एक प्रसेनजित आणि चौथी स्त्री सीतादेवी. चला, दोन पावलें पुढें जाऊं. माझ्या रामाच्या स्वागतास देवर्षी नारद आहेत ही आनंदाची गोष्ट होय."

रामचंद्र सिद्धाश्रमांत आजपर्यंत अनेकदां आले होते. पण आजच्या-सारख्या हृदयस्पर्शी स्वागताचा लाभ त्यांना कधींही मिळाला नव्हता.

रामचंद्र, लक्ष्मण आणि सीतादेवी यांचें अभिवादन विश्वामित्रांनीं सजल नयनांनीं, सकंप हृदयानें आणि आदरपूर्ण करांनीं स्वीकारलें. तेव्हां ते म्हणाले,

" रामचंद्रा ! तूं या विश्वामित्राचा शिष्य आतां राहिला नाहीस. अयोध्येचा राजपुत्र किंवा इक्ष्वाकु कुलांतील एक राजपुरुष तूं राहिला नाहींस. तुझा दर्जा तू अयोध्या सोडल्यापासून फार वाढला आहे. जगाचा परमेश्वर ही योग्यता तुला लौकरच प्राप्त होणार आहे. जो काल अयोध्येच्या लोकांनी तुझ्याकरितां अश्रुविमोचनांत काढला तो तुझा वनवासाचा दिवस आम्ही ऋषीमुनींनीं अत्यंत शुभयोग म्हणून मानला आहे. अयोध्येच्या छोट्याशा राजकीय कर्तबगारींतून जगाच्या कर्तबगारीच्या क्षेत्रांत तूं आतां पदार्पण करीत आहेस. साध्या मानवी जीवनांतून तुझें आतां परमेश्वरी जीवनांत रूपांतर होत आहे. चौदा वर्षांचा वनवासकाळ, रामचंद्रा, अनेक परोपकारी कृत्यांनीं, अनेक दैवी सद्गुणांनीं आणि जागतिक कल्याणाच्या विविध कार्यांनीं भरगच्च भरून राहील आणि त्यामुळें पुण्यश्लोक रामा ! तूं जगाचा परमेश्वर बनशील. हा नजिकचा विंध्याद्रि पर्वत चढला कीं, तुझ्या कार्यक्षेत्रास प्रारंभ झाला. दण्डकारण्याच्या या प्रवेशद्वारात विश्वामित्र तुझें प्रेमानें स्वागत करतों. या, आमच्या सिद्धाश्रमांत या ! दोन दिवस तुमच्या पुण्यमय सान्निध्यांचा लाभ आम्हांस मिळूं द्या."

स्वागत करतांना विश्वामित्राचा गळा दाटून आला. त्याचे डोळे पाण्यानें डबडबले.

ही विश्वामित्राची भावनामय अवस्था नारदांनीं आपल्या आयुष्यांत प्रथमच पाहिली.

# १५

सीतादेवी ही आदर्श पत्नी होती. गृहिणीपदास सुशोभित करणारा गुणसमुच्चय तिच्या त्यागी जीवनांत जास्त विलसून दिसत होता. राजवाड्यांत असतांना रामचंद्राचीं दैनंदिन कामें सेवक, हुजरें, दासी, आचारी, पाणके इत्यादि अनेक नोकरांकडून होत. आतां तीं सर्व कामें करण्यास देवतातुल्य सीतादेवी एकसारखी हास्य-मुद्रेनें उभी असे. ही तिची निरलसपणें होणारी सेवा प्रसेनजित पाहत होता. रामचंद्र महाभाग्यवान म्हणून त्याला वनवासांतील सुखी जीवन लाभलें. आजपर्यंत राजवाड्यांत राहून परावलंबी बनलेली राजकन्या किती प्रेमानें, किती आज्ञाधारकतेनें, किती गोडीनें रामचंद्राकरितां अहर्निश झटत आहे हें पाहून गृहिणीपदाचें उच्चतम महत्व प्रसेनजित यास दिसून आलें आणि माझी गृहिणी, माझी उत्तरा अशाच तत्परतेनें माझ्या सेवेस उत्सुक असती—पण काय? आतां उत्तरा कोठें आहे? लग्नाच्या पहिल्या दिवशींच तिचा माझा विरह झाला आणि मी फटिंग संन्यासी बनलो! असे दुख:द विचार प्रसेनजिताच्या मनांत येत आहेत तोंच विश्वामित्राची खणखणीत वाणी त्याच्या कानावर पडली.

"प्रसेनजित!" विश्वामित्र म्हणाले, "तूं इकडे ये; असा मज-समोर बैस."

प्रसेनजित विचारतंद्रींतून जागा झाला आणि त्या ठिकाणीं येऊन त्यांच्यासमोर उभा राहिला.

"काय प्रफुल्लकुमार? तुम्ही येथें प्रसेनजित म्हणून ओळखलें जातां काय?" रामचंद्रानें मध्येंच प्रश्न केला.

"माझें खरें नांव प्रसेनजित." तो म्हणाला, "मी छद्मी वेषांत अयोध्येस राहिलों होतों, म्हणून मी प्रफुल्लकुमार हें नांव घेतलें होतें."

" आणि रामचंद्रा ! " विश्वामित्र म्हणाले, " प्रसेनजित हा काशीचा राजा अरिदमन याचा मुलगा. "

" राजपुत्रा ! " रामचंद्र म्हणाला, " तुमची खरी ओळख नसल्यामुळें आम्हीं तुम्हांस नोकरासारखें वागविलें याबद्दल आम्हांस माफी करा. "

" माफी करण्याचें कारण नाहीं. " विश्वामित्र म्हणाले,

" मी याला माझ्या कांहीं कामाकरितां अयोध्येस छद्मी वेषानें राहण्यास सांगितलें होतें प्रसेनजित ! तू अखंडपणें पंधरा दिवस माझी निरलसपणें कामगिरी केलीस आणि अखेर श्रीरामचंद्रास येथें आणून सोडलेंस. तुझी कामगिरी संपली. तूं आपली कामगिरी यशस्वी रीतीनें पार पाडलीस म्हणून तुला आम्ही बक्षीस देणार आहोंत. तूं वाटेल तें बक्षिस माग ! "

" आचार्य ! " प्रसेनजित म्हणाला, " मला कसल्याहि बक्षिसाची वांछा नाहीं. मी निरिच्छ बनत चाललों आहें. राजा दशरथ याची प्रफुल्लवनांत वाघापासून सुटका केली, तेव्हां रामचंद्र आणि राजा दशरथ यांनीं मन मानेल तें बक्षिस मागण्याचा मला आग्रह धरला. तेव्हांही मी माझा नकार कळविला ! "

" ऐक, राजपुत्रा ! " विश्वामित्र म्हणाला,

" अयोध्येचा सम्राट तुला संपत्ति, राज्य अथवा कोणतीहि बहुमोल वस्तू देणार असेल ! आणि तशा वस्तूची जरूर नसल्यानें तूं आपला नकार कळविला असशील ! परंतु आम्ही संन्यासी. आमच्याजवळ ना पैसाआडका, ना गांव, ना राज्य; तसलें बक्षिस मी देऊं इच्छित नाहीं. अगदीं तुझ्या मनास पटणारें तुला जरूर तेंच बक्षीस मी तुला देणार आहें. "

" महाराज ! " प्रसेनजित म्हणाला, " माझी अत्यंत प्रिय अशी एकच वस्तू होती. माझी सुंदर उत्तरा, माझी प्रियपत्नी लग्नाच्या दिवशीं मला सोडून गेली आणि मी निरिच्छ बनलों. उत्तरेचा चोहोंमुलखीं शोध केला. एकसारखे सहा महिने उत्तरेचा पिता आणि माझा पिता यांचे प्रयत्न अव्याहतपणें चालू होते. दशदिशा शोधल्या; पण उत्तरेचा कांहीं तपास लागला नाहीं. तेव्हांपासून मन उदास

झालें. या उदास प्रसेनजिताचें मन पूर्ववत् सुखी होईल असें बक्षिस मला कोण देणार आहे ? "

" माझ्या शब्दावर विश्वास नाहीं काय ? " विश्वामित्र म्हणाले, " अरे ! काशीचे राजे अरिदमन आणि उत्तर कुरुप्रांताचे राजे शत्रुंजय यांना बोलावून घ्या. नारदमुनिहि समक्ष येथें आहेतच ! प्रसेनजित, क्षणमात्र थांब ! तुझें उदासवाणें जीवन मी सुखमय करणार आहें. "

कांहीं वेळानें राजे अरिदमन आणि राजे शत्रुंजय तेथें येऊन आचार्यांस अभिवादन करून आसनस्थ झाले. आचार्यांच्या आश्रमापुढील विशाल आम्रवृक्षाखालीं बैठकीवर सर्व मंडळी बसली होती. व्याघ्र-चर्मावर विश्वामित्र विराजमान झाले होते. नारदमुनींकरितांहि एक सवतें व्याघ्रचर्म तेथें ठेवलें होतें. रामचंद्र–लक्ष्मणहि हरिणचर्मावर आसनस्थ झाले होते. सीतादेवीहि त्यांच्यामागें बसली होती. नतर विश्वामित्र म्हणाले, " अरिदमन आणि शत्रुंजय ! तुम्हास येथें एका महत्वाचे कामाकरितां येण्याची तसदी दिली आहे. सुदैवानें आज नारदमुनीहि येथें आहेत. अरिदमन तुमची स्नुषा म्हणजे शत्रुंजयराजाची कन्या उत्तरा, होय ना ?"

" आचार्य ! " काशीचा राजा अरिदमन म्हणाला,

" ती दुःखद स्मृति नको. लग्नाची अखेरची मिरवणूक पार पाडून राजकन्येसह आम्ही आमच्या राजवाड्यांत आलों. उत्तरा तिच्या अंतःपुरापुढील गच्चीवर बसून विश्रांती घेत होती. आम्ही पाहुण्यांचें आगतस्वागत करण्यांत गुंतलों होतों. प्रसेनजितहि आम्हां-मध्येंच होता. आकाशांत चंद्रमा संपूर्ण कलांनीं प्रकाशित होता. पाहुण्यांकरितां सुरेल संगीत चालू होतें. इतक्यांत– ' उत्तरा कोठें गेली ?– नाहींशी झाली, एकाएकी नाहींशी झाली ' अशा भीतिप्रद आरोळ्या तिच्या दासींनीं केल्या. आम्ही सर्व चकित झालों; भांबावून गेलों; परंतु तिचा शोध लावण्यास तत्परतेनें तयार झालों. सर्व गांव धुंडाळलें. विहिरी आणि मनुष्यवस्ती नाहीं अशी ठिकाणेंही शोधून पाहिली. रात्रभर सारखा शोध केला; पण उत्तरेचा तपास लागला नाहीं. त्यानंतर तीन दिवस आमचे व्याही शत्रुंजय काशीच्या

मुक्कामीं होते. रानावनांतून आसपास शोध केला; कोठेंहि उत्तरेचा पत्ता लागला नाहीं. त्यानंतर शत्रुंजय राजे दुःखद अवस्थेंत आपल्या राजधानीकडे परत गेले. कुमार प्रसेनजित दुःखी झाला; परंतु सहा महिनेपर्यंत शोध करूनहि आम्हांस किंवा राजा शत्रुंजयास जेव्हां उत्तरेचा तपास लागेनासा झाला, तेव्हां आम्ही निराश अवस्थेंत उत्तरेचा शोध करण्याचें सोडून दिलें. कुमार प्रसेनजित राजधानी सोडून आज तीन महिने भटकत आहे. परंतु उत्तरा कशी व कोठें नाहींशी झाली, हा दुःखद प्रश्न पहिल्या दिवसाइतकाच आजही कायम आहे. आचार्य ! पोर मोठी सालस होती ! कालाच्या ओघाबरोबर हेंहि दुःख आम्हांस विसरलें पाहिजे."

"म्हणजे" विश्वामित्र ऋषि म्हणाले, "उत्तरेचा देहान्त झाला असें तुम्ही समजतां काय ?"

"दुसरें अनुमान काय काढावें ? उत्तरा मृत झाली असेंच आम्ही मानतों." राजा अरिदमन दुःखद अंतःकरणानें म्हणाला.

"राजे अरिदमन आणि राजे शत्रुंजय !" विश्वामित्र म्हणाले, "तुमची उत्तरा येथें आहे; माझ्या आश्रमांत आहे."

दोन्हीही राजे विश्वामित्राकडे भांबावून पाहूं लागले. प्रसेनजितानें तर रोखठोक प्रश्न आचार्यांना केला,

"ती कोठें आहे ?"

"मी तिला बोलावलें आहे; ती एक क्षणांत येथें येईल." विश्वामित्र शांतपणानें म्हणाले,

"लग्नाच्या रात्रीं ती आपल्या गच्चीवर उभी होती. तिच्या दासी तिला सोडून दूर गेल्या होत्या. ही संधी साधून एक अज्ञात विमान त्या गच्चीवर उतरलें आणि आरडाओरड न होतां तिला विमानांत जबरीनें घालण्यांत आलें आणि तें विमान आलें तसें परत निघून गेलें; असा उत्तरेवर चोरटा हल्ला झाला. दक्षिणेस दूर अंतरावर लंका नांवाचें राक्षसांचें राज्य आहे. त्या बेटावर जाऊन विमान उतरलें. आर्यांच्या कित्येक रूपवती स्त्रिया राक्षसांच्या अत्याचारास अद्यही बळी पडत आहेत. सहा महिनेपर्यंत उत्तरा लंकेस एका विशाल वाड्यांत बंदिवासांत होती. तिच्या कौमार्यभंगाचा प्रयत्न या सहा

महिन्यांत फसून झाला. परंतु उत्तरा शीलभ्रष्ट झाली नाहीं. त्या सद्गुणी कन्येची अखेर सुटका लंकेचा मंत्री अग्निरथ यानें केली. अग्निरथाचा मुलगा चित्ररथ यानें विमानांतून तिला पळवून नेली होती. उत्तरेचें शील अभेद्य पाहून मंत्री अग्निरथ फार संतुष्ट झाला. त्यानें सौजन्यानें उत्तरेची सुटका केली आणि उत्तरा तेथून आल्यापासून माझ्या आश्रयास आहे. आपली प्रियतम कन्या म्हणून राजे शत्रुंजय तुम्ही तिला आपल्या घरीं घेऊन जाणार ना ? राजे अरिदमन, तुम्ही अशा नीतिमान् सुनेचा सत्कार आपल्या राजवाड्यांत करणार ना ?

यावर शत्रुंजय भीत भीत म्हणाले, " राक्षसांच्या घरीं आठ महिनें राहिलेली कन्या पतिता होय. तिचा सत्कार आम्हांस आपल्या घरीं करतां येणार नाहीं. "

" आणि अशा सुनेस केवळ लोकापवादाकरतां आम्ही स्वीकारणार नाहीं. " राजे अरिदमन म्हणाले.

" ती पहा उत्तरा किती निर्भयतेनें येत आहे ? " ब्रह्मर्षि विश्वा-मित्र म्हणाले, " तिच्या निर्भय चर्येवरून तिच्या नीतिमत्तेची साक्ष पटत आहे. तिची सुंदर गजगति तिचें वांकडें पाऊल पडलें नाहीं असें ध्वनित करीत आहे. अशा नीतिमत्तेच्या पुतळीस पतिता म्हणण्यास कोण धजेल ! थांबा, राजे लोक हो थांबा. तुम्ही उत्तरेस कांहींहि बोलूं नका. तिच्या कोमल मनावर आघात होईल असा शब्द उच्चारूं नका. तुम्हांस उत्तरेच्या नीतिमत्तेची साक्ष मी पटवून देईन आणि तुमचें मी समाधान करीन. ये, उत्तरे ये. हा तुझा पति, पिता आणि श्वशुर तुला स्वगृहीं नेण्यास आले आहेत. "

" अनेक आपत्ति भोगलेल्या आणि आम्हांस सर्वस्वी मुकलेल्या उत्तरे ये " प्रसेनजित म्हणाला, "काशीचा राजकुमार प्रसेनजित तुझें स्वागत करीत आहे. राक्षसांच्या मायावी हल्ल्यामुळें सर्वस्वी अनाथ बनलेल्या प्रत्येक आर्य स्त्रीस परत स्वदेशी येण्यास कोणताहि सहृदय आर्य हरकत घेणार नाहीं. आणि तशांत तूं शीलसंपन्न राहिलीस. तुझें शील तावून सुलाखून शुद्ध केलेल्या सोन्याइतकें निर्मळ आहे असें आचार्य सांगतात. अशा शीलवती पत्नीस केवळ लोकापवादा-

करतां सोडण्याइतका मी मूर्ख नाहीं. ये. माझ्या हृदयमंदिरीं तुला प्रेमाचें स्थान आहे. तुझें मी हार्दिक स्वागत करतों."

आतां उत्तरा तेथें येऊन पोहोंचली होती. तिनें आचार्यास, श्रीमान् नारदमुनीस आणि राम-लक्ष्मणास अभिवादन केलें आणि शेवटीं आपल्या भर्त्याच्या पाया पडून ती स्वस्थ मुद्रेनें आपल्या पित्याकडे आणि श्वशुराकडे पाहून उभी राहिली. तोंच नारदमुनी म्हणाले,

"ही कन्या अत्यंत शीलव्रती आहे. आम्ही परवा लंकेस गेलों होतों तेव्हां मंत्री अग्निरथ यांच्याकडेच आमचा मुक्काम होता. मंत्री अग्निरथांनीं उत्तरेच्या शीलाची प्रशंसा केली. त्यांच्या चित्ररथ नांवाच्या मुलानें तिला पळवून आणून घरीं ठेवलें होतें. उत्तरेवर कोण-तीहि जुलूमजबरदस्ती न होईल अशी काळजी अग्निरथ यांनी घेतली. आठ महिनेपर्यंत उत्तरेचें शील भ्रष्ट करण्याचा चित्ररथानें प्रयत्न केला. परंतु अग्निरथ मला म्हणाले, 'कसल्याहि मोहास ती बळी पडली नाहीं. मायावी भाषणास तिच्या शीलसंपन्न मनानें थारा दिला नाहीं.' अखेर मंत्री अग्निरथ यांस अशा देवतेचा होणारा अपमान आणि अवहेलना असह्य झाली आणि तिला त्यांनी मोठ्या युक्तीनें समुद्रपार करून देशी जाण्यास सांगितलें. तिच्या आप्तेष्टांस म्हणजे तुम्हांस सांगण्यास मंत्री अग्निरथाने मला एक निरोप दिला आहे. त्यांनीं मला सांगितलें आहे की उत्तरा अत्यंत शीलसंपन्न अशी येथें राहिली. तिच्या कौमार्याचा भंग लेशमात्रहि झाला नाहीं. ती पवित्र राहिली आहे. तरी राजे लोक हो, जननिंदेची भीति मनांतून काढून टाका. आणि या शीलसंपन्न कन्येस पुन: आपली म्हणा.

तेव्हां विश्वामित्र म्हणाले, "राजे शत्रुंजय आणि राजे अरिदमन, आतां तरी तुम्ही उत्तरा देवतातुल्य आहे असें म्हणाल ना? प्रत्यक्ष देवर्षि नारदमुनि सांगत आहेत. आतां तरी उत्तरेच्या शीलाची खात्री तुम्हांस झाली ना?–

त्यास अधिक बोलूं न देता काशीचे राजे अरिदमन म्हणाले, "उत्तरेचा स्वीकार तिच्या पतीनें केला आहे. तिच्या नीतिमत्तेबद्दल लेशमात्रहि शंका राहिली नाहीं. उभय कुळांची अब्रू या उत्तरेमुळें वाढेल. उत्तरे, तुझें मी स्वागत करतों."

तेव्हां शत्रुंजय अश्रुपूर्ण नेत्रानें म्हणाले, " उत्तरा आमची फार प्रेमळ. तिचें शील तिच्यावर झालेल्या हल्ल्यामुळें पुरेपूर निकषास लागलें आहे. आणि शुद्ध सुवर्णाप्रमाणें ती शीलसंपन्न ठरली आहे. उत्तरे, तुझी माता तुझ्याकरतां शोक करीत घरीं बसली आहे. तिला भेटण्यासाठीं–आनंद देण्यासाठीं चल."

उत्तरा प्रथम आपल्या श्वशुराच्या आणि नंतर पित्याच्या पाया पडली. तेव्हां ती अश्रूंनीं पूर्ण भिजली होती.

" आचार्य, " ती सकंप आवाजानें म्हणाली " तुम्हीं मला आणसांत घेतलें, हा तुमचा माझ्यावर केवढा उपकार ! माझ्या प्रिय पत्नीची सेवा करण्यास मला अवसर लाभला. परंतु माझी एक प्रतिज्ञा आहे. यापुढें कोणतीहि आर्यकन्या, आर्य स्त्री राक्षसांच्या मायावी हल्ल्यास बळी पडणार नाहीं अशी मला हमी पाहिजे. "

रामचंद्राने त्या भावनापूर्ण प्रसंगीं अत्यंत योग्य असें वर्तन केलें. ते म्हणाले,

' राजकन्ये अथवा राजस्नुषे, आम्ही उभयता बंधु विंध्याचलाच्या दक्षिणेस दण्डकारण्यांत चवदा वर्षेंपर्यंत निवास करणार आहोंत. राक्षसाचें एकही चोरटे विमान विंध्याचलाच्या उत्तरेस जाणार नाहीं. आमच्या शरसंधानास असे चोरटे हल्ले करणारे बळी पडतील. याकरतां भगिनी तूं शांत रहा. एकहि आर्य स्त्री अथवा आर्य कुमारिका यापुढें राक्षसाच्या मायावी हल्ल्यामुळें शीलभ्रष्ट होणार नाहीं. ' त्यावर ब्रह्मर्षि विश्वामित्र म्हणाले,

" हें एकवचनी रामाचें वचन आहे " उत्तरेनें रामास पुनः अभिवादन केलें.

तेव्हां सीतादेवी पुढें आली आणि उत्तरेचा हात प्रसेनजिताच्या हातांत देतांना म्हणाली,

" तुमचा विरहकाळ संपला ! तुम्ही आतां सुखानें आणि आनंदानें कालक्रमण करा. भाऊजी, तुम्हांस हा मंगल आशीर्वाद आहे'–

शेंवटी आचार्य म्हणाले,

" तुला मन मानेल तसें बक्षीस मिळालें ना ? जा. उत्तरेसह सुखानें रहा. "

" आचार्य," प्रसेनजित म्हणाला, " तुमच्या आणि सीताबाईंच्या आशीर्वादानें आम्हीं उपकृत झालों आहोत."

दुसरें दिवशीं प्रात:काळीं काशीचे राजे अरिदमन आपला पुत्र आणि स्नुषा यांसह काशीस रवाना झाले. राजे शत्रुंजय यांसहि त्यांनीं काशीस येण्यास आग्रह केला. त्यांनीं उत्तरेस दोन तीन दिवसानंतर तिच्या आईच्या भेटीस उत्तर कुरुप्रांतीं नेण्याचें अभिवचन तत्पूर्वीं घेतलें होतें.

●

# १६

सिद्धाश्रमाच्या वायव्य कोपऱ्यांत अयोध्यामंदिर नांवाची सुंदर व मनोवेधक झोपडी होती. अयोध्येच्या राज्यांत विश्वामित्राचा हेतु ओळखून सिद्धाश्रम स्थापनेच्या प्रारंभीं ही झोपडी विश्वामित्राकरिता तयार करून दिली होती. आसमंतांतील आम्रफलांचीं उत्तुंग वृक्षें सिद्धाश्रमाचे वयोमान सूचित करीत होतो. वनवासी राम–लक्ष्मण आणि सीता यांचा निवास अयोध्यामंदिरांतच होता. ऋतुमानाप्रमाणें बहुतेक सर्व वृक्ष मोहोरानें गजबजले होते. त्यांचा मनोवेधक सुगंध वायूंच्या लहरींबरोबर सर्व सिद्धाश्रमभर पसरला होता. रामचंद्र सिद्धाश्रमांत आल्यापासून त्याच्या दर्शनाकरितां अयोध्यामंदिरांभोंवतीं छात्रगण, ऋषिमंडळ व इतर लोक यांचा नेहमीं गराडा असे. पण आज एकाएकीं अशी विलक्षण क्रांति कां झाली ? अयोध्यामंदिराकडे .एकही मनुष्य आज फिरकत नाहीं याचें कारण काय ? रामचंद्र अयोध्यामंदिरांतून निघून गेले कीं काय ? ...... पण नाहीं. घननीळ, सुहास्यवदन राम अयोध्यामंदिराच्या दारांत प्रसन्नतेनें उभा आहे. मग लोकांच्या जमणाऱ्या दैनिक यात्रेला खंड कसा पडला ? सूर्योदय होऊन दोन घटिका लोटल्या तरीही सिद्धा-

श्रमांतील एकही विद्यार्थी अयोध्यामंदिराच्या समीप कसा आला नाहीं ? एकाही ऋषीनें रामचंद्र काय करतात हें पाहण्याकरितां अयोध्यामंदिरांत कां डोकावले नाहीं ?

आम्रवृक्षांवर बसून कोकिळ मधुर गान गात आहेत. पलीकडे दूरवर एक मयूर आपला सुवर्णमय पिसारा पसरून आनंदानें नृत्य करीत आहे. आणि त्यांतच राघूमैनांचा आवाज त्याला ताल धरीत आहे. जवळच गंगेच्या पात्रांतून निर्मळ जलौघ गंभीरपणें वहात आहे. हीं सर्व दृश्यें पहात बदललेल्या परिस्थितीचें आनंदानें समावलोकन करीत आणि निकटवर्ती सीतेकडे सकौतुक दृष्टिक्षेप करीत रामचंद्र अयोध्यामंदिराच्या दारांत उभा आहे. अशा समयीं विश्वामित्राचें प्रशांत वदन त्यास दिसलें. त्यांस पाहून आदरानें अभिवादन करून राम म्हणाला, "आचार्य, आज काय आहे ? ही विशाल सभेची आयोजना इथें कां करण्यांत आली आहे ?"

"राम, आज येथें एक गुप्त बैठक भरणार आहे. येथें जे अनेक ऋषिमुनि जमणार आहेत ते या दंडकारण्यांत वास करणारे असून त्यांची दु:खें तुला कळावीत व त्यांचा परिचय तुला व्हावा म्हणून या उद्देशानें ही बैठक भरणार आहे.

आर्यांच्या सुदैवानें तुझा चौदा वर्षांचा सहवास आर्यांना लाभला आहे. या चौदा वर्षांच्या दीर्घकाळांत तुझ्या हातून भारताचें मोठें कल्याण होणार असून या काळांत तुझ्या धनुष्यबाणाला मुळींच विश्रांति मिळणार नाहीं. दुष्ट राक्षसांच्या तावडींतून मोठमोठ्या विद्वान ऋषींना, तरुण व रूपवती आर्यस्त्रियांना व भारतीयांना तूं मुक्त करणार आहेस. ही महान् धर्मसंस्थापनेची सेवा घडावी म्हणून चवदा वर्षांच्या वनवासाची विधिघटना झालेली आहे.

"या परमेश्वरी योजनांचें मी मन:पूर्वक स्वागत करतों." रामचंद्र सुहास्यवदनानें म्हणाले.

"सूर्योदयापासून आठ घटिकांनीं अयोध्यामंदिरापुढचें मैदान ऋषिमुनींनीं फुलून गेलें. हिरवीगार बिछायत तृणाच्छादित गवताचीच आहे असा भास होत होता. बिछायतीवर अनेक मृगचर्मे पसरलीं होतीं. ऋषिमुनींचें स्वागत करून त्यांना प्रत्येक आसनांवर

बसविण्याची योजना विश्वामित्र करीत होते. अखेर सर्व जागा भरून गेल्या. शेवटीं विश्वामित्र अयोध्यामंदिरांत गेले आणि रामचंद्र, लक्ष्मण आणि नारदमुनि यांना घेऊन आले. व्यासपीठांवर व्याघ्रचर्मे पसरून त्यांना बसण्याची योजना केली होती. प्रमुख स्थानी राम-लक्ष्मण स्थानापन्न झाले. नारदमुनि आणि विश्वामित्र जवळच व्यास-पीठांवर बसले होते. विश्वामित्रांनीं प्रारभीचें भाषण केले. ते म्हणाले;

"माझ्या विनंतीप्रमाणें तुम्ही सर्व विद्वान महर्षि येथें एकत्रित झाला, याबद्दल मी तुमचा ऋणी आहे. तुम्ही हल्ली अत्यत कष्टप्रय जीवन कंठीत आहांत. आर्यावर्तांत राहून सुखाचें निष्काळजी जीवन कठण्याचा तुम्हांस अधिकार असताना केवळ आपल्या मध्यवर्ती सस्थेचे हेतु तडीस नेण्याकरितां तुम्ही मरणाशीं झुंझत विंध्याचलाच्या दक्षिणस धाडसानें रहात आहांत. भरत खडाचा दक्षिण माग आप-णास यथेष्ट चरण्याकरितां आहे ही लकेच्या राक्षसांची महत्वाकांक्षा असून तुम्ही या त्यांच्या महत्त्वाकांक्षेस विरोध करीत आहां. यामुळें अर्थातच तुमच्या धर्मकृत्यात राक्षसांकडून जोराचा प्रत्याघात होतो आणि तुम्ही परत आर्यावर्तांत जावे या हेतूनें ते तुमच्यावर प्राणांतिक हल्ले करीत असतात. ऋषिमुनि हो! तुम्ही असल्याहि संकटास तोंड देऊन मध्यवर्ती सस्थेचे हेतु यशस्वी करण्यास झगडत आहां, ही अत्यंत अभिनदनीय गोष्ट होय ! भरत-खंडांत उत्तरेकडील सर्व प्रांत आर्यांनीं जिकला आहे. आणि अनेक सुधारणांसह आर्यांचीं राज्ये तेथें भरभराटीस येत आहेत. आता राहिला भरतखंडाचा दक्षिण प्रदेश. तेथें विशाल दण्डकारण्य असून, जो थोडाबहुत मनुष्यवस्तीचा प्रांत आहे, तेथें सुधारणेचा अंशहि मिळावयाचा नाही. अत्यंत रानटी स्थितींतील काहीं मुलख भरत-खंडाच्या दक्षिणेस आहे. म्हणून विंध्याचलाच्या दक्षिणेस मनुष्यवस्ती करून दण्डकारण्य विशाल नगरांनीं आणि समृद्ध गावांनीं भरगच्च भरण्याकरितां व तेथील रानटीपणा नाहींसा करण्याकरितां प्रारंभीचे स्वयंसेवक म्हणून तुमची योजना झाली. आतां दैवी तेजानें शोभून दिसणारा अत्यंत कर्तबगार आणि शूर, परम भाग्यवान् आणि सत्व-प्रधान अयोध्येचा राजपुत्र राम आपल्या शूर बंधूसह आणि सर्व-

गुणसंपन्न अशा आपल्या पत्नीसह तुमच्यांत राहण्यास चौदा वर्षे येत आहे. तुम्हांस धार्मिक कार्यांत अथवा इतर कोणताहि त्रास यापुढें होणार नाहीं. राक्षसांचा पुरा नि:पात करून तुमचें जीवन अत्यंत निरामय होईल असे यशस्वी प्रयत्न श्रीरामचंद्र करणार आहे. यापुढे तुमच्या आपत्ती सपल्या. सुदैवेकरून लंकेचा राक्षस राजा, रावण आणि त्याचे घराणें याचा पुरा नि:पात होईल. रामरावणाचे कधीं झालें नव्हतें असें घनघोर युद्ध होईल. त्या युद्धांत दुष्टांचा संहार करणारे रामलक्ष्मण विजयी होतील आणि भरतखंडाचा सर्व दक्षिण प्रदेश आम्हा आर्यांचा अंकित होईल. आपली मध्यवर्ती संस्था यांनीं प्रारंभिलेले सर्व हेतू तडीस जातील. माझा असा भरंवसा आहे कीं, रावणाच्या पातकांचें माप, पूर्ण भरलें आहे आणि विधिघटनेने प्रेरित होऊन एकबाणी राम स्वयंसेवकाच्या वेषांत घरदार सोडुन सगेसोयरे सोडून, सुखाचे युवराज-पद लाथाडून चौदा वर्षांचे कष्टप्रद आयुष्य कंठण्यास सज्ज झाला आहे. हा आम्हां आर्यांचा भाग्यकाळ समीप आला आहे, याचें शुद्ध प्रतीक होय. विधिघटना पूर्ण यशस्वी होईल आणि आर्यांचें राज्य समुद्रवलयांकित बनेल. ऋषिमुनि हो ! ज्या वेळीं सज्जनास दुर्जनाकडून पोहोंचणारा त्रास परमावधीस जातो, तेव्हां दुर्जनांचा नि:पात करण्याकरितां परमेश्वर अवतार घेतो. श्रीरामचंद्र हा परमेश्वरी अवतार आहे. श्रीविष्णूचा अवतार आहे. तुमच्यांत राहण्याकरितां श्रीविष्णु रामचंद्राच्या रूपानें येत आहेत. आणि तो घटका दोन घटकाकरितां नव्हे. तर चौदा वर्षांचा दीर्घ-काळ तो तुमच्यांत व्यतीत करणार आहे. तुम्ही भाग्यवान् , आमची मध्यवर्ती संस्था भाग्यवान, आमचे आर्यांचें साम्राज्य भाग्यवान ! बोला, श्रीरामचंद्राचा विजय असो ! रघुकुलभूषण रघुनायकाचा विजय असो !! आमच्या श्रीरामाचा विजय असो !!! ''

त्यावर चित्रकूटचे विद्वान महर्षि व्यास बोलण्याकरितां व्यासपीठा-वर उभे राहिले.

'' ठीक बोललांत ! ब्रह्मर्षि, ठीक बोललांत. रामचंद्राच्या त्यागा-पुढें आमचा त्याग कस्पटासमान आहे. सत्वप्रधान परमेश्वर, कर्तुम-कर्तुम् दैवी तेजानें आणि शौर्यानें विलसणारा परमेश्वर म्हणून आम्ही

श्रीरामचंद्राचें स्वागत करतों. आमच्या चिंता आणि काळज्या लयास गेल्या. यापुढें अत्यंत निरामय आयुष्य आमच्यापुढें आहे. परमेश्वरी आज्ञा म्हणून आम्ही श्रीरामचंद्राची आज्ञा पाळूं आणि त्यांच्या आचरणाचा कित्ता सदैव आपणापुढें ठेवूं."

यानंतर श्रीरामचंद्र उठले आणि मधुर आवाजानें अत्यंत सौम्यपणानें बोलूं लागले.

घननीळ आकाशांतून होणाऱ्या मेघनादाची गंभीरता रामचंद्राच्या भाषणांत होती. परंतु मेघगर्जनेंत केव्हांहि न सांपडणारा मंजुळपणा आणि सुरेलपणा त्यांत होता. सत्य आणि पावित्र्य यांचें अस्तित्व रामचंद्राच्या शब्दोंशब्दीं भरलेलें होतें. जगन्नियंत्याची ही आकाशवाणी होत आहे, या भावनेनें तेथें जमलेले सर्व ऋषिमुनि रामचंद्राच्या भाषणानें आकृष्ट झाले होते. जमलेल्या ऋषिमुनीस प्रेमपूर्वक अभिवादन करून रामचंद्र म्हणाले;

"तुम्हां सर्वांस एकत्रित पाहून मला आनंद होत आहे. ऋषिमुनींची एक मध्यवर्ति संस्था इतक्या दक्षतेनें आर्यांच्या हिताकडे लक्ष देते आणि आम्हां आर्यांची भरभराट साधण्याकरितां उपाययोजना करते; हें मी आज पहिल्यानेंच ऐकत आहे. तुमचे हेतु जितके रहस्यमय आहेत, तितके ते उपयुक्तहि आहेत. आपला अभ्यास वाढवून तपःसामर्थ्यानें आत्मशुध्दी करण्याकरितां निर्जन डोंगरकपारींतून न रहातां तुम्ही लोकशिक्षणाचे कार्य गुरुकुलें स्थापन करून करतां. राजे लोकानां योग्य मसलती देण्याकरितां त्यांच्या दरबारीं राहातां आणि भरतखंडाचा दक्षिण प्रदेश आर्यांच्या अंकित करण्याकरितां प्रत्यक्ष मृत्यूसहि तोंड देतां. एवढा स्वार्थत्याग आचार्य, नारदमुनि आणि जमलेले सर्व ऋषिमुनि तुमचा चालला आहे. या त्यागापुढें माझा त्याग फिक्का पडेल. तुमच्या योजनेप्रमाणें मी आणि लक्ष्मण हातांवर शिर घेऊन धनुष्यबाणासह तुमच्यांत चौदा वर्षांचा काळ घालविणार आहोंत. या कालांत तुमची दण्डकारण्यांतील वाढत जाणारी वस्ती संकटहीन व निरामय करण्याची जबाबदारी आम्ही आपणांवर घेत आहोंत. उद्यां आमचा चित्रकूटचा प्रवास सुरू होईल. व्यासमुनी, तुमच्या चित्रकूटावरील आश्रमांत आम्ही

अत्यल्प काळांत येऊन पोहोचूं. तुमचे दण्डकारण्यांतील आश्रम आणि निवासस्थानें यांना ताबडतोब भेट देण्याची माझी इच्छा आहे. तुमच्या संकटाची मी व्यक्तिशः माहिती घेईन. आणि मी आणि लक्ष्मण यांचे धनुष्यबाण तुम्हांस कसल्याही आपत्तींतून पार पाडण्यास समर्थ होतील. तुम्ही लेशमात्रही शंका बाळगूं नका. दण्डकारण्यांत आल्याबरोबर आमचे पहिलें कर्तव्य तुम्हांस संरक्षण देणें हें आहे. आर्य महिलांवर होणाऱ्या राक्षसांच्या हल्ल्यास पायबंद घालणें हें आमचें दुसरें कर्तव्य होय. हे हल्ले विमानांतून होतात. यापुढें एकहि राक्षसांचें विमान विध्याद्रीच्या उत्तरेस जाणार नाहीं. आमच्या शरसंधानास असलीं विमानें बळी पडतील. आणि आमचें तिसरें कर्तव्य म्हणजे रावणाचा त्याच्या जातभाईसह फन्ना उडविणें, हें होय. मी आचार्यांच्या पायाची शपथ घेऊन प्रतिज्ञा करतों कीं, हीं तिन्हीं कर्तव्यें बजावण्याकरितां आम्ही चौदा वर्षांचा काळ व्यतीत करूं. आचार्यांच्या आणि आपल्या आशीर्वादावर माझें यश अवलंबून आहे. मी परमेश्वराचा अवतार नाहीं. तुम्हां आम्हांत परमेश्वर अंशभूत आहेच. परमेश्वराचे गुण आपल्यांत पूर्णत्वें उतरावेत याकरितां माझा अहर्निश प्रयत्न आहे. आणि त्या प्रयत्नांत मला चांगलें यश मिळत आहे, असें मला तुमच्या शब्दावरून वाटतें. नमस्ते." अनेक वर्षांच्या अवर्षणामुळें संतप्त झालेली पृथ्वी ज्याप्रमाणें पर्जन्यवृष्टीनें तृप्त होते किंवा फार दिवसांचा बुभुक्षित मनुष्य सुग्रास भोजनानें संतुष्ट होतो त्याप्रमाणें ती ऋषींची परिषद रामचंद्राच्या भाषणानें परम आल्हादित झाली. आपण आतां राक्षसांच्या तावडीतून सुटलों, आपल्या चिंता आणि काळज्या रामचंद्राच्या आगमनानें नष्ट झाल्या, अशी त्यांची मनोमय खात्री झाली. ते आनंदानें डोलूं लागले. कित्येकाच्या तोंडांतून तर धन्योद्‌गार बाहेर पडले. अखेर विश्वामित्र सद्‌गदित वाणीनें म्हणाले.

—

" रामचंद्रा, तूं मला धन्य केलेस. माझे ऐहिक हेतु आज शेवटास गेले. तुझ्या लहानपणीं धनुर्विद्येचें ज्ञान देऊन तुला एकबाणी बनविलें. तो माझ्या मनीचा हेतु आज तडीला गेला. राक्षसांच्या युद्धांत तूं यशस्वी होशील आणि भरत खंडांतील आर्यांच्या वर्चस्वास, आर्यांच्या

भावी भरभराटीस तूं ललामभूत असा वीर म्हणून तुझी सदैव प्रशंसा होईल. इतकेंच नव्हे? तर रामचंद्रा, रावणवधानंतर तुला प्रत्येक आर्य पूज्य मानूं लागेल."

विश्वामित्राच्यानें जास्त वेळ बोलवेना. तेव्हां नारदमुनि आपल्या सुरेल आवाजांत बोलूं लागले.

"जगाच्या अंतापर्यंत रामचंद्र आणि विश्वामित्र या अद्वितीय गुरुशिष्याची महती गाइली जाईल. ऋषिमुनि हो, रामचंद्राची योजना रावणवधाकडे व्हावी हा कयास आजकालचा नाहीं. विश्वामित्रांनीं रावणवधाची योजना कित्येक वर्षांपूर्वी करून ठेवलेली होती. साम आणि अथर्ववेदांचे पाठ रामचंद्रास देऊन विश्वामित्रांनीं त्यास जसें सत्वप्रधान बनविलें त्याचप्रमाणें उभयतां रामलक्ष्मणास त्यांनीं निस्वार्थीही बनविलें आणि बाल्यावस्थेंतच त्यांना युद्धकलेचें ज्ञान देऊन त्यांना युद्धकलेंत पारंगत केलें. असें करण्यांत विश्वामित्र महर्षींचा एकच हेतु होता. आर्यांचे राक्षसाच्या संकटापासून संरक्षण आणि आर्यांचा भाग्योदय हाच त्यांचा हेतु होता. आणि त्यांनीं आपल्या बुद्धिसामर्थ्यानें, चिकाटीच्या प्रयत्नानें आणि सतत उद्योगानें रामचंद्रास चौदा वर्षेपर्यंत ऋषि-कार्याकरितां अर्थात आर्यांचा भाग्योदय साधण्यास प्रवृत्त केलें आतां आमच्या मध्यवर्ति संस्थनें विश्वामित्रावर सोपविलेली कामगिरी पूर्णपणें शेवटास गेली. विश्वामित्राच्या बुद्धिवैभवाचें सामर्थ्य केवढें वर्णावें त्यांच्या अतुल बुद्धिमत्तेबद्दल देवलोकांत मोठी प्रशंसा चालली आहे. त्यांचे महत्वाचें, अत्यंत महत्वाचे असें ऐहिक कर्तव्य पूर्णपणें संपलें आहे. त्यांचें तपःसामर्थ्य विशाल असून त्याच्या पूर्ततेस जगाच्या कल्याणाची मोठी गोष्ट त्यानीं सिद्धीस नेली आहे. यामुळें देवलोकांत त्यांचें सन्माननीय आसन त्यांच्याकरितां सज्ज करून ठेवलें आहे. त्यांच्या स्वागताकरितां स्वर्गांतील देव आतुर झाले आहेत. एवढी मोठी कामगिरी आजपर्यंत कोणाही माणसाच्या हातून झाली नाहीं व होणारही नाहीं. देवलोकीं होणारा त्यांचा सत्कार तर अवर्णनीय होईलच परंतु इहलोकीं जोपर्यंत आर्य धर्म जिवंत राहील, तोपर्यंत भविष्यकाळीं हजारों वर्षें विश्वामित्राच्या प्रशंसनीय कार्याची प्रत्येक आर्य उपकृत मनानें

प्रशंसा गाईल. रामचंद्र चौदा वर्षेपर्यंत दण्डकारण्यांत स्थिर राहील आणि ऋषिमुनींचें संरक्षण करीत रावणवधाची संधि साधील. हें सर्व आपणास पहावयाचें आहे व ऐकावयाचें आहे. परंतु रामचंद्र जसा एकबाणी आहे, तसा एकवचनीही आहे; हें लक्षांत ठेवा. त्यानें प्रतिज्ञा केल्याप्रमाणें रावण व त्याचें राक्षस सैन्य यांचें घनघोर युद्ध रामलक्ष्मणाशीं होईल. विजयी वीर म्हणून त्याचें स्वागत करण्यास सबंध आर्यावर्त तयार राहील. स्वयंसेवकाच्या वेषांतील राम-लक्ष्मणाचा भावी विजय जाहीर करा. बोला. रामलक्ष्मण की जय."

ऋषिमुनींनीं आनंदाच्या भरांत रामलक्ष्मणांचा त्रिवार जयजयकार केला.

शेवटीं आनंदाश्रूनें भिजलेला विश्वामित्र म्हणाला;

" रामलक्ष्मण की जय."

त्यानंतर ती मजलस फार वेळ चालली नाहीं. दोन प्रहरीं ठिकठिकाणचे ऋषिमुनि सिद्धाश्रम सोडून परत आपापल्या निवासस्थानाकडे निघून गेले.

दुसरा दिवस उजाडला. राम, लक्ष्मण आणि सीता दण्डकारण्याकडे जाण्याकरितां सज्ज झाले. विश्वामित्रांचा अखेरचा निरोप घेण्याकरितां ते विश्वामित्रांच्या आश्रमापुढें येऊन उभे राहिले. विश्वामित्राची नेहमीची प्रसन्न मुद्रा त्या दिवशी सचिंत दिसत होती. वस्तुतः रामचंद्रास दण्डकारण्याकडे पाठविण्यास विश्वामित्रच कारण झाला. त्याचा फार दिवसाचा हेतू आज पूर्णपणे तडीस जाणार याबद्दल त्यास आनंदाचें भरतें यावयाचें, त्यास कृतकृत्य वाटावयाचें. परंतु आज त्याच्या मनावर दुःखाची छाया पसरली. उभयता रामलक्ष्मण आणि सीतादेवी यांनीं त्यांस भक्तीनें अभिवादन केलें तेव्हां रामचंद्र म्हणाले.

" आचार्य, आतां चौदा वर्षेपर्यंत आपली भेट नाहीं. तुमच्या आज्ञेनुसार लंकेच्या रावणाचा वध करून आणि दक्षिण भरतखंडांत दिग्विजय करून समुद्रवलयांकित पृथ्वी आर्यांची करीन तेव्हाच चौदा वर्षानंतर आपल्या भेटीचा योग."

"रामा, तूं वनवासास जातोस तेव्हां माझ्या मनास दुःख होत आहे रे ! एखाद्या पित्यास आपल्या मुलाचा विरह जसा दुःखद तशी आज माझ्या मनाची अवस्था झाली आहे. वस्तुतः तूं जागतिक कल्याणाकरितां निघाला आहेस म्हणून आनंद वाटावयाचा. आणि तसा आनंद झालाही आहे. परंतु त्या आनंदावर दुःखाची किंचित् छाया पसरली आहे. आम्ही लहानशा संसाराचा संन्यास घेतला आणि विश्वाचा मोठा संसार करण्यास प्रारंभ केला. तुम्ही आणि येथील हजारोनीं मोजण्याइतका छात्रवर्ग याच्यावर आम्ही पुत्रवत् प्रेम केलें. हजारों ऋषिमुनि आणि राजे माझे भाऊबंद झाले. सीता, उत्तरा, कैकेयी, कौसल्या इत्यादि आर्य स्त्रिया माझ्या लेकी, बहिणी झाल्या. आर्यांच्या उत्कर्षानें मला आनंद वाटूं लागला आणि आर्यांवरील संकटानें मला दुःख होऊं लागलें. मी गुरुकुलें स्थापलीं आणि चालविलीं, राजांना सल्लामसलती दिल्या-असा हा माझा विश्वाचा प्रपंच झाला.-"

" आणि म्हणूनच विश्वामित्र हें आपलें नांव यथार्थ झालें." रामचंद्र मध्येच म्हणाला.

" विश्वाच्या प्रपंचांतील माझा हेतु आतां तडीस गेला आहे. मी आतां निष्काम बनलो आहे. विश्वाचें माझ्या हातून होण्याजोगें कांहीं काम उरलें नाहीं. रामचंद्रा, तूं आपलें स्वीकृत कार्य पूर्णपणें तडीस नेशील. मी आज खरा संन्यासी बनलों. मला आर्यांकरितां किंवा विश्वाकरितां कांहीं करावयाचे उरलें नाहीं. अगदीं अल्प कालांत मी सिद्धाश्रम सोडून निघून जाईन. हिमाचलाच्या निर्जन प्रदेशीं मी माझें शेष आयुष्य घालवीन. चौदा वर्षांनंतर जगलों वाचलों तर तुझ्या आयोध्येंतील स्वागतांत मी निर्विकार मनानें सामील होईन. चौदा वर्षांचा का तुझा सुखाचा जावो."

असें म्हणत असतांना विश्वामित्राचे डोळे भरून आले होते. इकडे राम, लक्ष्मण आणि सीता यांचेही नेत्र भरून आले होते.

धन्य आचार्य विश्वामित्र आणि धन्य त्याचा शिष्य रामचंद्र ! !

# १७

हिऱ्या माणकांनीं सजविलेल्या राजवाड्यांत विलासांत लोळणारा, अनेक चाकर नोकरांनीं परिवेष्टित आणि हत्ती, अश्व, रथ इत्यादि वाहनांनीं समृद्ध असा सम्राट खरा सुखी, का वन्य प्रदेशांत झोपडी-तून राहणारा स्वावलंबी मुनि जास्त सुखी ? या प्रश्नाचें उत्तर वाचकहो, तुम्हांपैकीं कोणासहि देतां येणार नाहीं ! एक सम्राटानें तरी या प्रश्नाचें उत्तर द्यावें अगर निर्धन तपोनिधीनें तरी द्यावें.

वैभवशाली सम्राट् म्हणेल, ' माझ्या या रत्नखचित मुकुटाखालीं असलेलें डोकें अत्यंत चिंता आणि काळज्या यांनी भरलेलें आहे. मी तका प्रजापालनदक्ष आहें तरी लोक काय बोलतात याची दारुण चिंता मला आहेच. शिवाय एवढी मोठी धनसंपत्ति केव्हां नाहींशी होईल, केव्हां कोणता शत्रु निर्माण होईल याची अतिशय काळजी मला वाटते. ' तो म्हणेल, ' या परांच्या गाद्या मला शल्यासारख्या बोचतात. मिष्टान्नाचा सोन्यासारखा घास मला अप्रिय वाटतो आणि चाकर नोकरांचा गलबला मला असह्य होतो. ' समाधानी वृत्तीचा तपस्वी नेमकें याच्या उलट उत्तर देईल. तो म्हणेल, ' माझ्या साध्या-सुध्या आश्रमांत गवताच्या चटईवर मला सुखानें झोंप येते. स्वाव-लंबनानें मिळविलेलें रुचकर अन्न व गोड फळें ही माझी क्षुधा तृप्त करतात. मी मन मानेल तेथें आणि मन मानेल तसा विहार करतों. माझी सुखाची पूर्तता होण्यास कशाचीहि वाण आहे, असें मला वाटत नाहीं. ' सम्राट आणि तपस्वी यांचीं परस्परविरोधी उत्तरें ऐकून वाचकहो, तुम्हांस आश्चर्य वाटेल परंतु सम्राटाचीं सुखें भोग-णारा अयोध्येचा राम-राजीवलोचन राम-हल्लीं संन्याशाचें वित्तहीन जीवन कंठीत आहे. तोच या प्रश्नाचें समर्पक उत्तर देऊं शकेल.

या वेळीं वसंतऋतु रानावनांतून, डोंगरकपारींतून, दऱ्याखोऱ्यांतून यथेच्छ विहरत होता. चित्रकूटची अप्रतिम सृष्टिशोभा नेत्रांस आल्हाद देत होती. वनवासी राम, लक्ष्मण आणि सीता यांचा वनवासांतील

पहिला मोठा मुक्काम चित्रकूट पर्वतावर होता. विंध्यपर्वत म्हणजे सृष्टिसौंदर्याचें माहेरघर. त्यांतून चित्रकूट पर्वत म्हणजे सृष्टीसुंदरीचा जामदारखाना. तेथील अप्रतिम सृष्टिसौंदर्य पाहून रामचंद्रानीं व्यास ऋषींच्या आग्रहास मान दिला आणि लवकरच येणारा पावसाळा तेथें व्यतीत करण्याचें मुक्रर केलें. त्यांच्याकरतां एक विस्तीर्ण आश्रम तयार करण्यांत आला आणि तो अयोध्येचा वैभवशाली राजवाड्यांत राहणारा राम आनंदानें गवताच्या झोपडींत राहूं लागला. मंदाकिनीच्या स्फटिकवत् प्रवाहांत मनमुराद स्नान करावें, आम्र, द्राक्षें, इत्यादि लक्ष्मणानें आणलेल्या ताज्या व रुचिर फळांचा आस्वाद वैदेही सीतेसह घ्यावा, सीतादेवीनें तयार केलेल्या रुचकर अन्नाचें दुपारीं भोजन करावें, नानाविध प्रकारच्या वृक्षांच्या गर्द छायेखालीं दोनप्रहरची विश्रांति घ्यावी, व्यास मुनींशीं व इतर तपस्व्याशीं धर्मविषयक अनेक विषयांची चर्चा करावी, सायंकाळ तेथील सृष्टीदेवतेचे विलास पाहण्यांत घालवावा; आणि सीतादेवी व लक्ष्मण यांच्याशीं विनोदानें भाषण करीत गवताच्या बिछान्यावर सुखनिद्रा घ्यावी, असें सुखाचें जीवन रामचंद्र वनवास काळांत घालवीत होता. त्यानें आल्याबरोबर अल्प काळांत चोरटे हल्ले करणारे नरमांसभक्षक असे रानटी राक्षस मारले आणि आपला दरारा निर्माण केला. तेव्हांपासून पुन: चित्रकूटावर राक्षसांचा चोरटा हल्ला झाला नाहीं. व्यासमुनींचीं धर्मकृत्यें यथासांग पार पडूं लागलीं आणि खुद्द व्यास मुनि व इतर त्यांचे आश्रमवासी तपस्वी परमाल्हादित झाले आणि रामचंद्रास मोठ्या आनंदानें भजूं पुजूं लागले.

रामचंद्रास विचारलें कीं, 'तुझें सार्वभौम राजाच्या राजवाड्यांतील जीवन सुखी का गवताच्या पर्णकुटींत रहात असणारें जीवन सुखी?' तर रामचंद्र काय उत्तर देईल याचा वाचकांनींच विचार करावा. फाजील गरजा पूर्णपणें नाहींशा झाल्या आहेत आणि साधेंसुधें जीवन समाधानानें कंठीत आहे. ना राज्यकारभाराची चिंता, ना लोकानुरंजनाची काळजी; असें निरामयतेचें आयुष्य रामचंद्राच्या सुखमयतेंत भर घालत होतें. अशा रीतीनें दोन महिने व्यतीत झाले. सृष्टिसुंदरीनें निराळा विलास सुरू केला. अभ्राच्छादित नग दृग्गोचर होऊं

लागले; आणि आतां पर्जन्यकाळ सुरू झाला. आकाशांतून पर्जन्याच्या सरी पडूं लागल्या. एके दिवशीं सूर्योदयाच्या सुमारास एक मोठी सेना आपणांकडे चाल करून येत आहे असें लक्ष्मणास वाटलें. त्यानें धनुष्यास बाण जोडला. आणि रामचंद्रास सांगितलें,

" हा अयोध्येचा हल्लीचा राजा भरत आपल्यावर चाल करून येत आहे. धनुष्यबाण हातीं घ्या आणि शत्रूवर वेळींच शरसंधान करा. "

तेव्हां रामचंद्र म्हणाले,

" हा भरत मित्रभावानें आपणाकडे येत आहे. वसिष्ठ, वामदेव व वृद्ध सुमंतहि त्यांच्याबरोबर आहेत. कित्येक राजस्त्रियाहि दृग्गोचर होतात. भलतेंच करूं नकोस. मित्र आणि शत्रू ओळखण्यास शिकलें पाहिजे. "

अल्पकाळांत शोध काढीत काढीत रामचंद्राच्या आश्रमाजवळ भरत ससैन्य येऊन पोहोंचला. त्यानेंहि वल्कलें परिधान केलीं होतीं आणि जटा वाढविल्या होत्या. त्यानें रामाच्या पायावर डोकें ठेवलें. त्यास उचलून हृदयाशीं धरून रामचंद्रानें प्रश्न केला,

" बाळा भरता, तूं सुखरूप आहेस ना ? बाबांची प्रकृति क्षेम आहे ना ? तुझा युवराज-अभिषेक पार पडला ना ? "

हें ऐकतांच कौसल्यादि मातांनीं दुःखानें हंबरडा फोडला. वृद्ध सुमंतहि शोकाकुल झाले. राजपुत्र भरत यास इतकें दुःख झालें कीं त्यास बोलतांहि येईना ! तेव्हा वसिष्ठ मुनींनीं सर्व खुलासा केला. ते म्हणाले,

" रामा, तूं वनवासांस गेल्यापासून बारा दिवसांनीं तुझा पिता स्वर्गवासी झाला. तुझ्या विरहानें विव्हळ होऊन, ' हा रामा, हा लक्ष्मण, हा सीते ' असें म्हणत त्यानें देह ठेवला. "

उभयता रामलक्ष्मण व सीता यांस फार दुःख झालें. हे दुःखी बंधू स्नानास मंदाकिनीवर गेले; आणि स्नानें वगैरे आटोपल्यानंतर त्या दोघा बंधूंनीं आपल्या पित्याच्या स्मृतीस अर्घ्य दिला. त्या दिवशीं त्यांनीं भोजन केलें नाहीं. चतुरंग सेना, आलेल्या सर्व स्त्रिया, सुमंतादि मंत्री, वसिष्ठ, वामदेव व राजपुत्र भरत यांचें आतिथ्य

व्यास मुनींनीं केलें. दोनप्रहरीं रामाच्या आश्रमांत राजपुत्र भरत, सुमंतादि मंत्री, राजमाता कौसल्यादि स्त्रिया, वसिष्ठ, वामदेव हे आले. रामलक्ष्मणांनीं आपल्या मातांच्या पायावर डोकें ठेवलें. वसिष्ठ, वामदेव यांना अभिवादन केलें आणि भरत काय म्हणतो तें सचिंत मनानें ऐकूं लागले.

तेव्हां भरत म्हणाला,

" माझ्या कुलकलंकी आईनें केवळ सापत्नभावानें तुम्हांस वनवास दिला. तेव्हां मी व शत्रुघ्न मातुलगृहीं होतों. पुढें पूज्य पिताजी ' राम, राम ' असा जप करीत तुझ्या विरहानें मृत्युमुखीं पडले. या हकीकती आम्हांस न कळवितां आचार्यांनीं आम्हांस अयोध्येस बोलावून घेतलें. अयोध्येस आल्यानतर माझ्या कृष्णसर्पिणी आईचें कारस्थान मला समजलें.पित्याच्या निधनवार्तेनें मला दुःख झालेंच; पण रामचंद्रा, तुझ्यासारख्या सत्वप्रधान माणसाचा छळ ऐकून मला परमावधीचें दुःख झालें.जी अयोध्या नगरी पित्यानें सोडली, तुमच्यासारख्या बंधूनें सोडली, त्या अयोध्या नगरीचा त्याग करून मी शरयूकाठीं नंदीग्रामीं आलों आणि तुमच्याप्रमाणें मीहि व्रतस्थ राहून संन्याशी मुनीचें जीवन कंठीन अशी प्रतिज्ञा केली आणि हीं वल्कलें परिधान केलीं. तेव्हां मला नंदीग्रामीं येऊन मंत्री सुमंत आणि आचार्य वसिष्ठ यांनीं अयोध्येस चलण्याबद्दल विनंति केली· तेव्हां हें राजसिंहासन रामचंद्राचें आहे,हें स्वीकारण्याकरतां रामचंद्रास परत घेऊन येऊं या, असें म्हणून मी त्यांना घेऊन आलों. रामचंद्रा, तुझ्या राजाभिषेकाच्या तयारीसह आम्ही येथें आलों आहोंत.आमच्या विनंतीचा आदर कर आणि आमच्याबरोबर परत अयोध्येस चल."

त्यावर रामचंद्रानें अत्यंत विनयभावानें भरताच्या विनंतीचा अव्हेर केला. तो म्हणाला,

" वृद्ध पिताजींनीं मला चौदा वर्षांचें वनवासाचें राज्य बहाल केलें आहे; व तुला अयोध्येचें राज्य दिलें आहे. हे त्यांचे शब्द खोटे होतील असें वर्तन दोघानींही करूं नये. राघव कुलांतील पुरुष आपल्या वचनाचा प्रतिपाल करण्याकरतां मरणहि पत्करतील. याकरतां भरता, तूं अयोध्येस जा आणि तेथील राज्य कर. "

त्यानंतर रामाचें मन वळविण्याचा प्रयत्न वृद्ध सुमंत आणि भरत यांनीं केला. परंतु सत्यवचनी राम आपल्या वचनापासून थोडाहि ढळला नाहीं. अखेर भरत विनंतिपूर्वक म्हणाला,

" बन्धो, हें तुमचें राज्य म्हणून मी चालवितों. नंदीग्रामीं व्रतस्थ राहून, काषाय वस्त्रें परिधान करून केवळ तुमच्या शब्दांकरितां मी हें राज्य करीन. चौदा वर्षानंतर एक घटिकाहि तुम्ही परत न आल्यास मी अग्निकाष्ठें भक्षण करीन. द्या, तुमच्या त्या पादुका द्या."

असें म्हणून भरतानें रामाच्या पादुका आपल्या हातानें घेतल्या आणि त्यास त्रिवार नमस्कार करून त्या आपल्या डोक्यावर धारण केल्या आणि म्हणाला—

" ह्या आपल्या पादुका राजसिंहासनावर अभिषिक्त होतील. त्यांचा दास म्हणून मी चौदा वर्षें राज्य करीन.'

भरताच्या बंधुप्रेमाचें हें जिवंत उदाहरण होतें. या सात्त्विक प्रेमाबद्दल सर्वांच्या डोळ्यांत अश्रू आले. " भरता, तूं सुखी हो ! " असा रामचंद्राचा अखेरचा निरोप घेऊन भरत चतुरंग सेनेसह अयोध्येस परत निघाला. रामचंद्रहि दोन दिवसांनीं दक्षिण दिशेकडे जाण्यास निघाले. त्यांचा एकाएकीं बदललेला विचार पाहून व्यास-मुनीस आश्चर्य वाटलें.

तेव्हां रामचंद्र म्हणाले,

" मी येथें राहिलों तर अयोध्येचे नागरिक येथें वारंवार येतील आणि माझा येथील आश्रम अयोध्या नगरी बनेल. माझें स्थान माझ्या आप्तेष्टांना कळलेलें बरें नव्हें."

नंतर राम, लक्ष्मण आणि सीता दक्षिणेकडील निबिड अरण्यांत शिरले. अत्रीऋषींच्या आश्रमापर्यंत येण्यास त्या राजकुलीन संन्याशांना दोन दिवस लागले. वृद्ध अत्री ऋषींनीं रामचंद्राचा मोठा सत्कार केला. विश्वामित्राच्या सिद्धाश्रमांत इतर ऋषिसमवेत अत्रिऋषि आले होते. तेव्हां रामचंद्राचा वनवास-हेतु किती उदात्त आहे हें त्यांना समजलें होतें. त्यांनीं परमादरानें रामचंद्राची पूजा करून त्यास आपल्या आश्रमांत ठेवून घेतलें. रामचंद्रांनीं अत्री ऋषीस राक्षसां-

पासून कसा उपद्रव होतो याची माहिती विचारली. ती समग्र ऐकल्यानंतर आपल्या पंधरा दिवसाच्या मुक्कामांत तेथल्या आश्रमवासी ऋषींना निश्चित केलें. नरमांसभक्षकांचे चोरटे हल्ले आपल्या शरसंधानानें त्यांनीं नाहींसे केले. पंचवीस राक्षसांची टोळी त्यांनीं यमसदनास पाठविली; तेव्हां अत्रीऋषि परम आल्हादित झाले. त्यांनीं उभयता राम लक्ष्मणास अनेक शुभाशीर्वाद दिले. अत्रिपत्नी सती अनसूया सीतेस गौरवून म्हणाली, " धन्य तुझ्या सतीत्वाची! नवऱ्याच्या संकटकाळींहि तूं त्याच्या जवळ राहून त्याची सेवा करतेस. तूं खरी सति. " असें म्हणून सीतेस पोटाशीं धरून आपल्या तपःसामर्थ्यानें मिळविलेलीं दिव्य वस्त्रें, दिव्य अलंकार, दिव्य माला आणि दिव्य अंगराग हीं सीतेस अर्पण केली.

रामाचा पुढील मुक्काम शरभंग ऋषींच्या आश्रमांत झाला. शरभंग ऋषी आतुरतेनें रामचंद्राची वाट पहात होते. उभयता राम–लक्ष्मणाचें स्वागत करून ते म्हणाले, " मला स्वर्गांत घेऊन जाण्याकरतां इंद्रानें विमान आणलेलें आहे. परंतु तुमचें स्वागत केल्याशिवाय स्वर्गांत येतां येत नाहीं असें इंद्रास सांगितलें आहे. तें पहा इंद्राचें विमान. ब्रह्मर्षि विश्वामित्र हे माझे संन्याशावस्थेंतील मित्र. त्यांनीं तुम्हांस धनुर्विद्या शिकवून युद्धपारंगत केलें आणि रावणवधाकरितां चौदा वर्षांच्या वनवासाची योजना करून तुम्हांस त्यांनीं कार्यप्रवृत्त केलें. स्वर्गांत इंद्राच्या विमानांतून जाण्याचा त्यांचा पहिला हक्क; परंतु आपण रावण–वधानंतर रामचंद्रास अयोध्येंत दर्शन देऊन नंतरच येऊं असें त्यांनीं इंद्रास सांगितलें. त्यानंतर स्वर्गांत जाण्याचा दुसरा मान माझा असल्यामुळें विमान माझ्याकडे आलें आहे. "

"तपोनिधि, आचार्य आतां कोठें आहेत ? " रामचंद्रानें प्रश्न केला.

" विश्वामित्र हिमालयाच्या उत्तुंग शिखरावर राहत असून ते दिव्यदृष्टीनें तुम्हा आम्हांस हल्लीं पाहत आहेत. " उभयता रामलक्ष्मणांनीं उत्तरेकडे तोंड करून आचार्य विश्वामित्रास नमस्कार केला. तेव्हां शरभंगऋषि म्हणाले, " रामा, मी गेल्यावर माझें तपोवन निराश्रित होणार आहे. त्यास आश्रयदाता हो. येथील तपस्वीजन

तुझ्या आगमनाची 'वाट पहात आहेत." असें म्हणून उभयता राम-लक्ष्मणांस पुन्हा नमस्कार करून शरभंग ऋषींनीं अग्निप्रवेश केला. त्यांना दिव्य शरीर प्राप्त झालें आणि त्या शरीरासह शरभंग ऋषि विमानांत बसून स्वर्गांत गेले.

रामचंद्रानें शरभंग ऋषींच्या आश्रमांत राहून सबंध वर्षाकाळ तेथेंच काढला. अनेक राक्षसांस मारून नरमांसभक्षकांचे चोरटे हल्ले बंद केले. तेथें पूर्ण निरायमतेचें साम्राज्य नांदूं लागलें. तेथें असतांना आसपासचे अनेक ऋषिमुनि त्यांच्याकडे आले. त्या सर्वांच्या आश्रमांत जाऊन राक्षसांच्या त्रासापासून त्यांना मुक्त केलें. असें करण्यांत रामचंद्राचीं दहा वर्षें व्यतीत झालीं. या दहा वर्षांत विंध्याद्रीच्या उत्तरेस जाणारीं अनेक विमानें आलीं. रामचंद्रानें शरसंधानानें त्यांचा आकाशमार्ग बंद पाडला. तेव्हा तीं सर्व विमानें आलीं तशीं परत गेलीं. अलीकडे चार वर्षांत उत्तरेकडे जाणारें एकहि विमान दृग्गोचर झालें नाहीं. दहा वर्षानंतर रामचंद्र अगस्ति ऋषींच्या आश्रमांत प्राप्त झाले. विंध्याद्रीच्या दक्षिणेकडे येणारे पहिले आर्य म्हणजे अगस्ति ऋषि. आचार्य अगस्तीची योग्यता रामचंद्र ऐकून होते. त्यांचें तपः-सामर्थ्य अचाट होतें, ज्ञान विशाल होतें आणि त्यांच्या तपःसामर्थ्याचा दरारा मोठा होता. त्यांच्या शापोक्तीस भिऊन त्यांच्या आश्रमाच्या आसपास नरमांसभक्षक मुळींच फिरकत नसत. रामचंद्रांनीं अगस्ति ऋषींच्या आश्रमांत एक वर्षभर विश्रांति घेतली. तेव्हा त्यास कळून आलें कीं, हे नरमांसभक्षक राक्षस दण्डकारण्यांतच वास करतात. लंकेच्या रावण-राज्यांत त्यांच्या असुरी खाण्यापिण्याची फार निंदा झाली. तेव्हां लंकेचा राजा रावण यानें सर्व नरमांसभक्षकांस लंकेंतून हद्दपार केलें. हद्दपार झालेले लोक दण्डकारण्यांतील जनस्थानांत येऊन राहिले आहेत. ही हकीकत कळल्यानंतर शेंकडों राक्षसांचा आपण वध केला असून अद्याप रावण त्याचा सूड घेण्याकरिता कां येत नाहीं याचें खरें कारण रामचंद्रास समजलें.

वनवासाचीं बाकीचीं वर्षें कोठें काढावींत असा अगस्ति ऋषींस रामचंद्रांनीं प्रश्न केला. तेव्हां त्यांनीं सांगितलें, "जवळच गोदावरी तीरीं पंचवटी नांवाचें रम्य स्थान आहे. तेथें शेष वनवासकाळ

काढ." अगस्ति ऋषींचा निरोप घेऊन रामचंद्र पंचवटीस आले. लक्ष्मणानें एक आश्रम तयार केला. तेथें राम, लक्ष्मण, सीता आनंदानें कालक्रमणा करूं लागले.

पंचवटीस आल्यानंतर थोड्याच दिवसांत रामचंद्रास एक त्यांच्या बापाच्या वेळचा जुना मित्र भेटला. जटायुनें आपली सर्व हकिकत रामास विदित केली आणि तुम्ही मृगयेस गेल्यानंतर सीतेचें संरक्षण करण्याकरितां मी येथें राहतों, अशी त्यांना आग्रहाची विनंती केली. विनंतीचा अत्यादरानें स्वीकार झाला आणि वृद्ध जटायु आश्रमानजीकच्या झाडावर बसून: रामलक्ष्मणाच्या गैरहजेरींत तेथील पहारेकरी बनला.

* * *

रामाच्या वनवासकाळांतील प्रारंभीचीं १२ वर्षें अशा प्रकारें व्यतीत झालीं.सूर्यास पृथ्वीनें बारा वेळां प्रदक्षिणा केली. साळीचीं शेतें बारा वेळां हिरवीं गार दिसलीं आणि फळदायी झालीं. आम्रवृक्ष बारावेळां सुगंधित मोहोरांनीं प्रफुल्ल दिसले. आणि फलदायी झाले. वसंतऋतूचें आगमन बारा वेळां झालें. आतां लक्ष्मण आपल्या वनवासाचा काळ दोन वर्षांचा राहिला असें म्हणूं लागला. सीतादेवी परमाल्हादित होऊन दोन वर्षांनीं आपण पुन्हा अयोध्येस जाऊं असें लक्ष्मण भाऊजीस सांगूं लागली. सायंकाळचा शीतल वारा सुटला होता. गोदावरीतीरावरून वाहत आलेला थंड वायु मनास तोषवीत होता. एका गर्द छायेच्या आम्रवृक्षाखालीं रामचंद्र, लक्ष्मण आणि सीता वायूनें आणलेला पुष्पाचा परिमल घेत बसले होते.

"आतां यानंतर दुसऱ्या वसंतऋतूस आपण अयोध्येच्या आसमंतांत आनंदानें विहरूं आणि त्या वेळीं हा जटाभार नष्ट होऊन तेथें सुंदर राजमुकुट चमकूं लागेल." सीतादेवी आतां पूर्वींचे दिवस आठवूं लागली. त्या वेळीं रामचंद्र म्हणाले, "तुम्हांस वनविहार प्रिय होता ना? अयोध्येस परत जाण्याची इच्छा तुमच्या मनांत कां उत्पन्न होऊं लागली?"

त्यावर लक्ष्मण म्हणाला,

" रामचंद्रा, वनवासकाळांतील बारा वर्षे संपलीं आहेत. दोन वर्षांचा काळ शिल्लक राहिला. वहिनीस पूर्वीच्या आयुष्याची आता आठवण व्हावी, यांत वावगें काय झालें ?"

" लक्ष्मणा, आपल्या स्वीकृत कार्यास अद्याप प्रारंभहि झाला नाहीं. रावणवध केल्याशिवाय आपणास अयोध्येस कसें परततां येईल ? चौदा वर्षांची कालमर्यादा आपल्या या संन्यस्त जीवनास प्रिय मातोश्री कैकयीनें घातली. चौदा वर्षांत रावण-वध होईल हें अनुमान आचार्य विश्वामित्र यांनीं केलें. परंतु 'आपण रावण- वध झाल्याशिवाय परत जाणार नाहीं' अशी प्रतिज्ञा ब्रह्मर्षि विश्वामित्र, महर्षि नारद यांच्यासमोर सिद्धाश्रमांत असतांना केली. ती आपणास पुरी केली पाहिजे. मग याला चौदा वर्षांचा काल अपुरा झाला तरी हरकत नाहीं. चौदा वर्षांनंतरही रावणवध होईपर्यंत येथें आपणास रहावें लागल." रामचंद्राच्या या शब्दामुळें सीतेचें औत्सुक्य कमी झालें. लक्ष्मण खिन्नतेनें स्तब्ध बसला.

इतक्यांत एक सुंदर रूपवती स्त्री विविध अलंकार घातलेली त्यांच्या समीप आली आणि रामचंद्राकडे निर्लज्जपणें पहात उभी राहिली. ती कांहीं वेळानें आनंदातिशयानें अंगविक्षेप करीत रामचंद्रास म्हणाली, हे सुंदर तरुण पुरुषा, तूं आपल्या रूपसंपन्नतेनें मला मोहित केलेंस. हा तुझा तारुण्याचा काळ ऐश्वर्यशाली महालांत आणि रुपसंपन्न स्त्रियांच्या संगतींत जावयाचा; असें असून तूं वल्कलें कां धारण केलीं आहेस ? जटाभार कां वाढविला आहेस ? अशा निर्जन स्थानीं तूं वास्तव्य कां करीत आहेस ? मी ऐश्वर्यशाली रावण सम्राटाची बहीण. माझें नांव शूर्पणखा. खर आणि दूषण या माझ्या सख्या भावांसह मी येथें रहातें. हा दण्डकारण्याचा सर्व भाग दक्षिणेकडील समुद्रापर्यंत आम्हांस चरण्यास रावणानें दिला आहे. रावण माझा चुलतभाऊ. बोल,माझ्या मनांतील इच्छा तूं पुरी करणार आहेस ना ? तुला रावणाच्या दरबारीं नेईन. तेथें तुझा मोठा गौरव होईल. तूं व मी आनंदानें व वैभवानें लंकापुरींत राहूं "त्यावर रामचंद्रानें स्मित केलें. तिला आपला जरूर तेवढा इतिहास सांगितला आणि म्हणाला,

" हे उन्मत्त स्त्रिये, जरा दूर रहा. ही माझी पत्नी माझ्याजवळ आहे. एकपत्नीत्वाची मी प्रतिज्ञा केली आहे. हें तुझें वर्तन माझ्या पत्नीस आवडणार नाहीं."

" तसें असेल तर आतांच मी तिचा वध करतें आणि मग आपण वनभर विहार आनंदानें करूं." असें म्हणून शूर्पणखा रामाच्या अधिकच समीप गेली आणि सीतेकडे क्रूरपणानें पाहूं लागली. तेव्हां रामानें क्षणभर विचार केला–' रावणवधास पुरेशी कुरापत काढण्याची संधी आपणास मिळाली आहे.' असें आपल्या मनांत ठरवून तो म्हणाला, " उद्दाम स्त्रिये, तुझें अनीतिमूलक भाषण बंद केलें पाहिजे. लक्ष्मणा, हिला विद्रूप कर." लक्ष्मणानें रामाचा हेतू जाणला आणि शूर्पणखेचें नाक व कान छेदून टाकले. तेव्हां भयभीत झालेली ती शूर्पणखा रक्तबंबाळ होऊन तेथून रडत ओरडत पळाली. त्यानन्तर राम म्हणाले, " आतां कलहास सुरुवात होईल आणि रावणवधाचा अवसर आपणास प्राप्त होईल. वैदेही, तुला दोन वर्षांनीं अयोध्येस परत जावयाचें आहे ना ? विधिघटनेमुळें तोहि सुप्रसंग आपणास लवकरच लाभेल." नंतर तो लक्ष्मणाकडे वळून म्हणाला, "लक्ष्मणा, यापुढें अधिक सावधगिरी ठेवली पाहिजे."

शूर्पणखेची ती अनुकंपनीय अवस्था पाहून आणि तिनें रचलेलें रामावरील कुभांड ऐकून तिचा भाऊ खर फार संतप्त झाला व चौदा बलाढ्य राक्षसांस आपल्यासमोर बोलावून शक्य तर राम-लक्ष्मणास बांधून आणण्याचा आणि अशक्य तर त्यांचा वध करून त्यांचीं शिरें आणण्याचा हुकुम त्यानें केला.

" मात्र " तो म्हणाला, "त्यांच्याबरोबर असलेल्या सुंदर स्त्रीस स्पर्शहि करूं नका. तिला माझ्याकडे बंदिस्त करून घेऊन या."

ह्या हुकुमाचें पर्यवसान अगदीं उलट झालें. आपण पाठविलेल्या चौदाहि राक्षसांचा रामानें फन्ना पाडला.' ही हकिकत जेव्हां खर यांस समजली, तेव्हां तो अत्यंत विचारांत पडला आणि हे राम-लक्ष्मण आहेत तरी कोण, लढतात तरी कसे, याची माहिती त्यानें मिळविली. तेव्हां गेल्या बारा वर्षांत जे जे राक्षस मारले गेले आहेत; ते सर्व यांनींच मारले आहेत; ते मोठे शौर्यशाली असून ऋषिमुनींचे

मित्र आहेत, असें त्याला समजलें. तेव्हां जनस्थानांत राहणाऱ्या सर्व राक्षसांस बरोबर घेऊन चलण्याबद्दल त्यानें आपला सेनापति व बंधू दूषण यांस आज्ञा केली. हजारों राक्षस खर आणि दूषण यांच्या अधिपत्याखालीं रामावर चालून आले.

लक्ष्मणास सीतेचें रक्षण करण्यास ठेवून त्या असंख्य राक्षसांशीं एकटा राम युद्ध करूं लागला. तो अवर्णनीय युद्धप्रसंग आकाशांतील देव, दानव पाहूं लागले. रामाचें अचूक शरसंधान पाहण्याची हीच वेळ होती. शेवटीं खर–दूषणासह त्या असंख्य राक्षसांस रामानें आपल्या शरसंधानानें बळी घेतलें. तेव्हां 'फार उत्तम, फार उत्तम' असा जयध्वनि आकाशांतील देवांनीं केला आणि रामचंद्रावर पुष्पवृष्टि केली. या लढाईनें नरमांसभक्षक राक्षसांचा पूर्णपणें फडशा उडाला आणि 'भरतखंडाचा दक्षिण विभाग वसाहत करून पूर्ण आपलासा करूं' असें म्हणणाऱ्या ऋषिमुनींना पूर्ण निरामयतेचें आयुष्य प्राप्त झालें.

जनस्थानच्या नरमांसभक्षकांचा एकट्या रामानें पूर्ण निःपात केला, ही बातमी थोड्या वेळांत दक्षिण भरतखंडभर पसरली. आतां याचें उट्टें काढण्याकरितां रावण सूड घेण्याच्या बुद्धीनें लवकरच युद्धास येईल किंवा शूर्पणखा या युद्धप्रसंगाचा वणवा पेटवील असें उभयतां रामलक्ष्मणांस वाटूं लागलें. ते जास्त सावधगिरीनें राहूं लागले. रावणाशीं युद्धप्रसंग होतां होईतों त्याच्या राज्याच्या बाहेर येथेंच घडून यावा म्हणजे रावणाच्या असंख्य सैन्याशीं लढावें लागणार नाहीं असें वाटून रामचंद्र रावणाची मार्गप्रतीक्षा करूं लागले.

या रामचंद्राच्या अतुल यशाचा परिणाम आर्यांच्या उन्नतीच्या दृष्टीनें फार मोठा झाला. ऋषिमुनींच्या मध्यवर्ती संस्थेनें नियोजिलेलें दक्षिण दिग्विजयाचें कार्य बहुतेक सफल झालें. विंध्याद्रीच्या दक्षिणेस ऋषिमुनींच्या वसतिस्थानांवर होणारे नरमांसभक्षकांचे हल्ले पूर्ण लयास गेले आणि त्यांचीं धर्मकृत्यें निर्विघ्नपणें पार पडूं लागलीं. रामचंद्राच्या या अभिनंदनीय यशाचें गौरव करण्याकरतां बहुतेक सर्व दक्षिणनिवासी ऋषींचे प्रमुख पंचवटीस एकत्र झाले. त्यांत

वयोवृद्ध अत्रि ऋषि आणि पुरातन अगस्ति ऋषि प्रमुख होते. अगस्ति ऋषि रामचंद्राचा गौरव करतांना म्हणाले,

" आचार्य विश्वामित्रांची जगद्वंद्य थोरवी कोणीही कबूल करील. त्यांनीं तुम्हांसारख्या अत्यंत योग्य मनुष्याची निवड केली आणि धनुर्विद्या शिकवून त्यांना युद्धपारंगत केलें आणि आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्यावर त्यांना चौदा वर्षांचा वनवासकाळ देऊन त्यांना कार्यप्रवृत्त केलें. आतां दक्षिण भरतखंडांत निरामयतेनें आर्यांची वस्ति वाढूं लागेल. आर्यांचीं गांवें, शहरें निर्माण होतील. धन्य ते विश्वामित्र आणि त्यांचे शिष्य तुम्ही रामलक्ष्मण ! "

अगस्ति ऋषींच्या अभिनंदनाच्या शब्दास रामचंद्रानें स्मित करून आपली संमति दर्शविली.

●

# १८

हल्लींच्या दरिद्री जमान्यांत वावरणाऱ्या कोणत्याही मनुष्यास लंकाधिपति रावणाच्या विलासांची पुसटही कल्पना येणार नाहीं.

वाल्मीकींनीं आपल्या मोठ्या ग्रंथांत रावणाच्या विलासाची साधनें कोणतीं होतीं याचें वर्णन दिलें नाहीं. तुलसीदासाच्या रसाळ रामायणांतही याचा लेशमात्रही उल्लेख नाहीं. लंकापुरी सोन्याची बनवून तेथील सुखसाधनें समृद्ध करून तेथें सम्राट् म्हणून रावण परम ऐश्वर्य भोगत होता. पांचपंचवीस परिचारिका, कोणी विंझण वारा घालीत, कोणी तांबूलकरंडक घेऊन, कोणी अत्तरगुलाब घेऊन, कोणी सुस्वर गाणीं म्हणून, कोणी त्याच्या झुलत्या पलंगास झोका देऊन अशा प्रकारच्या विविध विलासाचे कार्यक्रम करीत रावणाच्या ऐश्वर्यशाली पलंगाभोवतीं जमलेल्या होत्या. त्यांतून वाट काढीत शूर्पणखा रोदन क ीत तेथें आली आणि रावणास म्हणाली,

"बन्धो, तुझे भाऊ खर आणि दूषण हे मारले गेले. जनस्थानांतील सर्व राक्षसांचा फडशा पडला. आता एकही आपल्यापैकीं राक्षस जनस्थानांत राहिला नाहीं."

तेव्हां 'हें कसें घडलें', अशी रावणानें पृच्छा केली. त्यावर रावणास रुचेल असें असत्य सांगण्यास ती दुष्ट शूर्पणखा तयार झाली. ती म्हणाली,

"बन्धो, तूं एवढा विलासप्रिय आहेस. परंतु तुझ्या इतमामास शोभेशी एकही स्त्री ह्या तुझ्या जनानखान्यांत नाहीं. तुला सर्वस्वी शोभेल अशी सुंदर स्त्री माझ्या दृष्टीस पडली. गोदावरी नदीच्या काठीं पंचवटी नांवाचें एक रम्य स्थान आहे. तेथें तें अप्रतिम सौन्दर्य मला दिसलें. ती लावण्यवती स्त्री तुझ्याकडे आणावी म्हणून मी प्रयत्न करीत होतें. हें तिच्या नवऱ्यास कळलें. तेव्हां त्यानें आपल्या बंधूकडून मला विद्रुप करून सोडलें. माझ्या ह्या अपमानित अवस्थे-बद्दल माझे बंधू खर व दूषण हे ससैन्य त्यांच्यावर चालून गेले. परंतु एका शूर माणसानें त्या प्रचंड सेनेचा खर-दूषणासह नाश केला. त्या मनुष्याचें नांव राम असून लक्ष्मण नांवाचा त्यास सहोदर आहे. युक्ती-प्रयुक्ति करून त्या सुंदर स्त्रीस तूं आपल्या महालांत आणून ठेव. असें करतांना त्या अत्यंत शूर मनुष्याशीं गांठ आहे हें लक्षांत ठेव."

विषयलंपट व स्त्रैण बनलेल्या रावणास परमाल्हाद झाला आणि 'कोणत्याही युक्तीनें त्या सुंदरीस मी माझी राणी करतों' असें बोलून रावण उठला आणि मारीच नांवाच्या एक कपटपटु राक्षसाची त्यानें सल्ला घेतली, तेव्हां मारीच म्हणाला,

"उभयतां रामलक्ष्मण फार शूर आहेत. मी विश्वामित्राच्या आश्रमांत यज्ञास व्यत्यय करण्यास गेलों होतों तेव्हां रामचंद्रानें एकाच बाणानें पराभूत केलें. तूं त्याची पत्नी हरण करण्याचा प्रयत्न करूं नकोस. तसें केल्यास तुझा प्रचंड सूड घेतल्याशिवाय राम राहणार नाहीं. लंकापुरी जाळील, लंकेचें राज्य पालथें उलथें करील, तुझा प्रचंड राक्षससमूह यमसदनास पाठवील आणि प्रसंगीं तुझ्या प्राणावरही बेतेल. तरी हें अमंगल धाष्टर्य करूं नकोस."

मारीचाची रावणानें निंदा केली ' आणि यःकश्चित मनुष्य राम तो काय, आणि तो समुद्र उल्लंघन करून आमच्याशीं युद्ध करण्यास कसा येणार ? ' असें म्हणून प्रयत्नानें त्यानें कपटपटु मारीचास सामील करून घेतलें. दोघांनीं एका कपटनाटकाची उभारणी केली आणि ते दोघे आकाशमार्गानें पचवटीस रामाच्या आश्रमाजवळ आले. कपटपटु मारीच एक सुंदर रत्नमय मृग बनला. त्या हरणाचीं शिंगें सोन्याचीं होतीं. डोळे हिऱ्यामाणकासारखे चमचम करीत होते. सर्वांग वेगवेगळ्या सुंदर रत्नांनीं बनविलें आहे असें दिसत होतें. त्या मृगास आश्रमांतून पाहून सीतादेवी आश्चर्यचकित झाली. तिनें रामलक्ष्मणास तो मृग दाखवून जिवंत धरून आणावा, न मिळाल्यास शिकार करून मारून तरी आणावें, म्हणजे असली अजब चीज अयोध्येस गेल्यावर तेथील स्त्रियांस दाखवितां येईल असें सांगितलें. 'हा हरिण खरा नाहीं, त्यांत कांहीं तरी कपट आहे. ' असें रामचंद्र म्हणाले. परंतु सीतादेवीचा फार आग्रह पडल्यावरून त्यानें धनुष्यबाण उचलला आणि आश्रम सोडण्यापूर्वी ' कसल्याहि प्रसंगीं सीतादेवीपासून हलूं नकोस ' असें लक्ष्मणास सांगून राम त्या हरणाच्या मागें धांवत गेला. कांहीं वेळानें ' हा लक्ष्मणा ! हा सीते ! ' असा रामाचा आवाज ऐकूं आला. तेव्हां रामाच्या मदतीस लक्ष्मणानें जावें अशी सीतादेवीची लक्ष्मणास आज्ञा झाली. " मला तुमच्या प्रतिपालाकरतां रामचंद्र येथें ठेवून गेला आहे. हा आवाज रामाच्या आवाजासारखा असला तरी तो त्याचा खास नव्हे. हरिणाची शिकार ती काय आणि राम संकटांत सापडतो तरी काय ! " असें म्हणून लक्ष्मणानें तेथून जाण्याची नाराजी दर्शविली. तेव्हां सीतादेवी कोपाविष्ट होऊन वाटेल तीं दुर्वचनें लक्ष्मणास बोलली. तेव्हां निरुपाय होऊन लक्ष्मण रामाच्या मदतीस जाण्यास तयार झाला. तो जातांना म्हणाला,

" रामचंद्रावर प्रेम करण्याचा एकमेव मक्ता सीतादेवीस नाहीं. तिच्याइतकें रामचंद्रावर प्रेम करणारे लोक अनेक आहेत. तथापि केवळ स्त्री हट्ट म्हणून रामचंद्राची आज्ञा मोडून सीतादेवीस एकटी सोडून मी येथून निरुपायानें जात आहें. "

त्यावर सीतादेवी म्हणाली, " जटायुमामंजीचा जागता पहारा आश्रमाभोंवतीं आहे. माझी कांहीं चिंता करूं नका."

लक्ष्मण आश्रम सोडून गेला. तेव्हां आपलें कपटनाटक पूर्ण यशस्वी झालें असें मानून रावण त्रिदंडी संन्याशाच्या वेशांत काषाय वस्त्रें परिधान करून रामाच्या आश्रमांत छद्मी वेषानें शिरला. कोणी संन्यासी दाराशीं आला आहे असें वाटून सीतादेवी त्यास भिक्षा घालण्यास गेली. तेव्हां परम लावण्यवती सीतेस पाहून रावण मोहित झाला आणि तिचा हात पकडून तिला जबरदस्तीनें आकाशमार्गें नेऊं लागला. जटायूनें उंच झाडावरून ही परिस्थिति अवलोकन केली आणि सीतेचें बलात्कारानें हरण करण्यास रावणास विरोध केला. तेव्हां सीतेस तेथें ठेवून रावणानें जटायूशीं दोन हात केले. "म्हाताऱ्या गिधाडा!" तो म्हणाला, " मी लंकाधिपति रावण आहें. तुझ्यासारख्या क्षुद्र प्राण्यानें माझ्याशीं विरोध कां करावा ? तुझ्या अविचारी वर्तनाचीं फळें भोग " असें म्हणून जटायुवर त्यानें तलवारीनें वार केला. जटायु मृतप्राय अवस्थेंत रक्तबंबाळ होऊन जमिनीवर पडला. रावणानें पुनः सीतेस पकडलें आणि तो आकाशमार्गानें क्षणार्धांत दिसेनासा झाला.

कांहीं वेळानें रामलक्ष्मण परत आपल्या आश्रमाकडे आले. त्यांना तो कांचनमय हरिण तर मिळाला नाहींच; परंतु आपणांस कोणी तरी कपटप्रबंधानें फसविलें असें वाटलें. सीतादेवी आश्रमांत नाहीं, जवळ आसपास नाहीं, गोदावरीच्या तीरावरहि नाहीं हें पाहून आपणांस कोणीतरी कपटानें फसविलें अशी त्यांची खात्री झाली. अत्यंत चिंतातुर अवस्थेंत सीतादेवीचा शोध करीत असतांना आसन्नमरण जटायु त्यांच्या दृष्टीस पडला. जटायुचे प्राण अद्याप घुटमळत होते. तो म्हणाला,

" रामचंद्रा, सती सीतादेवीस लंकाधिपति रावण छद्मी वेषानें येऊन जबरदस्तीनें घेऊन गेला. मी त्यास विरोध केला; परंतु माझा प्राण त्या राक्षसानें घेतला."

हा वृत्तांत ऐकून रामचंद्र अत्यंत खेदखिन्न झाले, चिंतातुर झाले आणि दु:खी होऊन शोकाकुल झाले. रामचंद्राचा शोक श्रवण करून जटायु म्हणाला,

" रामा, तूं अत्यंत भाग्यशाली आहेस, शूरही आहेस. रावणानें तुझा अक्षम्य अपराध केला. या अपराधाबद्दल तूं त्याचा सूड घे. शूर आहेस तर लंकेच्या रावणाशीं युद्ध कर. त्या युद्धांत तूं यशस्वी होशील आणि तुला सीतादेवी परत मिळेल. जा, माझा बंधु संपाति नांवाचा एक गरुड आहे. त्यास दिव्य दृष्टि असून रावणाची लंका कोठें आहे हें त्याला अवगत आहे. जा,दक्षिणेकडील एका पर्वतावर तुम्हास त्याचा शोध लागेल." असें म्हणून त्या पक्षीश्रेष्ठ जटायुनें प्राण सोडले. जटायुचें और्ध्वदेहिक मोठ्या प्रेमानें करून रामलक्ष्मण सीतेचा शोध काढीत दक्षिणेस जाण्यास निघाले. मार्गांत सीतेची रत्नमाला पडलेली रामानें अवलोकन केली. त्या मालेस हृदयाशीं धरून राम दु:खी मनानें विलाप करूं लागले. तेव्हां लक्ष्मण हात जोडून म्हणाला, " विलाप करणें आपल्यासारख्या शूरास शोभत नाहीं. विलाप करीत येथेंच बसलों तर कांहीं प्रयत्न होणार नाहीं. सीतादेवी हातची जाईल, आणि रामचंद्रा, तुझी मोठी अपकीर्ति होईल. सीतादेवीस परत मिळविण्याकरतां नव्हे, आपल्या सूर्यवंशास लागलेला हा कलंक धुवून टाकण्याकरतां रामचंद्रा, तुला आपलें मन लोखंडाप्रमाणें कठोर केलें पाहिजे." त्यानंतर रामचंद्रानें शोक सोडला. ते दोघे बंधू सीतेचा शोध काढीत निघाले.

पंपा सरोवराच्या आसपास असणाऱ्या ऋष्यमूक पर्वताजवळ उभयता रामलक्ष्मण आले, तों ' रघुकुल रामचंद्र की जय ' असा जयध्वनि रामचंद्राच्या कानीं पडला. त्या जयध्वनीच्या अनुरोधानें उभयतां राम-लक्ष्मण जाऊं लागले. ते थोडीशी चढण चढून जातात, तोंच वीस पंचवीस आदिवासी एकत्र जमून जयध्वनी करीत आहेत असें रामचंद्राच्या दृष्टोत्पत्तीस आलें.

या अपरिचित लोकांनीं आपला जयघोष कां करावा ? कोठें अयोध्या नगरी आणि कोठें निर्जन अरण्य ? माझा परिचय या

लोकांस कसा झाला ? इत्यादि विचारांनीं रामचंद्र आश्चर्यचकित झाले. त्या लोकांसन्निध जाऊन ते म्हणाले,

" अपरिचित लोकहो, तुम्ही रामचंद्राचा जयजयकार कां करतां ?"

त्याचें भाषण संपत आहे तोंच त्या जमावापैकीं एक मनुष्य धांवत येऊन त्यानें रामचंद्राचे पाय धरले. तो म्हणाला,

" अयोध्येच्या राजपुत्रा, तूं काषाय वस्त्रें कां परिधान केलीं आहेस ? तुझा संन्यस्त वेष पाहून मी तुला एकाएकीं ओळखलें नाहीं. परंतु आतां मी तुला पूर्णपणें ओळखलें. तुझें अप्रतिम सौंदर्य आणि कसलेली देहयष्टि पाहून तूंच रघुकूलभूषण रामचंद्र आहेस अशी माझी ओळख पटली. हा किष्किंधेचा माजी सम्राट राजा सुग्रीव तुम्हांस वंदन करत आहे. "

" हा त्यांचा बलशाली सेनापति हनुमान तुम्हाला अभिवादन करीत आहे. "

त्या दोघांस उठवून रामचंद्र म्हणाला,

" तुम्ही सुखी व्हा. तुम्ही आपल्या नियोजित कार्यांत पूर्ण यशस्वी व्हा. " कांहीं वेळानें रामचंद्र एका झाडाखालीं जाऊन स्वस्थ बसले. तेव्हां तो रामचंद्रास प्रथम नमस्कार करणारा गृहस्थ म्हणाला,

" रामचंद्रा, मी परका नाहीं. मी सिद्धाश्रमांत असतांना अनेक वेळां तुम्हाकडून धनुर्विद्येचें ज्ञान संपादन केलें. माझें नांव अरुण. मी आणि माझा बंधु वरुण आणि दुसरे दोन तरुण यांना आचार्य विश्वामित्रांनीं १२ वर्षांपूर्वी एका महत्वाच्या कामगिरीवर इकडे पाठविलें. तेव्हांपासूनचा काळ आम्ही येथें काढीत आहोंत. "

अधिक खुलासा करण्यास रामचंद्रानें त्यास सांगितल्यावरून तो म्हणाला, " आचार्यांनीं आम्हास सांगितलें कीं लवकरच विंध्याद्रीच्या दक्षिणेस रामचंद्र येईल. त्याच्या सद्‌गुणाची माहिती आम्ही सर्व लोकांस करून द्यावी आणि येथील जनता रामचंद्राचे कार्यास अभिमुख होईल अशी आम्ही येथल्या जनतेंत चळवळ करावी. आणि लंकेचें रावणी राज्य प्रजेस कसें निर्दयतेनें पिळून काढीत आहे हें जनतेस समजावून द्यावें. एवंच रावणासंबंधीं अपकीर्ति आणि तुझ्या-संबंधानें निःस्सीम प्रेम निर्माण करावें. म्हणजे रामचंद्र येतांच

त्याला सर्व जनता अनुकूल राहील. रामचंद्रा, आचार्यांनीं आज्ञापिलेल्या सर्व गोष्टींत आम्ही यश मिळविलें आहे. येथील आदिवासीयांस लंकेचे अधिकारी मर्कट, वानर असें निंदाप्रचुर नांव देतात. यामुळें एवढें बलाढ्य किष्किंधेचें साम्राज्य! परंतु तें व आसपासचीं सर्व राज्यें वानरांचीं आहेत अशी अप्रतिष्ठा झालेली आहे. हा किष्किंधापति सुग्रीव आणि हा त्याचा सेनापति हनुमान यांचें मर्दानी सौंदर्य अवलोकन करा. यांना वानर असें म्हणण्यास कोण तयार होईल ?"

त्यास मध्येंच थांबवून रामचंद्र म्हणाले,

"तुम्ही सिद्धाश्रम केव्हां सोडला ?"

"बरोबर बारा वर्षापूर्वीं फाल्गुन मासीं."

"म्हणजे बाबांच्या कल्पनेंत माझा यौवराज्याभिषेक नव्हता तेव्हां—"

"अगदीं बरोबर !" लक्ष्मण म्हणाला.

तेव्हां रामचंद्र म्हणतो;

"धन्य आचार्यांची विचारशक्ती! त्यांनीं रावणवधाकरतां पूर्वतयारी आंखून ठेवली आहे."

नंतर अरुण म्हणाला, "तुमच्या आगमनाची उत्सुकतेनें आम्ही वाट पाहत आहोंत. अगदीं थोड्या दिवसांपूर्वीं जनस्थानच्या मनुष्यभक्षकाचा तुम्ही पुरा निःपात केलात असें आम्ही ऐकलें आणि अशा रीतीनें विंध्याद्रीच्या दक्षिणेंकडील भरतखंडाचा सर्व भाग तुम्ही दारुण चिंतेंतून मुक्त केला; तेव्हां तुमचें विंध्याद्रीच्या दक्षिणेस आगमन झालें आहे अशी आमची खात्री झाली. नंतर कांहीं दिवसांनीं आकाशमार्गें एक बलाढ्य राक्षस एका सुंदर स्त्रीस घेऊन चालला आहे हें आमच्या दृष्टोत्पत्तीस आलें. ही स्त्री तुमचें नांव घेऊन हृदय फुटेल असा विलाप करीत होती. तिनें जातांना हे आपल्या अंगावरील दागिने येथें टाकले. तिचा उद्देश रामचंद्रा, तुम्हांस तिचा निरोप कळवावा असा होता. तेव्हां हा राक्षस रामचंद्राच्या पत्नीस हरण करून चालला आहे असें आम्हांस वाटलें. तेव्हांपासून तुमची भेट लवकरच घडेल असा आम्हीं अंदाज बांधला. आणि वेळोवेळीं

तुमचा जयघोष करीत आम्ही येथें असे बसून आहोंत. आज आमची मनीषा सफल झाली. तुमचीं पूज्य पावलें आमच्या दृष्टीस पडलीं." रामचंद्राकरतां अनेक वन्यफळें एका चपळ गृहस्थानें पुढें केलीं. तेव्हां सीतेच्या अंगावरील दागिने पाहून किंचित् समाधान पावलेला राम आपल्या प्रिय बंधूसह उपहार करूं लागला. त्यानें राजा सुग्रीव, सेनापति हनुमान आणि अरुण यांना आपल्या समवेत उपहार करण्यास बोलावलें. रामचंद्र कित्येक दिवस उपोषित होते. त्यांचा उपहार संपल्यानंतर रामचंद्र म्हणाले,

"प्रिय बंधू अरुण, हा तुमचा राजा आणि सेनापति येथें निर्जन स्थळीं किष्किंधा नगरी सोडून कां जमले आहेत? आणि माझी मार्गप्रतिक्षा तुम्ही कां करीत होता?" त्यावर अरुण म्हणाला.

"यांचा वडील बंधु वाली हा असून त्यानें किष्किंधेचें राज्य आणि याची बायको यांचा अपहार केला आहे. राजाधिराज सुग्रीव आपलें गेलेलें राज्य आणि आपली अपहृत पत्नी पुनः मिळविण्याच्या प्रयत्नांत आहेत. वाली अत्यंत शूर आहे. परंतु त्याचें शौर्य रामचंद्राच्या शौर्यापुढें कुचकामाचें ठरेल असें मी यांना सांगितल्यावरून तुमच्या मदतीची अपेक्षा धरून तुम्हाला हे विनंती करीत आहेत."

रामचंद्रानें किष्किंधापतीस मदत करण्याचा स्वीकार केला. "मी वालीचा प्राण घेईन, किष्किंधा नगरीचें साम्राज्य सुग्रीवाच्या स्वाधीन करीन. त्यांची आवडती पत्नी अर्थात्च त्यांना परत मिळेल. परंतु लंकाधिपति रावणाशीं युद्धप्रसंग घडेल तेव्हां सुग्रीव आणि सेनापति हनुमान यांनीं स्वतःचें सर्व सामर्थ्य, पैसा आणि सैन्यबळ पूर्णपणें इरेस घातलें पाहिजे."

उभयता सुग्रीव आणि हनुमान यांनीं पुनः रामचंद्रास अभिवादन केलें. ते म्हणाले,

"या पायाची शपथ घेऊन सांगतों कीं, रावणाच्या युद्धप्रसंगांत रामास यशप्राप्ति होण्यास आम्हीं आपले प्राणहि अर्पण करूं."

* * *

लवकरच वाली आणि सुग्रीव यांचें युद्ध झालें. सुग्रीव याच्या बाजूनें एकबाणी राम लढत होता. त्या युद्धांत अखेर रामचंद्राच्या

बाणानें वाली मारला गेला. अर्थातच सुग्रीव यशस्वी झाला. रामचंद्राच्या पराक्रमानें सुग्रीव किष्किधापति झाला. किष्किधेचें साम्राज्य मोठें होतें. किष्किधापतीची सत्ता अनेक मांडलिकांवर चाले. अरुण यास सुग्रीवानें आपल्या मुख्य प्रधानाचीं वस्त्रें दिलीं. बलशाली हनुमान सुग्रीवाचा सेनापति झाला. वालीच्या पत्नीच्या सांत्वनार्थ तिचा पुत्र अंगद यास किष्किधेचा युवराज केलें. महाराज सुग्रीव यांच्या राज्यप्राप्तीकरतां आणि अंगदाच्या युवराज प्राप्तीकरतां किष्किधापुरींत मोठा उत्सव झाला. उत्सव पार पडल्यानंतर अनेक मांडलिकांसह सुग्रीव आपला मुख्य प्रधान व सेनापती यांसह रामचंद्राकडे ऋष्यमूक पर्वतावर आला. प्रथम सीतेचा शोध करावा आणि नंतर ती पुन्हा मिळविण्याकरतां उपाययोजना करावी असें सर्वानुमतें ठरलें. निरनिराळे मांडलिक सीतेचा शोध करण्याकरतां वेगवेगळ्या दिशेनें गेले. हनुमान, अंगद आणि सरदार नळ, नील व जांबूवान हे दक्षिण दिशेकडे जाण्यास निघाले. त्यांना 'संपाती गरुडाकडे गेल्यास सीतेचा शोध लागेल' असें रामचंद्रानें सांगितलें.

संपाती गरुडाचा शोध त्यांना लागला व त्यानें सीता कोठें आहे हें अचूकपणें त्याना सांगितलें. समुद्रांत लंका नांवाचें बेट आहे. तेथें रावणाचें अधिराज्य असून सीतादेवी तेथेंच त्यांच्या नजरकैदेंत आहे असें त्यानें सांगितलें आणि 'मी आतां शापमुक्त झालों, रामचंद्राच्या कार्यास उपयोगी पडलों' असें म्हणत असतां त्यास पंख फुटले आणि तो शापमुक्त झाला.

बलशाली हनुमान सीतेचा शोध करण्याकरितां लंकापुरींत गेला. तेथें अशोकवनांत अनेक राक्षसिणींनीं वेष्टित असलेली सीतादेवी त्याच्या दृष्टीस पडली. रामानें दिलेली मुद्रिका हनुमानानें सीतेच्या पुढें टाकली. तेव्हां ओळख पटून सीता आनंदित झाली. "आपणास १० महिने झाले, रावणानें हरण करून आणलें आहे. आणखी दोन महिन्यांनीं" ती म्हणाली, "रावणास मी वश झालें नाहीं तर तो मला मारून टाकणार आहे. याकरितां आयुष्मन्‌ला कळवा कीं दोन महिन्यांत माझी सुटका झाली पाहिजे. सुटका न झाल्यास माझी आशा सोडा."

हनुमानानें सीतेची समजूत घातली आणि 'लवकरच आम्ही ससैन्य येतों आणि रावणाचा वध करून तुमची सुटका करतों' असें सीतादेवीस सांगितलें.

लंकापुरीची जाळपोळ आणि रावणास दरारा बसेल असें नुकसान करून हनुमान परत आपल्या मित्रमंडळींत आला. त्यानें ऋष्यमूक पर्वतावर येउन रामचंद्रास सर्व हकीकत कथन केली. तेव्हां रामचंद्र सुग्रीवास म्हणाले,

"युद्धाची तयारी सत्वर केली पाहिजे. समुद्र उल्लंघन करून रावणाशीं युद्ध देण्यास आपणांस लंकापुरींत गेलें पाहिजे. वेळ अगदीं थोडा उरला आहे. अवघ्या दोन महिन्यांत रावणाचा वध झाला नाहीं तर वैदेही हातची जाईल. उठा आणि तयारीला लागा."

सुग्रीव आणि त्याचे अनेक मांडलिक यांची अपार सेना एकत्र झाली. त्यांतील कांहीं योध्यांना शरसंधान करण्याची कला वरुण आणि माधव यांनीं शिकविली होती. बाकीच्या सैन्यानें बरच्या, भाले इत्यादि आयुधें घेतलीं. हनुमान, नळ, नीळ व जांबुवान् हे सर्वांचे सेनापती झाले. शरसंधान करणारी अंगदाची टोळी रामचंद्राच्या हुकमतींत राहील असें ठरलें. आनंदानें सर्वांनीं दक्षिण समुद्राकडे कूच केलें. विश्वकर्म्याचा पुत्र नळ यानें समुद्र उल्लंघून जाण्याकरतां मार्ग तयार करण्याची हमी घेतली. लक्षावधि आदिवासी कामास लागले. एक महिन्यांत नळानें समुद्रावरील सेतू अर्थात् लाकडांचा झुलता पूल तयार केला. सुग्रीवाची असंख्य सेना सेतुवरून समुद्रपार झाली.

अखेर रामलक्ष्मण, सुग्रीवहनुमान, नळनीळ व जांबुवान् ही खास मंडळी परतीरास गेली. राम कसला समुद्र तरून येणार आणि काय युद्ध करणार, अशी घमेंड रावण मारीत होता, तोंच लंकापुरीस रामचंद्रानें वेढा दिला आहे अशी अप्रिय बातमी रावणास लागली.

युद्धास प्रारंभ होण्यापूर्वी सुग्रीवाच्या विनंतीवरून अंगद यास रावणाच्या दरबारीं शिष्टाईकरतां पाठविलें. चतुर अंगद यानें परदाराभिलाष महत् पातक आहे, असें म्हणून सीतादेवीची मागणी केली व म्हणाला, "हा युद्धप्रसंग टाळणें सर्वस्वीं राजाधिराज

रावण यांच्या हातीं आहे." तेव्हां रावण विकट हास्य करून म्हणाला, "अरे वानरा, तूं आतां मला शास्त्राच्या गोष्टी सांगूं लागलास ! सीता सुंदरी परत देण्याकरतां आणलेली नाहीं. ती लवकरच आमच्या महालांत आमची भोगांगना बनेल. आम्हांस युद्धाची पर्वा नाहीं. कीटकमुंग्याप्रमाणें आम्ही वानर सेनेस रगडून काढूं." ही गर्वोक्ती ऐकून अंगद अधिक कांहीं न बोलतां शिष्टाईचा कांहीं उपयोग होणार नाहीं, असें जाणून परत आपल्या शिबिराकडे गेला.

अंगदाची शिष्टाई फोल ठरलेली ऐकून रामचंद्रानें रावणाशीं युद्ध जाहीर केलें. रावणाचा बंधू बिभीषण हा रामचंद्राचा सत्पक्ष जाणून त्यांना अगोदरच जाऊन मिळाला होता. त्याच्याकडून रावणाच्या सेनेची सर्व हकीगत रामचंद्रानें समजावून घेतली.

* * *

कधीं ऐकलें देखलें नव्हतें असें घनघोर युद्ध राम–रावण यांचें झालें. आपण मुंग्याप्रमाणें वानरांना चिरडून टाकूं हा रावणाचा अंदाज चुकला. त्याचे मोठमोठे समरपटु वीर दररोजच्या युद्धांत मृत्युमुखी पडूं लागले. या दररोजच्या हानीमुळें रावणानें योग्य धडा घेतला नाहीं; त्याची मत्सर व ईर्षा हीं वाढतच गेलीं. विचार करण्याइतकी त्याची वृत्ति शांत राहिली नव्हती. शेवटीं त्याचा प्यारा पुत्र इंद्रजितही युद्धांत पडला. रामलक्ष्मणांच्या शरसंधानास अंगद आणि त्याचे धनुष्यधारी वीर यांची जोड मिळाली.

काशीचा युवराज प्रसेनजित युद्धप्रसंगीं लंकेस आला होता. तो अर्थातच रामचंद्राच्या बाजूनें लढला.

रावणाचे नव्या दमाचे वीर दूरून येत आहेत तोंच ते रामचंद्राच्या शरसंधानास बळी पडूं लागले. रावणाचा बंधू कुंभकर्ण किती बलाढ्य ! पण तोहि युद्धांत टिकाव धरूं शकला नाहीं. त्याचा एक हात रामचंद्रानें युद्धांत बाणानें तोडला, तरी तो लढतच राहिला. दुसरा हात लक्ष्मणाच्या बाणानें नष्ट झाल्यावरही तो अचाटकर्मा वीर लढतच होता. अखेर त्याचें शिर रामचंद्रानें बाणानें छेदलें तेव्हां तें प्रचंड धूड समरभूमीवर गतप्राण होऊन अस्ताव्यस्त पडलें. त्यानंतर

लवकरच प्रधान प्रहस्त धारातीर्थी पतन पावला. तेव्हां क्रोधाविष्ट होऊन स्वतः रावण समरांगणावर आला.

राम आणि रावण याचें अत्यंत भयानक असें युद्ध कित्येक प्रहरपर्यंत चाललें होतें. इंद्रादि देव अत्यंत चिंतातुर अवस्थेंत तें प्रसिद्ध युद्ध अवलोकन करीत होते. शेवटीं विजयश्रीनें रामचंद्राच्या गळ्यांत माळ घातली. रामचंद्राची प्रतिज्ञा शेवटास गेली. रावणवधाचें अचाट जागतिक कल्याणाचें आणि समग्र मानवजातीच्या हिताचें श्रेष्ठतम कार्य शेवटास गेलें. दुर्जनांचा संहार व सज्जनांचा प्रतिपाळ हें युगपुरुषाचें कार्य लोकनायक रामचंद्रानीं पार पाडलें. तेव्हां स्वर्गांतील दुंदुभी दुंदुभूं लागल्या आणि विजयी वीरावर आकाशांतून पुष्पवृष्टी झाली. तेव्हां इंद्रादि देव उद्गारले,

"रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव ।"

( रामरावणाच्या युद्धास दुसरी उपमा नाहीं. )

आचार्य विश्वामित्र हिमाचलाच्या उत्तुंग शिखरावरून दिव्य दृष्टीनें सर्व युद्धप्रसंग पहात होते. 'रामचंद्रास आपण एकबाणी बनवलें त्याचें आज श्रेय झालें' असें ते स्वगत म्हणाले ! !

●

# १९

रावण-वध होऊन तीन दिवस लोटले होते. राम-लक्ष्मण हे विजयी वीर आपल्या अनेक समरपटु योध्यांसह लंकेंत येऊन स्थिर झाले होते. लंकानगरींत सर्वत्र आनंदाचा संचार झाला होता. बिभीषणानें सीता-देवीची पुनर्भेट रामचंद्रास करून दिली. तो प्रसंग अत्यंत हृदयस्पर्शी होता. अनेक दिवसांच्या विरहानंतर व संकटग्रस्त काळानंतर सीतादेवीस रामचंद्राची पुनर्भेट झाली, तेव्हां तिचा आनंद गगनांत मावेनासा झाला. रामचंद्रानें सीता-देवीचा मोठ्या सन्मानानें स्वीकार केला. परंतु जननिंदेस तोंड देण्याकरितां म्हणून त्यानें सीता-देवीस

अग्निदिव्य करण्यास सांगितलें. हें अग्निदिव्य पाहाण्याकरितां लंकेचे अनेक नागरिक तेथें उपस्थित झाले होते. रामचंद्राचा अग्निदिव्य करण्याचा हेतू लक्ष्मण, बिभीषण, अग्निरथ, हनुमान वगैरे प्रमुख लोकांस माहित होता. सीतादेवीच्या उज्ज्वल शीलाबद्दल रामचंद्राच्या मनांत कसलाही संशय नव्हता; तथापि केवळ लोकापवादाकरितां सीतादेवीस हें दिव्य करावें लागलें.

लंकेचें राजपद कोणास द्यावें याबद्दल लंकेच्या जनतेचा कौल रामचंद्रांनीं मिळविला होता. प्रसेनजितानें नागरिकांत मिळून मिसळून त्यांचें मन कोणांत केंद्रीभूत झालें आहे, हें रामचंद्रास विदित केलें.

रावण-वधानंतर तिसरे दिवशीं भोजनोत्तर रावणाच्या खास रत्नखचित महालांत रामचंद्रानें बैठक बोलाविली होती. कांहीं थोडे निवडक नागरिक, बिभीषण, मंत्री अग्निरथ, प्रसेनजित, सुग्रीव, लक्ष्मण आणि रामचंद्रावर निस्सीम भक्ति करणारा हनुमान या बैठकीस हजर होते व अग्निदिव्यानें पवित्र ठरलेली सीता-देवी रामचंद्राच्या अर्ध्या सिंहासनावर बसली होती, तोंच नारदमुनी तेथें उपस्थित झाले. त्यांचें अत्यंत हार्दिक स्वागत उभयतां रामलक्ष्मणांनीं केलें.

तेव्हां नारदमुनी म्हणाले,

" कधींहि पाहिलें–देखलें नव्हतें असें घनघोर युद्ध तुम्ही उभयता बंधूंनीं रावणाशीं केलें, हें अंतरिक्षांतून आम्ही पाहत होतों. इन्द्रादि सर्व देवांनीं तुम्ही विजयी झाला तेव्हां आकाशांतून पुष्पवृष्टि केली. त्या प्रसंगीं मी हजर होतों. तुम्ही चातुर्यानें दक्षिण भरतखंडभर आर्यांची सत्ता निर्माण केली आणि अखेरीस रावण-वध करून प्रशंसनीय यश मिळविलें, याबद्दल आर्यावर्तांत मोठा उत्सव चालला आहे. मी या विजयाची माहिती आर्यावर्तभर दिली. आज आर्या-वर्तांत आनंदीआनंद चालला आहे. आर्यांस होणारा हा आनंद चिर-कालीन आहे. या तुमच्या भरतखंडांतील दक्षिण-दिग्विजयानें अखंड भरतखंड आर्यसत्तांकित झाला आहे. भविष्यकाळांत जोंपर्यंत अखे-रचा आर्य शिल्लक राहील तोंपर्यंत तुमच्या अतुल यशाची महनीय स्तुति होईल. धन्य तुमच्या पराक्रमाची ! "

रामचंद्र त्यावर उत्तरले,

" दक्षिणदिग्विजयाकडे व रावण-वधाकडे आम्ही होऊन आलों नाहीं. आम्हांस या कार्यास प्रवृत्त करणारें आर्यावर्तातील ऋषिमंडळ सर्वस्वी प्रशंसेस पात्र आहे. आचार्य विश्वामित्र आणि आपण यांनाच या सर्व विजयाबद्दल अग्रपूजेचा मान मिळाला पाहिजे. आचार्य विश्वामित्रांनीं आम्हास धनुर्विद्येंत पारंगत केलें नसतें, सामादि वेदाचें अध्ययन आम्हांकडून करवून आम्हांस लोककार्यप्रवृत्त केलें नसतें, तर आम्ही अयोध्येचे युवराजच राहिलों असतों; दक्षिणदिग्विजय आणि रावण-वध आमच्याकडून घडला नसता. ' योजकस्तत्र दुर्लभः । ' या न्यायानें आमच्या या कार्यास विश्वामित्र महर्षीच कारणीभूत आहेत. आचार्यास रावण-वधाची हकिकत कळली आहे काय ? त्यांचा वास हल्लीं कोठें आहे ? "

" बर्फाच्छादित हिमाचलाच्या उत्तुंग शिखरांवर" नारदमुनि म्हणाले, " ब्रह्मर्षी विश्वामित्र हल्लीं वास करीत आहेत. त्यांची अध्यात्मिक शक्ति परमोच्च कोटीस गेली आहे. ते मन मानेल तसा अंतरिक्षांतूत संचार करितात आणि जगांत चाललेल्या कोणत्याहि गोष्टी ते दिव्यज्ञानानें पाहूं शकतात. त्यामुळें रामचंद्रा ! तुझी ही अतुल कामगिरी त्यांनी पाहिली असली पाहिजे आणि चौदा वर्षांपूर्वीं कबूल केल्याप्रमाणें अयोध्येंच्या तुझ्या आगमनप्रसंगीं तुला भेटण्यास विश्वामित्र ऋषि खात्रीनें येतील. "

विश्वामित्रांची थोरवी ऐकून रामचंद्रास परम आल्हाद झाला. ते तेथें जमलेल्या सर्व मंडळींस उद्देशून म्हणाले,

" आम्ही लंकेच्या राजप्रमुखाची सत्ता बिभीषणास अर्पण करीत आहोंत. सर्व जनतेला ' राजा ' म्हणून बिभीषण मान्य आहे. मात्र यापुढें लंकेच्या रावणी राज्यातील जुलूमजबरदस्ती पूर्ण लयास गेली आहे. लंका सोम्याची कशी बनली याचा इतिहास मी अवलोकन केला आहे. गरीब दुबळ्या प्रजाजनांचे हक्क हिरावून घेऊन त्यांना सत्ता व संपत्तीहीन बनवून हें रावणी-राज्य सजलेलें आहे. आतां समान हक्क व समान सत्ता लंकेंत राज्य करील. राजा बिभीषण याच्या मदतीस अष्टप्रधानांची योजना झालेली आहे. त्यांपैकीं चार प्रधान अग्निरथादि सत्तांकित राहातील व दुसरे चार प्रधान लंकेच्या

दलित वर्गांतून निवडून देण्याचे आहेत. या अष्टप्रधानांच्या मदतीनें राजा बिभीषण राजशकट हाकतील. दलितवर्गाच्या हिताकडे व हक्काकडे पूर्ण लक्ष पुरविलें जावें, याकरितां अष्टप्रधानांस मदत म्हणून काशीचे युवराज प्रसेनजित कांहीं काळ लंकेंत काढतील. आणखी आठ दिवसांनी आम्ही, लक्ष्मण व सीतादेवी अयोध्येस जाण्यास निघूं. दरम्यानच्या काळांत बिभीषण लंकेचें राज्यारोहण करतील."

कांही वेळानें ती सभा बरखास्त झाली. तेव्हां रामचंद्र आपला बन्धू लक्ष्मण यास म्हणाले,

"इयं स्वर्णमयी लंका भ्रातर् महृयं न रोचते !
जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ।"

जननी आणि जन्मभूमि स्वर्गापेक्षांहि थोर आहे हें रामचंद्राचें म्हणणें लक्ष्मणासही पटलें.

यानंतर चार दिवसानी रामचंद्राच्या हस्तें बिभीषणाचा राज्यारोहणविधी झाला. त्या प्रसगीं जनतेने निवडलेले चार मंत्री हजर होते. बिभीषणानें नागरिकाकरितां जें भाषण केलें त्यामध्यें रामचंद्राच्या म्हणण्याचा अनुवाद होता.

* * *

अखेर चैत्र शु॥ अष्टमीचा दिवस उजाडला. आज चौदा वर्षांचा वनवासकाळ पूर्ण होणार होता. रामचद्राच्या प्रवासाची पूर्ण सिद्धता राजा विभीषणानें केली. त्यानें पुष्पक विमान रामचंद्राकरितां सज्ज केलें. सीतादेवी परमहर्षानें लक्ष्मणभाऊजीसह त्या विमानांत विराजमान झाली. रामचंद्राच्या अनुज्ञेनें भक्त हनुमान यास अयोध्येस येण्याची परवानगी झाली. तेव्हां सुग्रीव, नळ, नीळ इत्यादि महायोध्यांनीं अयोध्येंत येण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्यानंतर राजीवलोचन रामानें आनंदानें संमति दिली. सर्व पुष्पक विमानांत आरूढ झाले. राजा बिभीषणास अखेरचा निरोप देतांना रामचंद्र म्हणाले,

"सीताप्राप्तीमुळें मला आनंद झाला; रावणवधामुळें मला आनंद झाला; परंतु येथील जुलमाची राजवट बदलून समान हक्कांची व प्रेमाची राजवट मी निर्माण करूं शकलों आणि त्या योगानें येथील गरीब प्रजाजनांच्या आनंदास कारणीभूत झालों यामुळें माझ्या

मनांत जो अपरिमित आनंद झाला आहे, त्यापुढें सीताप्राप्तीचा आनंद व रावणवधाचा आनंद फिक्के भासतात. जनतेच्या हक्कांस मान द्या आणि त्यांना सुखी करा. "

त्या वेळीं बिभीषणाच्या नेत्रांतून अश्रू वहात होते. त्यानें रामचंद्रास अखेरचें अभिवादन केलें, तेव्हां रामचंद्राचे पाय बिभीषणाच्या अश्रूंनीं भिजले होते.

बिभीषण सद्गद् वाणीनें म्हणाला,

" देवा ! मी तुमचा भक्त आहें. तुमच्या आज्ञेप्रमाणें लंकेची राजवट चालेल. "

रामचंद्र पुष्पक विमानात चढले आणि दरम्यानचा समुद्र ओलांडून ते उत्तरेकडे जाऊं लागले. रामचंद्र समुद्रवलयांकित पृथ्वीचा दिग्विजय गाजवून परत जन्मभूमीकडे निघाले होते.

अखेर चैत्र शु।। नवमीचा दिवस उजाडला. शरयूकांठीं नंदीग्रामाच्या निकट भरत-निवास म्हणून एक साधीसुधी इमारत होती. या ठिकाणीं भरत, रामाचा चौदा वर्षांचा वनवास काळ संपेपर्यंत राहत आला. राजविलासांस किंवा उपभोगांस त्यानें स्पर्श केला नाहीं. विरक्त मनानें तो यतीमुनीचें जीवन कडकडीत ब्रह्मचर्यांत कंठित होता. केवळ रामचंद्राची आज्ञा म्हणून तो प्रजापालनाचें काम करीत होता.

त्या भरत-निवासाभोंवतीं आज अयोध्येच्या नागरिकांचा गराडा पडला होता. शरयूचें पूर्वतीर गर्दीनें फुललें होतें. वृद्ध सुमंत बाकीच्या मंत्र्यासह रामचंद्राची वाट पाहत बसले होते. भरताची माता कैकयी, रामचंद्रमाता कौसल्या आणि लक्ष्मणमाता सुमित्रा स्त्रियांच्या मेळाव्यांत पुढारीपणानें दिसत होत्या. वशिष्ठ, वामदेव हेहि आतुरतेनें रामचंद्रागमनाची मार्गप्रतिक्षा करीत होते. रामचंद्राचें आगमन चैत्र शु।। नवमीस होणार असें नारदमुनीनें पूर्वींच जाहीर केलें होतें. त्यास अनुलक्षून मोठ्या उत्सुकतेनें व आनंदानें उभ्या अयोध्यावासी जनांनीं रामचंद्राच्या स्वागतांत भाग घेतला होता.

सूर्योदय होऊन एक घटिका व्यतीत झाल्याबरोबर रामचंद्राचें पुष्पक विमान भरतनिवासाजवळ येऊन थडकलें. रामचंद्र विमानांतून

आकाशमार्गे आला ही अत्यंत आश्चर्याची गोष्ट त्या स्वागतप्रसंगीं सर्व लोक विसरले. बरोबर चौदा वर्षे झालीं; तेव्हां या वेळीं अयोध्या-वासी जन हृदय फोडून रडत होते. आतां त्यांचा आनंद परमावधीस गेला होता. रामलक्ष्मण यांना प्रथम भरत भेटला. त्याचे डोळे आनंदाश्रूंनीं भरले होते. तो रामचंद्रास साष्टांग दंडवत करून म्हणाला,

" बन्धो ! चौदा वर्षांचा काळ निबिड अंधकारांत गेला. घनघोर अंधकाराची रात्र संपल्यानंतर जो आनंद होत असेल, त्याच्या सहस्रपटीनें आनंद आम्हास आज झाला आहे. सूर्यवंशास ललामभूत बनणाऱ्या रामचंद्रा ! तुझें स्वागत असो. "

त्यानंतर रामलक्ष्मण व भरत यांचा जटाभार उतरवण्यांत आला. त्यांना मगल स्नानें घालण्यांत आलीं. राजपुरुषांचे अलंकार आणि पोषाख अंगावर चढविल्यानंतर राजवाड्याकडे मोठ्या मिरवणुकीनें रामचंद्रास नेण्यांत येणार होतें. दरम्यानच्या काळांत रामचंद्रानें कैकयीची भेट घेतली. तिच्या पायावर आपलें डोकें ठेऊन रामचंद्र म्हणाला,

" आई ! हें केवळ तुझ्या प्रसादाचें फळ ! तूं चौदा वर्षांच्या वन-वासाचा प्रसाद आम्हांस अर्पण केला नसतास तर आज माझी दिगंतरीं कीर्ति गाजली नसती; रावण-वधाचें दुष्कर कार्य तडीस गेलें नसतें. तुझ्या उपकारानें दक्षिण-भारताचा दिग्विजय माझ्या हातून घडला. "

असें रामचंद्र म्हणत आहे तोंच सीताबाई म्हणाली,

"सासुबाईंचे केस अद्याप सुटलेलेच आहेत. "

" होय ! " कैकेयीदेवी म्हणाली, " तुम्ही वनवासास गेल्यापासून गेल्या चौदा वर्षांच्या काळांत ते सुटलेलेच होते. आज ते बद्ध करण्याचा सुप्रसंग मला लाभत आहे. "

रामचंद्र आश्चर्यचकित होऊन म्हणाला,

" म्हणजे ? आमच्या वनवासाशीं, आई, तुझ्या केस मोकळे ठेवण्याचा काय संबंध ? "

"रामचंद्रा !" कैकयीदेवी म्हणाली, "मी तशी प्रतिज्ञा केली होती. रावण–वध होईपर्यंत केस बद्ध करणार नाहीं अशी प्रतिज्ञा आचार्य विश्वामित्राजवळ मी केली होती.'

लक्ष्मण आनंदानें टाळी वाजवून म्हणाला,

"आतां हें कोडें उलगडलें. मातोश्री, तुझ्या उदार मनाचें प्रत्यंतर आम्हांस मिळालें. केवळ जागतिक कल्याणाकरितां तूं आणि आचार्य विश्वामित्र यांनीं रामचंद्राचा यौवराज्याभिषेक थांबविला आणि त्यास जागतिक कार्य करण्यास अवसर दिला. आई, तुझे आम्हावर अनंत उपकार आहेत."

त्यानंतर सीतादेवीनें कैकेयीची वेणी घातली आणि तें सर्व राजमंडळ राजवाड्याकडे मोठ्या थाटानें आणि उत्सवानें जाण्यास सज्ज झालें.

राजवाड्यांत मिरवणूक आल्यानंतर सर्व जमलेल्या लोकांस स्थानापन्न होण्याची विनंती रामचंद्रानें केली. तितक्यांत अचानकपणें महर्षि विश्वामित्रांची स्वारी सभास्थानीं प्रविष्ट झाली.

रामचंद्रानें त्यांचें अत्यानंदानें स्वागत केलें. अखेर रामचंद्र सर्वनागरिकांस उद्देशून म्हणाले,

"तुम्हास कांहीं गोष्टी कळल्या नाहींत. तो तुमच्या मनांतील संशय नाहींसा करतों. आचार्य विश्वामित्र ही अत्यंत थोर विभूति. त्यांनीं सामवेदांचा अभ्यास मजकडून करविला आणि मला विरक्त बनविलें. त्यांनीं धनुर्विद्येचें ज्ञान मला दिलें आणि मी एकबाणी बनलों. हें अमोल शिक्षण देण्यांत त्यांचा हेतू होता: रावण–वधाकरितां योग्य मनुष्य त्यांना पाहिजे होता. त्याकरितां त्यांनीं मला तयार केलें. आपल्या आर्यांचा उत्कर्ष व्हावा म्हणून आपल्या ऋषिमुनींचें एक मध्यवर्ती मंडळ कार्यप्रचुर होतें. त्यांचे अध्यक्ष विश्वामित्र हे असत. त्यांनीं आपल्या प्रचंड बुद्धिमत्तेच्या जोरावर कैकेयीमातेस सामील करून घेतलें आणि वरदान व आमचा चौदा वर्षांचा वनवास हीं आचार्य विश्वामित्र यांच्या प्रयत्नांचीं फळें आहेत. त्यामुळें युवराज म्हणून मी तुमच्यांत अडकून राहिलों नाहीं. रावणवधाकरितां चौदा वर्षांचा प्रचंड अवसर मला सांपडला आणि लंकेच्या

रावणाचें राज्य त्याच्यासह विसर्जन पावलें. या गोष्टींचा विस्तार मी मागाहून करून सांगेन. राणी कैकेयीदेवीबद्दल आतां तरी तुमच्या मनांत प्रकाश पडला ना ?"

चोहोंकडून राणी कैकयीदेवीचा आणि महर्षि विश्वामित्रांचा जयजयकार झाला.

रामचंद्र पुढें बोलूं लागले, "अष्टप्रधान आणि भरत ... अयोध्येचें राज्य करण्याबद्दल मला विनंती केली आहे आणि ... सर्वांची इच्छा मी राज्यपद स्वीकारावें अशी आहे. गेलीं चौदा ... तरी माझ्या नांवानेंच राज्याधिकार चालला. सिंहासनावर मा... पावलें ठेऊन प्रिय बंधू भरत माझ्या नांवानें राज्यकारभार करीत होता. आतां यथावकाश तुमच्या सर्व महत्वाकांक्षा पुऱ्या होतील, अशा उल्हासानें व थाटानें मी राज्यपदाचा स्वीकार करीन. आ... दोन प्रहरची वेळ होत आली. तुम्ही आपापल्या घरीं निघून जावें."

सभा बरखास्त झाली. नागरिक आपापल्या घरीं निघून गेले.

रामचंद्र कैकयीच्या महालांत जाऊन तिला भेटले. दीर्घकाळाची विरही आई रामचंद्रास प्रेमानें आलिंगून व हुंगून सद्गद् वाणीनें म्हणाली,

"मी माझ्या जगज्जेत्या रामचंद्राचें स्वागत करतें !"

त्यानंतर रामचन्द्र बराच काळपर्यंत आईच्या महालांत राहिला, तेव्हां आचार्य विश्वामित्र जाण्याच्या गडबडींत आहेत, असा निरोप त्यास आला.

रामचंद्र विश्वामित्राच्या पायांवर डोकें ठेऊन विनंतीपूर्वक म्हणाला,

"आचार्य ! आणखी कांहीं दिवस आम्हांस आपलें संगतिसुख देणार नाहीं काय ?"

विश्वामित्र शांत चित्तानें म्हणाले,

"मी तुझ्या आगमनप्रसंगीं अयोध्येस येतों असें तुला आश्वासन दिलें होतें; तें मी पुरें केलें. मला तुझें दर्शन प्रत्यहीं होतच आहे. परंतु रामचंद्रा ! तूं आणि इतर मंडळी यांच्या सुखाकरितां मी आज येथें आलों. आतां मला परत गेलें पाहिजे. तूं स्वशिरावर घेतलेलें रावण-वधाचें कार्य इतक्या शौर्यानें तडीस नेलेंस कीं, याबद्दल

तुझी दिगंतर कीर्ति होईल. तुझ्या आयुष्यांतील महनीय कार्य आतां संपलें आहे. मला आतां जाऊं दे. "

" आचार्य ! " रामचंद्र म्हणाले.

" आपण उत्तम तपसिद्धि केली म्हणून नव्हे. मेनका-अप्सरा ज्या ध्यानींमनीं लागली म्हणून तर नव्हेच नव्हे; तुम्ही चिकाटीनें ...पद मिळविलें म्हणूनहि नव्हे; तर केवळ रावणवधाकरितां ' बनविलें ' आणि मला प्रोत्साहन दिलें आणि माझ्या हस्तें ...वणवध करविला, या महनीय कामगिरीबद्दल आणि जागतिक कल्याणाबद्दल आर्यांच्या उत्कर्षाच्या इतिहासांत तुमचें नाव सुवर्णाक्षरांनीं लिहिलें जाईल आणि प्रत्येक आर्य तुमच्या या अचाट कामगिरीबद्दल प्रशंसा करीत राहील. "

त्यानंतर श्रीरामचंद्रानें पुन: विश्वामित्र ऋषींस अभिवादन केलें. त्याच्या मस्तकावर हात ठेऊन विश्वामित्र म्हणाले,

" रामचंद्रा ! सुखी हो. माझें पुन: दर्शन होणार नाहीं. "

बोलतां बोलतां विश्वामित्र अदृश्य झाले. रामचंद्र चकित झाला. पुनः रामचंद्रानें विश्वामित्रांच्या स्मृतीस अभिवादन केलें.

* * *

वाचकहो ! संपलें. विश्वामित्राच्या दीर्घकालीन आयुष्यांतील अत्यंत रोमांचकारी आणि महत्वपूर्ण इतिहास येथें संपला. विश्वामित्राच्या स्मृतीस श्रीरामचंद्रानें जें शेवटचें अभिवादन केलें तसेंच त्यांच्या स्मृतीस अभिवादन करून हें पुस्तक त्यांचा गुणानुवाद गाणारें त्यांच्या गोड व पवित्र स्मृतिस मी अर्पण करतों!



# नवीं प्रकाशनें

| | किं. रु. |
|---|---|
| छत्रसाल--वालचंद शहा, ३ री आवृत्ति | ३ |
| भिरभिरें--गंगाधर गाडगीळ | ३ |
| तूं भेटायला नको होतास--सरोजिनी बाबर | ३ |
| मायेचा पाझर--शांता शेळके | ३॥ |
| मीलन--अरविंद गोखले | ३ |
| सम्राट् अशोक--वालचंद शहा, ३ री आवृत्ति | ६ |
| सर्व हक्क स्वाधीन--बोकील | ४ |
| भूकबळी--सुरेश शर्मा | २ |
| पूर्व आणि पश्चिम--शांतिलाल भंडारी | ४॥ |
| वैरपूर्ती--कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ८ |
| अल्मिनार--पद्माकर डावरे | ३ |
| जीवननृत्य--मीनाक्षी साने | ३॥ |
| गुजराथचा नाथ--कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ६ |
| बजाजी निंबाळकर--वालचंद शहा | ४ |
| नौकाडुबी-टागोर, २ री आवृत्ति | ५ |
| गोर्‍यांतील सुंदर स्त्रिया--कोठारी, ३ री आवृत्ति | ५ |
| गृहिणी (टॉलस्टॉय)--निरंतर, २ री आवृत्ति | ३ |
| जागरण--अरविंद गोखले | ३ |
| पाटलाची लेक--चौगुले | ३ |
| ओझरती नजर, २ री आवृत्ति--नाईक कि. मा. | ३ |
| मदिरा-मस्तानी-भांगरे, २ री आवृत्ति | २॥ |
| लंडन येथील गुप्त कृत्यें, भाग १ ते ५ .. प्रत्येकीं | १॥ |
| सैन्य चाललें पुढें-बोकील | ३ |
| [illegible]रा व ढापी—न. चि. केळकर | ४ |
| रासबिहारी बसू--बाळशास्त्री हरदास | १॥ |

तिसऱ्यांदा चिमणराव—चिं. वि. जोशी ..

वणव्यांतलें फूल—समाजसुधारक, २ री आवृत्ति ..

हिरवा चुडा—कु. डॉ. सरोजिनी बाबर .. ..

प्रतापादित्य—हडकर, २ री आवृत्ति .. ..

कुमार अशोक—लिमये २ री आवृत्ति .. .. १

जगाचा बाजार—भाग १ते३; २ री आवृत्ति, प्रत्येकीं .. ५

विजयनगरची साम्राज्यस्थापना—दातार, २ री आवृत्ति ५

अमृत कीं विष—हडकर, २ री आवृत्ति .. .. ५

सोनेरी खंजीर—ग. वि. कुलकर्णी, ३ री आवृत्ति .. २॥

धरणीकम्प—वि. वा. हडप, २ री आवृत्ति .. ४

प्रेमाश्रम—भाग १ व २ अज्ञात, २ री आवृत्ति प्रत्येकीं... ४

रक्ताचें गालबोट—द. वि. परांजपे, २ री आवृत्ति .. ५

प्रेमबंधन—रा. ह. दातार, २ री आवृत्ति .. .. ५

देवी कल्याणी—अज्ञात, २ री आवृत्ति .. .. ४

भाईबंद—रा. ह. दातार, २ री आवृत्ति ... .. २

नराचा नारायण—रा. ह. दातार, २ री आवृत्ति .. २

वीरात्मा भाग १।२ आ. २ री—गणेशशास्त्री फाटक प्रत्येकीं ५

ढोंगी गुरूच्या सैतानी लीला—गणेशशास्त्री फाटक २ री आ. ४

हा संशयाचा प्रताप—ग. वि. कुलकर्णी, २ री आवृत्ति .. ४॥

भीषण सूड—अज्ञात, २ री आवृत्ति ... .. ४

जर्मन युद्धावरील मोहीम—सहृदय, २ री आवृत्ति .. २॥

गहन गूढ—अज्ञात, २ री आवृत्ति .. ... २॥

गृहदेवी—प. स. देसाई, २ री आवृत्ति .. .. ५

मुकुट—रवींद्रनाथ टागोर, २ री आवृत्ति .. .. ॥

मृगेंद्र-लीला—अज्ञात, २ री आवृत्ति .. ..

वडीलधारी माणसें—कु. डॉ. सरोजिनी बाबर .

अजिता— " " " "